मोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला

# नवीन मराठी पुस्तकें

## करुणराघव.

हें वर लिहिलेल्या पुस्तकमालेपैकीं प्रथम नंबरचें आहे. हें प्रसिद्ध कवि **भवभूति** याचें सर्वोत्तम नाटक **उत्तररामचरित** याच्या आधारानें लिहिलेलें असून यांत करुणरस इतका ओतप्रोत भरला आहे कीं, तो पाषाणाला देखील द्रव आणील. कागद, छपाई व बांधणावळ सुरेख असून याचीं डेमी १२ पेजी सांच्याचीं २६० पृष्ठें आहेत. याची किंमत १ रुपया आहे.

## ललितवत्सराज.

याचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग केले आहेत. प्रसिद्ध **श्रीहर्षदेव** यानीं केलेल्या **रत्नावली** नाटिकेचा आधार घेऊन पूर्वार्ध तयार केलें आहे. व त्याच्याच **प्रियदर्शिका** नांवाच्या नाटिकेच्या आधारानें उत्तरार्ध तयार केलें आहे. दोहोंचाही नायक एक असल्यामुळें अशी योजना केली आहे. कागद, छपाई व बांधणावळ सुरेख आहे. याच्या प्रत्येक अर्धाचीं डेमी द्वादशपत्री १३० वर पृष्ठें झालीं आहेत. प्रत्येक अर्धाची किंमत ८ आणे आहे.

## चारुदत्त आणि वसंतसेना.

हें प्रसिद्ध महाकवि **श्रीशूद्रक** राजा याच्या **मृच्छकटिक** प्रकरणाच्या आधारें तयार केलें आहे. यांत पौराणकाळाच्या नंतरची या देशाची स्थिति व्यक्त केली आहे. कागद व छपाई [illegible] असून याचीं डेमी द्वादशपत्री पृष्ठें सुमारें ३०० [illegible]त. किंमत १ रुपया.

## प्रणयिमाधव.

हें प्रसिद्ध महाकवि श्रीभवभूति याच्या मालतीमाधव नांवाच्या प्रकरणाच्या आधारानें तयार केलें आहे. यांत कुलीन कन्येचें वर्तन उत्तम प्रकारें दाखविलें आहे. यांत अनेकप्रकारच्या मसलती आहेत. कागद व छपाई उत्तम असून डेमी द्वादशपत्री सांच्याचीं पृष्ठें सुमारें ३०० झालीं आहेत. किंमत १ रुपया.

## आर्यचाणक्य.

हें प्रसिद्ध महाकवि विशाखदत्त याच्या मुद्राराक्षस नांवाच्या नाटकाधारानें तयार केलें आहे. यात राजकीय भानगडी, अनेक मसलती, कारस्थानें फारच सुरेख रीतीनें वर्णिलीं आहेत. कागद छपाई वगैरे उत्तम असून डेमी द्वादशपत्री पृष्ठें सुमारें ३०० आहेत. किंमत १ रुपया.

## विदग्धपुरूरवा.

हें महाकवि श्रीकालिदास याच्या विक्रमोर्वशीनाटक त्रोटकाच्या आधारें तयार केलें आहे. यात राजा पुरूरव्याचें वर्णन केलें आहे. कागद व छपाई सुरेख असून डेमी द्वादशपत्री सांच्याचीं पृष्ठें २०० आहेत. किंमत १४ आणे ठेविली आहे.

## राजा अग्निमित्र.

हें प्रसिद्ध महाकवि श्रीकालिदासकृत मालविकाग्निमित्र नाटकाच्या आधारानें तयार केलें आहे. यांत अग्निमित्र राजाचें चरित्र मोठ्या सुरेख रीतीनें वर्णन केलें आहे. कागद व छपाई सुरेख असन डेमी द्वादशपत्री पृष्ठें सुमारें २२० वर होतील. किंमत १ रुपया.

## शिवदिग्विजय

### अथवा

## तरुणशिवाजी नाटक.

यात छत्रपति शिवाजी महाराज यांच्या त[illegible] म्हणजे त्यानीं तोरणाकिल्ला घेतल्यापासून तों त्यांना राज्याभिषेक

च्या कृतीचें फारच सुरस रीतीनें वर्णन केलें
का[illegible] व छपाई सुरेख असून डेमी द्वादशपत्री साच्याचीं ३.
पृष्ठें आहेत. किंमत १ रुपया.

## सद्गुणीसगुणा.

### ( स्त्रियांस अत्यंत उपयोगी .)

ही एक फारच चटकदार व मनोरंजक गोष्ट आहे. कागद व छपाई सुरेख असून डेमी द्वादशपत्री साच्याचीं पृष्ठें ६० आहेत. किंमत ४ आणे.

## बापू गोखले यांचें चरित्र.

ह्या इतिहासप्रसिद्ध शूर पुरुषाचें चरित्र फारच मनोवेधक व रसाळ आहे. कागद व छपाई सुरेख असून डेमी द्वादशपत्री साच्याचीं पृष्ठें २०० आहेत. किंमत १२ आणे.

## सुंदरी आणि वसंतसेन.

### भाग १, भाग २, भाग ३.

हें पुस्तक मूळ हिंदीभाषेंत रचिलेल्या एका अत्युत्तम प्राचीन ग्रंथाच्या आधारें तयार केलें आहे. यांत स्त्रिया आपलें पातिव्रत्य दृढ निश्चयानें कोणत्या प्रकारें रक्षण करितात, याचें उत्तम प्रकारें वर्णन केलें आहे. भाग पहिला, किंमत ४ आणे; भाग २ रा, किंमत ६ आणे; भाग ३ रा, किंमत १० आणे.

## संगीत ययाति नाटक.

यांतील पद्याची रचना कै. अण्णा किर्लोसकर यांच्या संगीतासारखीच आहे. नाटक फार साधें व गोड आहे. पृष्ठें ८०. किंमत ८ आणे.

## मनोहर नाटक.

या नाटकाची रचना शेक्सपीयरच्या नाटकाच्या धर्तीवर आहे. यांत करुण व हास्य रस प्रधान आहेत. हें शोकपर्यवसायी नाटक आहे. किंमत १२ आणे.

POTDAR'S MORAL AND INTERESTING BOOK-SERIES.

NO. VI.

# ARYA CHÁNAKYA,

TRANSLATED FROM THE SANSKRIT WORK

BY

PANDIT VAMAN SHASTRI ISLAMPURKAR.

यदि परगुणा न क्षम्यन्ते यतस्व गुणार्जने
न हि परयशो निन्दाव्याजैरलं परिमार्जितुम् ।
विरमसि न चेदिच्छा-द्वेषप्रसक्तमनोरथो
दिनकरकरान्पाणिच्छत्रैर्नुदन् श्रममेष्यसि ॥

PUBLISHED BY

VASUDEV MORESHVAR POTDAR.



Bombay:
PRINTED AT THE
EDUCATION SOCIETY'S PRESS, BYCULLA.

1890.

*Price One Rupee.*

पोतदारांची नीतिपर आणि मनोरंजक पुस्तकमाला.

नं० ६.

# आर्य चाणक्य.

हें पुस्तक संस्कृत ग्रंथावरून

पंडित वामन शास्त्री इसलामपुरकर

यांनीं मराठींत तयार केलें.

अप्राज्ञेन च कातरेण च गुणः स्याद्भक्तियुक्तेन कः
प्रज्ञा-विक्रमशालिनोऽपि हि भवेत्किं भक्तिहीनात्फलम् ।
प्रज्ञा-विक्रम-भक्तयः समुदिता येषां गुणा भूतये
ते भृत्या नृपतेः कलत्रमितरे सम्पत्सु चापत्सु च ॥

वासुदेव मोरेश्वर पोतदार

यांनी

मुंबईंत
एज्युकेशन सोसायटीच्या छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

१८९०.

किंमत एक रुपया.

# प्रस्तावना.

आर्यचाणक्य हें पुस्तक प्रसिद्ध महाकवि **श्रीविशाखदत्त** याच्या **मुद्राराक्षस** नामक नाटकाच्या आधारानें तयार केलें आहे. मूळग्रंथाला **मुद्राराक्षस** असें नांव देण्याचें कारण इतकेंच कीं, मुख्य नायक जो **चाणक्य*** त्याणें — आपला प्रतिपक्षी अर्थात् **राक्षस** याची 'मुद्रा' म्हणजे आंगठी हेराच्या द्वारें आपल्या हस्तगत झाली तिच्यावरून कपटव्यूह रचून त्याला हरविल्याचें त्यांत वर्णन केलें आहे. व **चाणक्याची** मसलत सिद्ध होण्यास मुख्यत्वें **राक्षसाच्या** मुद्रेचाच उपयोग झाला आहे; ह्मणून **मुद्राराक्षस** असें कवीनें त्या ग्रंथाला नांव दिलें आहे. त्या ग्रंथाचें रूप बदलून-अर्थात् दृश्यकाव्याला श्रव्यकाव्याचें किंवा नाटकाला कादंबरीचें† रूप देऊन आह्मी तें आर्यचाणक्य नांवानें वाचकांपुढें आणलें आहे. **चाणक्य** हा या ग्रंथाचा नायक आहे. व त्याच्याच प्रयत्नाचा, चातुर्याचा, मसलतीचा व इतर गुणांचा प्रभाव विस्तारपूर्वक यांत वर्णन

* आम्ही **चाणक्य** मुख्य नायक असें म्हटलें आहे, पण मूळ नाटकाचा टीकाकार **धुंडिराज चंद्रगुप्ताला** नायक म्हणतो. साहित्यशास्त्राच्या कांहीं नियमाना तें खरें आहे, तथापि ते नियम नाटकास लागू आहेत हा **ग्रंथ** नाटक नव्हे, व आम्हासही साहित्यशास्त्राचा आधार आहे.

† कादंबरी हा शब्द मराठीभाषेंत मोठ्या चमत्कारिक रितीनें प्रचारात आला आहे. इंग्रेजीत ज्याला "Novel" ह्मणतात, त्याला संस्कृतांत कथा ह्मणतात सांप्रत तर कथा शब्दाचा विशेष प्रचार नसून त्याच्याबद्दल कादंबरी हाच शब्द रूढीत आला आहे. बहुतकरून प्रसिद्ध कवि **बाणभट्ट** याची **कादंबरी** ही कथा या नांवांत समाविष्ट होणाऱ्या ग्रंथांत मुख्य असल्यामुळें तिचेंच नांव प्रचारांत आलें असावें असें वाटतें.

ष्ठला आहे; म्हणून आम्हीं आमच्या ग्रंथाला **आर्यचाणक्य** असें नांव दिलें आहे.

या पुस्तकमालेंत यापूर्वी जे ग्रंथ आम्हीं तयार केले त्यांला विशेष विवेचनपूर्वक उपोद्धात वगैरे देण्याचा प्रयत्न केला नाहीं. कारण त्यांतला विषय बहुतकरून साधारण समजुतीच्या वाचकांस देखील समजण्यासारखा व कांहीं अंशीं त्याच्याच उपयोगाचा असल्यामुळें फारशी खटपट न करतां थोडक्यांत ग्रंथाचें स्वरूप समजेल इतकीच माहिती देण्याचा क्रम ठरविला होता. पण प्रकृत पुस्तक हें विशेष महत्वाचें असून याचा विषय निराळ्या प्रकारचा आहे. सामान्य व विशेष समजुतीच्या सर्व लोकांच्या हें आदरास पात्र होण्यासारखें असल्यावरून विशेष विवेचन केलें आहे. तरी ज्याला तें वाचण्याची इच्छा नसेल त्याचा गोंधळ न व्हावा याकरितां उपोद्धातरूपानें तें स्वतंत्रच जोडलें आहे. पूर्वीप्रमाणेच प्रियवाचकांनीं याचाही प्रेमपूर्वक स्वीकार करावा अशी त्यांस विनंती आहे.

मुंबई
गिरगाव पोर्तुगीज चर्चलाईन
घ० नं० २०
तारीख १ जानेवारी १८००.

वा. शा. इ

# उपोद्घात.

या जगांत प्रत्येक पुरुषाला—मग तो मनुष्य असो, देव असो किंवा दैत्य असो—ज्ञान हें अवश्य पाहिजेच आहे. तें नसलें तर त्याच्या हातून व्यवहार सरळ होत नाहीं, अर्थात् त्याला पशूची योग्यता प्राप्त होते. ज्ञान अनेक प्रकारचें आहे व तें होण्याचीं साधनेंही अनेक आहेत; तथापि लहानथोर सर्वसाधारणांला बहुश्रुतपणा, साधारण विवेचनशक्ति व वर्तन करण्याचा मार्ग उत्तम कोणता ह्याचे ज्ञान अवश्य असलेंच पाहिजे. त्याच्यावांचून अगदीं चालत नाहीं. तें नसलें तर पदोपदीं नुकसान होतें, दुःखें भोगावीं लागतात, उपहास होतो, असे अनेक अनर्थ प्राप्त होतात. याशिवाय कोणाच्याही मनाची स्थिति सार्वकाळ एकसारखीच रहात नाहीं. कामक्रोधादि शत्रु त्याला वरचेवर आपल्या ताब्यांत घेण्याविषयीं प्रयत्न करीत असतात व तसें झालें ह्मणजे त्याच्या हातून अनेक अनर्थ घडतात. अशा वेळीं ज्ञानाची फारच गरज लागते. ज्ञान असलें ह्मणजे त्याच्या साह्यानें त्या शत्रूंला पिटाळून आपलें मन स्थिर ठेवितां येतें. तेव्हां एकंदरीत उपयुक्त ज्ञान अवश्य असलेंच पाहिजे असें सिद्ध होतें.

जगाचा इतिहास—त्याच्या उत्पत्तीपासून हावेळपर्यंतचा—नीट मनन करून पाहिला तर ज्ञान हें दिवसेंदिवस वाढत जात आहे असें दिसून येईल, व कोणताही पुरुष जन्मतःच आवश्यक किंवा विशिष्टज्ञानसंपन्न असण्याचा संभव नाहीं हेंही उघडच आहे. तेव्हां त्याला वर सांगितलेलें उपयुक्त ज्ञान संपादन करण्याविषयीं कांहीं साधनें पहावीं लाग-

ात. त्या साधनांत मुख्य साधन ह्मटलें तर पूर्वीचीं उदा·रणें—अर्थात् आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या पुरुषांच्या चरि·ांचें लक्ष्यपूर्वक अवलोकन करणें व त्यांतल्या वाईट गोष्टी ोडून चांगल्या गोष्टींचें ग्रहण करणें हें मुख्य होय. सां·ात उपलब्ध असलेलीं सर्व काव्यें पाहिलीं तर तीं पूर्वी ालेल्या पुरुषांचीं चरित्रेंच आहेत असें ह्मणण्यास कांहीं रकत नाहीं. अर्थात् काव्यें लक्ष्यपूर्वक वाचणें हें ज्ञान·संपादनाचें एक मुख्य साधन आहे असें ह्मटलें पाहिजे. अशा प्रकारचीं काव्यें मोठमोठ्या विद्वान् व परोपकारी लोकांनीं असंख्य करून ठेवलीं आहेत व त्यांच्यापासून अनुभविक ज्ञान संपादन करून लोक दिवसेंदिवस विशेष प्रकारची सुधारणा करीत गेले हें इतिहासावरून सिद्ध होतें.

आतां हा काव्यरूपी ज्ञानसंपादनाचा मार्ग कसा सुरू झाला याविषयीं थोडेसें विवेचन केलें पाहिजे. आर्यलो·कांच्या सर्व प्राचीन ग्रंथकारांनीं—मनुष्य हे अज्ञानी असून ज्ञानसंपन्न काय ते देव, प्रत्येक गोष्ट देवांनीं मनुष्यांला दिली अथवा एकंदरींत देव हे मनुष्याचे मार्गदर्शक, असें वर्णन केलें आहे. जसें ज्योतिष, वैद्यक, न्याय, व्याकरण इत्यादि ज्ञानाचीं साधनें जीं शास्त्रें तीं प्रथम देवांनीं मनु·ष्यांला दिलीं असें वर्णन आहे, त्याप्रमाणें काव्येंही प्रथम देवांनींच रचून दाखविलीं असें प्राचीन ग्रंथकार वर्णन करि·तात. जगाचा आदिपुरुष जो **ब्रह्मदेव** तो पहिला कवि असें प्राचीन ग्रंथांत अनेक ठिकाणीं वर्णन केलें आहे. **ब्रह्मदेवाची** कविता ह्मटली ह्मणजे वेद हे होत. **ब्रह्मदेवानं**तर इतर देवही कविता करीत असत तथापि ती पुष्कळ वर्षेंपर्यंत मनुष्यांला प्राप्त झाली नव्हती.

मनुष्यांत पहिला कवि **वाल्मीकऋषि. वाल्मीकाला ब्रह्मदेवानें** कविता करण्याविषयीं परवानगी दिली व नंतर त्यानें काव्य करण्यास प्रारंभ केला. त्याचें काव्य ह्मटलें ह्मणजे **रामायण.** अयोध्येचा राजा **दशरथ** याचा पुत्र जो **रामचंद्र** त्याचें चरित्र कविताबद्ध रचून **वाल्मीकानें** मनुष्यमात्राला रामायणरूपी अनुभविक ज्ञान संपादनाचा एक मोठा मार्ग तयार करून दिला व त्यानंतर, **व्यास, गुणाढ्य, कालिदास** इत्यादि मोठमोठ्या कवींनीं अनेक काव्यें रचलीं व त्यांपासून पुढच्या संततीला अनेक लाभ झाले.

येथवर आम्हीं जें वर्णन केलें आहे तें श्रव्य अर्थात् केवळ ऐकण्यास योग्य अशा काव्यांविषयींचेंच आहे. कारण अनुभविक ज्ञान मिळण्यास साधनीभूत अशीं जीं चरित्रें तीं केवळ ऐकूनच त्यापासून ज्ञान मिळविण्याची पुष्कळ दिवस रूढि चालली होती; पण पुढें ऐकण्यापेक्षां प्रत्यक्ष पाहिल्यानें लौकर व उत्तम प्रकारें ज्ञान प्राप्त होईल अशी समजूत झाल्यावरून दृश्यकाव्यें—अर्थात् ज्या काव्यांत ज्या नायकाचें जसें चरित्र वर्णन केलें असेल तसा पात्रद्वारा त्याचा अभिनय करून पाहण्याचा मार्ग सुरू झाला. जशी श्रव्यकाव्यांची सुरवात **ब्रह्मदेवापासून** झाली तशीच या दृश्यकाव्यांचीही सुरवात त्याच्या पासूनच झाली. **ब्रह्मदेवानें** प्रथम **वेदरूपी** जें श्रव्यकाव्य केलें होतें त्यांतलें सार काढून त्यानें नंतर **नाट्यवेद** अर्थात् नाटक करण्याचें शास्त्र उत्पन्न केलें. **ब्रह्मदेवानें** जी कविता केली तिला **वेद** असें ह्मणण्याचा संप्रदाय असल्यावरून त्यानें जें नाटकाचें वर्णन केलें त्यालाही **नाट्यवेदच** ह्मणूं लागले. **ब्रह्मदेवानें** नाटकें रचून मात्र तयार केलीं तरी त्यांचा

प्रयोग झाला नव्हता. तो **भरतमुनींनें** सुरू केला. त्यावेळीं **महादेवानें** तांडवनृत्य व **पार्वतीनें** लास्यनृत्य हीं उत्पन्न केलीं. त्यानंतर देवलोकांत नाटकाचा परिपाठ पडत गेला. **भरतमुनीनें** अनेक नाटकांचे प्रयोग केल्याचें पुष्कळ ग्रंथांत वर्णन केलें आहे. याप्रमाणें प्रयोग करण्याची रीत सुरू झाल्यापासून पूर्वी जीं केवळ श्रव्यकाव्येंच होतीं त्याठिकाणीं नंतर दृश्य आणि श्रव्य अशीं दोन प्रकारचीं काव्यें होऊं लागलीं.

श्रव्यकाव्यें जशीं देवांपासून सुरू झालीं तशींच दृश्यकाव्येंही त्यांच्यापासूनच झालीं हें वर सांगितलेंच आहे. श्रव्यकाव्य करणारा जसा **वाल्मीक** हा प्रथमचा आहे तसा दृश्यकाव्य करणारा मनुष्यलोकांत प्रथम कोण झाला याविषयीं मात्र प्राचीन ग्रंथांत ह्मणण्यासारखा कांहीं आधार मिळत नाहीं. आजकाल जितकीं दृश्यकाव्यें अर्थात् नाटकें वगैरे उपलब्ध आहेत त्यांत **कालिदासा**च्या पूर्वींच्या कोणाही नाटककाराचा ग्रंथ आढळत नाहीं. **भास, सौमिल, कविपुत्र*** इत्यादि पूर्वी नाटककार होते असा फक्त उल्लेख मिळतो; पण त्याचे ग्रंथ मिळत नाहींत दृश्य काव्याचे नियम वगैरे फार थोडे आहेत व ते देवानीं करून दिले असल्याचें कोठें आढळतही नाहीं; पण नाटकादिकांचे नियम फार आहेत व ते प्रथम देवांचा नाट्याचार्य जो **भरतमुनी** त्याणें रचिल्याचें प्रसिद्ध आहे. त्याच्यानंतर नाट्याचे नियम करणारे पुष्कळ झाले तरी त्या सर्वांला मुख्य आधार काय तो **भरतमुनी**च्या ग्रंथाचाच आहे.

आज नाटकग्रंथांची जी सुधारणा व अनेक विशेष

*संस्कृत मालविकाग्निमित्र नाटकाची प्रस्तावना पहा.

प्रकारचे नियम दिसून येतात ते अगदी पहिल्या प्रथमपासून—ह्मणजे दृश्यकाव्याची सुरवात झाली तेव्हांपासून, चालू झाले होते असे दिसत नाहीं. प्रथम कांहीं एखाद्या प्रसंगावर कविता रचून त्या गाऊन दाखविण्याची प्रवृत्ति पडली असावी व त्यानंतर अभिनयाची प्रवृत्ति होऊन निरनिराळीं पात्रें व त्याचें परस्परांशीं वर्तन वगैरे प्रकार सुरू होऊन नंतर त्याविषयीं विशेष प्रकारचे नियम वगैरे झाले असावे. याविषयीं विवेचनपूर्वक प्राचीन ग्रंथ अवलोकन केले असतां भरपूर माहिती मिळते. सर्व काव्यांत **रामायण** हें आदिकाव्य असें वर सांगितलेंच आहे. **रामायणांत** नाटकप्रयोगाचा कोठेंच उल्लेख मिळत नाहीं. **वाल्मीकानें** आपण केलेलें काव्य अर्थात् **रामायण** आपले शिष्य **कुश** आणि **लव** यांच्याकडून तालसुरावर **रामाच्या** सभेंत गावविल्याचा उल्लेख उत्तर कांडांत आहे.* तसेंच 'नट' व 'नर्तक' हे शब्दही त्यांत आढळतात.† **रामाच्या** यज्ञांत 'नट' व 'नर्तक' आले होते असें वर्णन आहे तथापि ते एखादा प्रसंग घेऊन गाणारे व अभिनय करणारे असावेत असें वाटतें. नाटकाचा प्रयोग करण्याची रीत **भरतमुनी**नेच सुरू केली असा आधार मिळतो. **भवभूतीनें उत्तररामचरितांत वाल्मीकानें** नाटक रचिलें असून त्याचा **भरतमुनीनें** अप्सरांकरवीं प्रयोग करविला होता असें वर्णन केलें आहे. ते कसेंही असो; **भरतमुनीपासून** ‡नाट्याची सुरवात झाली, असें ह्मणण्यास कांहीं बाध नाहीं.

---

* याविषयीं वा. रा. उ. का. सर्ग १०६-१०७ यांत सविस्तर वर्णन आहे.

† **वाल्मीकि रामायण** उ. का. सर्ग १०४ श्लोक १५ पहा.

‡ याविषयीं संस्कृत **उत्तररामचरिता**च्या ४ थ्या अंकांतलें अकरावें अथवा आम्हीं केलेल्या **करुणराघवाचें** पृ. १३१ यावरील **लवाचें** भाषण पहा.

## नाटकग्रंथांविषयीं.

यावरून नाटक* या नांवाचा ग्रंथ कसा असतो, त्याचें स्वरूप, त्याचे नियम, त्याची रचना, वगैरे कशी असते, हें समजून घेण्यास संस्कृत भाषेवांचून विज्ञात जगांतल्या दुसऱ्या कोणत्याही भाषांत साधन नाहीं, असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. सांप्रत व दोन तीन शतकांपूर्वी केवळ देशभाषेंत—म्हणजे संस्कृत नाटकांचा आधार न घेतां—नाटकें रचण्यांत आलीं आहेत तरी तीं अगदीं स्वतंत्र म्हणतां येत नाहींत. त्यांच्या कर्त्यांनीं संस्कृत कवींनीं रचलेल्या कोणत्याही एकाद्या नाटकाचें भाषांतर केलें नसलें तरी त्यांच्या कल्पना व त्यांची रचना संस्कृतांतूनच घेतली आहे असें म्हटलें पाहिजे. तेव्हां नाटकग्रंथ हे संस्कृत भाषेवांचून या भरतखंडांतल्या कोणत्याही देशभाषेंत स्वतंत्र रीतीनें रचल्याचें आढळून येत† नाहीं असें सिद्ध होतें.

तसेंच वाङ्मयाचा उदय प्रथम भरतखंडांत झाला असून तेथून त्याचे किरण चहूंकडे फांकले ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे.

सांप्रत पाश्चात्य लोकांचा अनायास विशेष सहवास झाला असून त्यांच्या भाषांतील ग्रंथांचें आम्हांस चांगलें परिशीलन होऊं लागलें आहे. त्यामुळें अगदीं अलिकडच्या

---

* नाटक हा शब्द केवळ सर्वसामान्य घेतला आहे. व त्यावरून एकंदरांत दृश्यकाव्याचे भाण, प्रहसन इत्यादि जे पोटभेद आहेत त्यांचाही येथें या शब्दांत आम्हीं समावेश केला आहे असें समजावें.

† द्राविडी, तेलंगी इत्यादि भाषांत फार जुन्या काळीं नाटकग्रंथांची स्वतंत्र रचना झाली असल्याचें दिसून येतें. महाराष्ट्र, गुजराथी, बंगाली इत्यादि भाषांत मात्र इंग्रेजी शिक्षणाची सुरवात झाल्यावर व मुद्रणकला पसार पावल्यावर नाटकग्रंथांची रचना झाली आहे.

काळांत अनेक नाटकें त्यांच्या पद्धतीवर रचलीं असल्याचे दिसून येतें. व त्यावरून पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे कीं, सांप्रत नाटकग्रंथ रचण्याच्या कामांत विशेष सुधारणा झाली आहे. देशभाषेंत नाटक रचणाऱ्या कोणत्याही ग्रंथकाराला पूर्वी संस्कृत नाटकाचे अनुकरण करावें लागत होतें. त्या ऐवजीं आतां पाश्चात्य नाटकांची रीत घ्यावयास मिळते. यामुळें एक नवी व स्वतंत्र पद्धत आपल्या भाषेंत आणण्यास चांगली सवड झाली हें त्यांचें ह्मणणें फार थोड्या अंशानें कबूल करतां येईल, पण जशी संस्कृत भाषेंत नाटकग्रंथांची स्वतंत्र रितीनें उत्पत्ति झाली, तशीच युरोपिअन भाषांतही त्यांची स्वतंत्र रितीनें उत्पत्ति झाली आहे, असें जे कित्येकांचे म्हणणें आहे तें मात्र कबूल करतां येत नाहीं. कारण इंग्लिश, जर्मन, फ्रेंच इत्यादि भाषांत जीं अनेक काव्यें व नाटकें झालीं आहेत त्यांची रचना कांहीं निराळ्या प्रकारची आहे. तथापि त्याची कल्पना मुळीं संस्कृत भाषेच्याच द्वारानें त्याना प्राप्त झाली असावी असें वाटतें. फ्रेंच, इंग्लिश, जर्मन वगैरे लोकांनीं ज्या विद्या आणि कला संपादन केल्या त्या बहुतकरून ग्रीक आणि रोमन या लोकांपासूनच घेतल्या आहेत, हें ते लोक उघडपणें कबूल करितात. ग्रीक लोकांचा आम्हां आर्यलोकांशी अगदीं निकट संबंध आहे. अलेक्झांडर वगैरे भरतखंडावर स्वाऱ्या करणाऱ्या प्रतापी पुरुषांनीं या देशांतून हजारों संस्कृत ग्रंथ व अनेक पंडित आपल्या देशांत नेले होते, हे इतिहासप्रसिद्ध आहे. यावरून पाहतां नाटक* ही कल्पना

* नाटक हा शब्द उपलक्षणार्थ आहे. यावरून वाङ्मय अथवा इंग्रेजीत ज्याला Literature म्हणतात त्याचें ग्रहण केलें आहे.

संस्कृत भाषेच्या द्वारें **ग्रीक** लोकांना प्राप्त झाली व त्यांच्या कडून **रोमन** लोकांला प्राप्त होऊन त्यांच्याकडून इंग्लिश **फ्रेंच** वगैरे लोकांनीं घेतली यांत कांहीं संशय नाहीं. यावरून कोणी अशी शंका काढील कीं वर लिहिल्याप्रमाणे कदाचित् मानतां येईल; पण, **ग्रीक** लोकांच्या कारर्किर्दीत संस्कृत भाषेंत नाटकग्रंथ होते कीं काय? या संशयाचें निराकरण करणें फारसें कठीण नाहीं. **महाभारताचा** काल* बहुतकरून आतां निश्चित झाल्यासारखा आहे. **हरिवंश** ही **महाभारताचीच** पुरवणी आहे. मूळ **महाभारतांत** नाटक व नाटकी हे शब्द उपलब्ध होतात. व **हरिवंशांत** तर नाटकाबद्दल एक लाबलचक मोठा इति-

* **महाभारताच्या—उद्योगपर्व** अ० १४३ श्लो० १, **भीष्मपर्व** अ० ३ श्लो० १३ व १७ आणि अध्याय १७ श्लो० २ यांत जी ग्रहांची स्थिति वर्णन केली आहे तीवरून भारतीयुद्ध शालिवाहनशकाच्या पूर्वी ५००६ व्या वर्षी झालें असें रा० रा० **विसाजी रघुनाथ लेले** यांणीं सूक्ष्म गणितावरून सिद्ध केलें आहे. (याविषयीं शके १८०३ आश्विन व० ३० चा **ज्ञानप्रकाशाचा** अंक पहावा) यावरून चालू सालीं भारती युद्धाला ५११७ वर्षे झालीं असें सिद्ध होतें. हें युद्ध झाल्यावर लगेच **युधिष्ठिर** गादीवर बसला. त्याणें ३६ वर्षे राज्य केलें. नंतर **परीक्षिति** गादीवर बसला त्याणें २४ वर्षे राज्य केलें. नंतर **जनमेजय** गादीवर बसताच त्याणें सर्पसत्राला प्रारंभ केला व त्यांत **भारत** हा ग्रंथ **वैशंपायनानें** त्याला सांगितला, यावरून भारतीयुद्ध आणि **भारत रचण्याचा** समय यांत सुमारें ६० वर्षांहून अधिक अंतर नसावें हें उघड होतें. तथापि इतकाही काळ गेला नाहीं. **परीक्षितानें** मरणसमयीं **भागवत** ऐकलें त्यांत **भारताचा** उल्लेख आहे. तस्मात् **युधिष्ठिराच्या** हयातींतच भारत झालें आहे यांत संशय नाहीं.

† **हरिवंशाच्या विष्णुपर्वांत** ९१ अध्यायापासून ९७ अध्यायापर्यंत **वज्रनाभवधाचें** आख्यान वर्णन केलें आहे. त्यांत **भद्र** नावाचा कोणी एक नट होता. व त्याच्या नाट्यकलेनें प्रसन्न होऊन **महर्षींनीं** त्याला अनेक दिव्य वर दिले होते त्याणें **प्रद्युम्न, सांब** इत्यादि **कृष्णाच्या** पुत्रांला नाटक शिकविलें होतें. व **प्रद्युम्नादिकांनीं** नाटकी बनूनच **वज्रनाभ** दैत्याच्या

हामंच वर्णन केला आहे. तेव्हां ग्रीकलोकांच्या वेळीं संस्कृत भाषेंत नाटकें होतीं किंवा नाहीं असा संशय घेण्याचें कांहीं योग्य कारण दिसत नाहीं.

पण या संबंधानें, संशय येण्यास जागाच नाहीं. कारण कालगणनेवरून ह्या गोष्टीचा खुलासा होतो ग्रीक लोकांचा इतिहास धुंडून पाहिला तर ख्रिस्ती सनाच्या पूर्वी सुमारें ६०० वर्षांच्या पलीकडे त्यांचें अस्तित्व होतें असे ह्मणण्यास कांहींच आधार नाहीं. किंबहुना ग्रीक हें नांवदेखील त्यावेळीं त्यांला नव्हतें. त्यावेळीं विद्यादेवीशीं त्यांचा बिलकूल परिचय नव्हता असे इतिहास सांगतो. सांप्रत आपल्या देशांत अडाणी लोक जशा लावण्या वगैरे ह्मणतात तशी त्यांच्यांत कविता ह्मणण्याची चाल होती. नंतर ते लोक त्यांत कांहीं सुधारणा करावी ह्मणून एशिया-मायनर मध्यें आले व तेथील लोक विद्याकलासंपन्न असल्यावरून त्यांच्यापासून ग्रीक लोकांनीं विद्यासंपादन करण्यास सुरुवात केली. ही गोष्ट ख्रिस्ती सनापूर्वी सुमारें ५०० वर्षांची आहे व येथून ग्रीकवाङ्मयाला प्रारंभ झाला. ग्रीक लोकांचें वाङ्मय सुधारण्याविषयीं प्रयत्न करणारा पहिला पुरुष एपिकार्मस ह्याणें प्रथम त्याला कांहीं सुधारणेचें स्वरूप दिलें. व त्यानंतर हळूहळू तो मार्ग सुरू झाला. ट्राजेडी आणि कॉमिडी हे भेद त्यावेळीं मोठ्या चमत्कारिक रितीनें प्रचारांत आले. खेड्यापाड्यां-

नगरात प्रवेश करून त्याची कन्या प्रभावती हिला वरलें, व शेवटीं त्या दैत्याचा वध केला. अशी कथा सविस्तर वर्णन केली आहे. यावरून नाटकाची कल्पना आर्य लोकात फार प्राचीन काळापासून चालत आली आहे असें सिद्ध होतें. नाट्याचार्य भरतमुनि हा तर आपल्या नाट्यविद्येला वेदच म्हणतो.

तले लोक जीं अचकट विचकट शृंगारिक गाणीं गात असत त्याला 'कामेडी' ह्मणत, व शहरांतले लोक **डायोनिसस** (ग्रीक लोकांचा मुख्य देव) याचीं जीं चरित्रें गात असत त्याला ट्राजेडी ह्मणण्याचा प्रचार पडला. नंतर हळूहळू अभिनय सुरू झाला, बहुतकरून ट्राजेडींत **डायोनिसस** देवाच्या दुःखांचें व शोकाचें वर्णन असल्यावरून लोक त्याला ट्राजेडी ह्मणूं लागले व त्यावरूनच सांप्रत पाश्चात्य लोकांच्या दुःखपरिणामी नाटकाचें जें स्वरूप दृष्टीस पडतें आहे तें हळूहळू बनत गेलें. अभिनय प्रथम सुरू झाला त्यावेळीं एकच पात्र सर्व प्रकारचा अभिनय करीत असे. पुढें त्याच्या मदतीला दुसरा देऊं लागले असें करतां करतां पात्रांची संख्या वाढत गेली. इतकें झालें तरी त्यावेळच्या **ग्रीक**लोकांच्या नाटकाचे विशेष प्रकारचे नियम वगैरे कांहीं नव्हते, ते **अरिस्टाटल्** ह्यानें केले. याला **ग्रीक** लोकांचा—(दशरूपककर्ता) **धनंजय** ह्मटलें तरी चालेल. **अरिस्टाटल्** हा **अलेकझान्डरचा** गुरू होता. त्याच्या विद्येची ख्याति व त्याचे ग्रंथ वगैरे **अलेक्झान्डरच्या** नंतर झालेले आहेत. **अलेक्झान्डर** ख्रिस्ती सनापूर्वी ३२३ व्या वर्षी वारला. त्यानें **भरतखंडांतून** परत जाते वेळीं अनेक मोठमोठे विद्वान् व ग्रंथ आपल्या देशांत नेले होते हें प्रसिद्धच आहे. यावरून **ग्रीक** लोकांच्या वाङ्मयाची सुधारणा ख्रि. स. पूर्वी सुमारें तीनशें वर्षांवर झाली. आतां **भरतखंडांत** केव्हां झाली तें पाहूं.

**आर्य** लोकांचे प्राचीन ग्रंथ चाळून पाहिले असतां हे लोक फार प्राचीन काळापासून विद्याचारसंपन्न असल्याचें दिसून येतें. जरी त्यांच्या सुधारणेला अमुकच वर्षें झालीं

असें सांगवत नाहीं; तरी लाखों वर्षांपूर्वी ते विद्याचारसंपन्न होते हें सिद्ध करून दाखविण्यास अनेक प्रमाणें आहेत. तथापि आह्मी त्यांचा येथें उपयोग करून दाखवीत नाहीं. युरोपियन लोक नेहमीं आह्मां लोकांच्या सुधारणेला अर्वाचीन ठरविण्याचा प्रयत्न करीत असतात, व त्यांच्या विचारसरणीनें ज्यांचीं मनें दूषित झालीं आहेत असे आमच्यांतले पुष्कळ लोक आपल्या प्राचीन ग्रंथकारांवर विश्वास ठेवीत नाहींत, ह्मणून आह्मी आमच्या विद्याचारसंपन्नतेचा काळ युरोपियन लोकांच्या मताप्रमाणेंच घेतों. असें केलें तरी ग्रीकांपूर्वी पुष्कळ शतकें आह्मी विद्याचारसंपन्न होतों असें दिसून येतें.

युरोपांत जे प्राचीन मोठे मोठे विद्वान् होऊन गेले त्या सर्वांनीं विद्यादेवीचा प्रथमावतार **आर्यलोकांत** झाल्याचें वर्णन केलें आहे. प्रसिद्ध ऐतिहासिक संस्कृत ग्रंथ **राजतरंगिणी** याचें भाषांतर करणारा क्यापट्न् **ट्रायर** ख्रिस्ती सनापूर्वी २००० वर्षे * **काश्मीर** देशांत **वैदिकधर्मी** आणि **बौद्धधर्मी** लोकांची धर्मसंबंधानें खडाजंगी चालली होती असें ह्मणतो. ख्रि. पू. २००० वर्षे भरतखंडाची सुधारणा झाली होती असेंही तोच ह्मणतो, इतकेंच नव्हे तर **रामचन्द्र** याच्या पूर्वींचा † आहे हेंही तो कबूल करतो.

---

* "In the history of this country (Cashmere), we find 20 centuries B.C. there were religious troubles, the religion of the Vedas is opposed to that of the Budhists." ( *See Capt. Troyer, Paris,* 1840, *pub* "*Société Asiatique,*" *journal* 1841.

† "I cannot refrain from repeating what I said elsewhere (Raja Tarangini, vol. ii, p. 372). 1. That according to my firm persuasion, the epoch of the commencement of Kali

या विषयाच्या संबंधानें आणखीं पुष्कळ ग्रंथकारांचीं अशा प्रकारचीं मतें आहेत. त्या सर्वांचा विचार केला असतां सुमारें ५००० वर्षांपूर्वी **आर्य** लोक विद्याचारसंपन्न होते ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. तेव्हां यावरून पाहतां ज्याचें अस्तित्व सुमारें २५०० वर्षांपूर्वी नव्हतें त्या **ग्रीक** लोकांपूर्वी आर्यलोक विद्याचारसंपन्न होते हें उघड सिद्ध झालें.

आतां **ग्रीक**लोकांनीं **आर्य**लोकांपासून वाङ्मय घेतलें किंवा नाहीं याचा विचार केला पाहिजे. ज्याला **आर्य** लोकांच्या वाङ्मयाशीं विशेष परिचय घडला आहे व ज्याला या **भरतखंडाची** विशेष माहिती आहे असे अनेक पाश्चात्य पंडित ही गोष्ट प्रांजलपणें कबूल करतात कीं, **ग्रीक**लोकांनीं **आर्य**लोकांपासून विद्या आणि कला घेतल्या आहेत. बाकीचे सर्व एकीकडे असोत, महाविद्वान् व शोधक असा जो **पोकाक्** साहेब त्याच्याशीं आम्ही आपल्या वाचकांचा येथें परिचय करून देतों. या विद्वान् गृहस्थानें "इन्डिया इन् ग्रीस" हा मोठा ग्रंथ याच विषयावर रचला आहे. ज्यांला इंग्रेजी येत असेल त्यांणीं हा

---

Yuga, B. C. 3102, is historical in the general sense of the term, that after reducing to their lowest possible values all the historical traditions and chronological data of the Chinese, Hindoos, Persians, Phœnicians, Egyptians, and other nations, and after considering and appreciating the monuments of art, science, and the religious and political institutions, a knowledge of which has reached us, I cannot refuse credence to the fact, namely, that great States, highly advanced in civilization, existed at least 3,000 years before (*) our era It is beyond that, that I look for Rama, the hero of Ramayana.

ग्रंथ लक्ष्यपूर्वक वाचून पहावा. या साहेबांनीं भरतखंडाला चित्र* आणि ग्रीसला पडदा कल्पिला आहे. व पडदाच चित्र होऊन† बसला आहे याकरितां आतां आपण तो पडदा एकीकडे सारून चित्र खुलें करतो, असे त्यांणीं ह्मटलें आहे. याप्रमाणेंच आणखीं पुष्कळ विद्वान् लोकांचे मत आहे. जार्मण्यदेशीय प्रो. वेबर इत्यादि विद्यमान काळचे काहीं पंडित दुराग्रहानें उलट प्रतिपादन करतात, पण त्यांस मजबूत आधार नाहीं.

यावरून नाटक या ग्रंथाची कल्पना पृथ्वीवरील सर्व लोकांना संस्कृत कवींनीं उत्पन्न करून दिली, हें तर सिद्ध झालेंच. युरोपिअन लोकांच्या भाषांत नाटकग्रंथाची कल्पना संस्कृत भाषेच्या द्वारे गेल्यानंतर त्यांच्यांत तिला दुसरें एक रूप प्राप्त झालें. म्हणजे शोकपर्यवसायी‡ आणि

* The case may be stated as follows—The *picture* is *Indian*—the Curtain is Grecian, and that Curtain is *now withdrawn*. (See Introduction, page 8, India in Greece, by Pococke.)

† युरोपियन लोकांची साधारणत अशी समजूत होती कीं, या जगांत विद्याकलादिकांचा उदय प्रथम काय तो ग्रीसमध्यें झाला, व ग्रीकलोकांपासून सर्वांला त्यांची प्राप्ति झाली. या अज्ञाणी समजुतीमुळे आर्यलोकांला देखील ग्रीकलोकांपासूनच विद्या आणि कला यांची प्राप्ति झाली असें ते लोक समजत असत. वस्तुतः आर्यांपासून ज्ञान संपादन करून ग्रीशियनानीं त्याला ( युरोपियनलोकांच्या अज्ञाणी समजुतीप्रमाणें ) अगदीं दडवून टाकलें ह्मणून पोकाक साहेबानीं आर्यांला चित्राचें व ग्रीकलोकांला पडद्यांचें रूपक देऊन तो पडदा सप्रमाण रितीनें काढून टाकला आहे.

‡ शोकपर्यवसायी अथवा इंग्रेजींत ज्याला 'Tragedy' ह्मणतात त्या प्रकारचीं नाटकें संस्कृतांत मुळींच आढळत नाहींत मूळ कथानक जरी दुःखपर्यवसायी असलें, तरी नाटककर्ता आपल्या संविधानकांत त्याचा शेवट गोड करून दाखवितो. उदाहरणार्थ, उत्तररामचरित घेतलें तर चालेल.

आनंदपर्यवसायी असे नाटकाचे परस्पर विरोधी दोन भेद झाले आहेत. तथापि मूळरचनेत कांहीं अंतर पडलें नाहीं. याशिवाय संस्कृतांत जसे भाण, प्रहसन इत्यादि अनेक पोट-भेद झाले आहेत तसे युरोपिअन कवींनी केले असल्याचें कोठें दिसून येत नाहीं, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. असो. येथवर केलेल्या विवेचनावरून ज्ञानसंपादनाचा मुख्य मार्ग जो वाङ्मय ते आर्यलोकांस प्रथम प्राप्त झालें, व त्यांणीं आपली अभियुक्त भाषा जी संस्कृत तिच्या द्वारानें ज्याचा सर्व जगास लाभ करून दिला त्या वाङ्मयरूपी भाण्डारांत जीं अनेक काव्यरत्नें आहेत त्यांतल्या दृश्यवर्गापैकीं कांहीं रत्नें वाचकांस आह्मी पूर्वी सादर केलीं आहेत. त्या सर्वांहून निराळ्या प्रकारचें असून अति उत्तम अशा **मुद्राराक्षसाच्या** आधारानें तयार केलेलें हें **आर्यचाणक्य**रूपी रत्न सांप्रत रसिकांस सादर करीत आहों. श्रव्यापेक्षां दृश्यांतील संवि-धानकाचा लोकांच्या मनावर लवकर असर होतो हें वर सांगितलेंच आहे. या पुस्तकाचें मूळ दृश्यापैकीं असल्या-

मूळकथेंत रामाचा आणि सीतेचा शेवट फार दुःखकारक झाला आहे; पण भवभूतीनें तो किती गोड करून दाखविला आहे पहा. यावरून पाश्चात्य नाटककाराचे भक्त पौरस्त्य नाटककाराला मोठा दोष देतात. त्याच्या मतें दुःखपर्यवसायी नाटकातील संविधानकाचा सामाजिकाच्या मनावर जितका विशेष असर होतो तितका आनंदपर्यवसायी नाटकाच्या संविधान-काचा होत नाहीं, पण या आक्षेपात फारसें महत्त्व नाहीं. कारण, सद्वर्तना-विषयीं लोकास अभिरुचि उत्पन्न करावी हा जर नाटकाचा मुख्य उद्देश आहे, तर तो दुःखपर्यवसायी नाटकांत कसा सिद्ध व्हावा, हें समजत नाहीं. पातिव्रत्यानें व सदाचरणानें वागणाऱ्या **देस्डिमोना** आणि **ह्याम्लेट** याचा दुःखकारक शेवट पाहून पातिव्रत्य व सदाचरण ठेवण्याविषयीं प्रेक्षकाला विशेष आस्था उत्पन्न होईल काय? थंड हवेनें गोठलेल्या पाश्चिमात्याच्या हृदयाला द्रव येण्यास कदाचित् शोकपर्यवसायी नाटकाची जरूर असेल; पण आमच्या सारख्या उष्ण हवेंत राहणारांचें हृदय मध्यंतरी येणाऱ्या प्रसंगांनीच द्रवतें.

मुळें तें जशास तसेंच सादर केलें असतें तर त्याचा प्रेक्षकांइतका वाचकांस उपयोग झाला नसता. ह्मणून मूळ रचनेचा उद्देश कायम ठेवून केवळ वाचनद्वाराच रसाचा आस्वाद घेता येईल अशा प्रकारें त्याला सजवून रसिकांस सादर केलें आहे.

---

## विशाखदत्ताविषयीं माहिती.

आतां आमच्या ह्या पुस्तकाला आधारभूत जें **मुद्राराक्षस** नाटक तें कोणत्या काळांत झालें याविषयीं थोडासा विचार करूं. मूळ ग्रंथाचा कर्ता जो **विशाखदत्त** त्याणें स्वत:विषयीं फारच थोडी माहिती सांगितली आहे. "**वटेश्वरदत्त** नांवाच्या मांडलिक राजाचा नातू व **पृथु** याचा मुलगा, ज्याला महाराज ही पदवी होती असा कवि **विशाखदत्त** याणें केलेले हे **मुद्राराक्षस** नाटक" असें प्रस्तावनेंत वर्णन केलें आहे. यावरून प्रो. **विल्सन** यांणीं असें अनुमान काढलें आहे कीं **चोहाण** कुळांतील **अजमीर**चा राजा **पृथुराई** अथवा **पृथुराज** आणि **विशाखदत्ताचा** पिता **पृथु** हा एकच; पण या मताला दुसरा कांहीं आधार मिळत नाहीं व हे सयुक्तिकही दिसत नाहीं. **विशाखदत्ताचा** बाप **पृथु** हा फारसा प्रसिद्ध नसावा असें वाटतें. कारण कवीनें आपल्या आजाच्या नावाला 'सामंत' व आपल्या नांवाला 'महाराज' पदवी जोडली असून बापाच्या नांवाला मुळींच जोडलेली नाहीं. **अजमीर**चा **पृथुराज** चव्हाण हा फार प्रख्यात व मोठा शूर असून महाराज होता असें त्याच्या चरित्रावरून उघड होतें. तेव्हां या कवीच्या संबंधानें या रितीनें विचार करण्यापेक्षां दुसरी एक रीत विशेष संभवनीय असल्यावरून ती घ्यावी हे बरें वाटतें.

उत्तर हिंदुस्थानांत नांवे ठेवण्याची जी रीत आहे तीव-रून पाहतां या कवीचा आजा जो **वटेश्वरदत्त** याच्या नावा-वरून त्याचें स्थान शोधून काढण्यास बरेंच साधन मिळतें. हिंदुस्थानांत **वटेश्वर**† या नांवाचें एक प्रसिद्ध **शिवस्थान** आहे. ते त्या देवाच्या नांवानें जरी कोणाला विशेष माहीत नसलें तरी साप्रत तेथें दरसाल एक मोठी यात्रा भरत असते व तींत घोड्यांचा व्यापार फार मोठा चालतो, या निमि-त्ताने तरी तें लोकांस माहीत असलेंच पाहिजे.

आम्ही तें **वटेश्वर** स्थान पाहण्यास गेलो होतों त्यावेळीं त्या स्थलाचीं निरनिराळीं तीन माहात्म्ये असल्याचे समजलें; तथापि त्यांपैकीं आह्मांस एकच पाहण्यास मिळालें. त्यांत त्या देवाच्या संबंधानें अशी कथा वर्णन केली आहे कीं, "**युयुत्सु** नांवाचा कोणी त्या प्रदेशाचा राजा पुत्रप्राप्तीकरितां एका वडाच्या झाडाखालीं बसून **शंकराचें** आराधन करीत होता. पुष्कळ दिवस भक्तिपूर्वक सेवा केली तरी भगवान् प्रसन्न होत नाहीं असे पाहून त्यानें त्या वडाच्या पारंब्यांचा आपल्या ग-ळ्याला फांस घालून प्राणत्याग करण्याची तयारी केली. याप्रमाणे त्याचा दृढनिश्चय पाहून प्रसन्न झालेला भगवान् **शंकर** तत्काळ त्या वटवृक्षांतून प्रकट झाला व राजाच्या गळ्याचा फांस सोडून त्याला 'वर माग' असें ह्मणाला. तेव्हां राजानें 'सर्वकाळ आपल्या हातून तुमची सेवा घडावी व मला पुत्र व्हावा,' असा वर मागितला. नंतर प्रसन्न झा-लेल्या **शंकरानें** 'उत्तम गुणवान् व भाग्यशाली पुत्र होईल' असें वरदान देऊन त्याच्या कडून नेहमीं सेवा घेण्याकरितां

---

† हें स्थान **आग्रा** शहराच्या आग्नेयीस ३६ मैलावर आहे येथें एक मोठा तलाव दर्शनीय आहे.

आपण येथेंच राहतों. वडाच्या झाडांतून प्रकट झाल्यामुळें **वटेश्वर** हेंच माझें नांव प्रसिद्ध होईल' असें सांगितलें व त्या दिवसापासून **वटेश्वर** हें स्वयंभु स्थान प्रसिद्ध झालें."

यद्यपि वर दिलेल्या कथेच्या सारांशावरून **विशाखदत्ताचा** आजोबा हा **युयुत्सु**राजाचाच पुत्र असें खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं; तथापि त्याच्या नांवावरून **वटेश्वराने** दिलेला ह्मणून **वटेश्वरदत्त** असें अनुमान करतां येईल. ज्यापेक्षां **वटेश्वर** हे स्थान प्रसिद्ध आहे व तेथें **युयुत्सु** राजा होता व **वटेश्वराच्या** कृपेनें त्याचा उदय झाला असें वर्णन आढळतें त्यापेक्षां **वटेश्वर** हें त्या राजघराण्याचें कुलदैवत अथवा उपास्यदैवत असलेंच पाहिजे. व ह्मणूनच **विशाखदत्ताच्या** आजाला **वटेश्वरदत्त** असें आपल्या देवाच्या नांवाचें सूचक नांव ठेविलें असावें असें ह्मणण्यास कांहीं बाध येत नाहीं.

पुढें त्याचा नातू जो **विशाखदत्त** त्याचेंही नांव तसेंच आहे. **विशाख** हें **स्वामिकार्तिकाचें** नांव आहे. तेव्हां विचार करून पाहतां **विशाखदत्त** हा **वटेश्वर** नांवाचें जें प्रसिद्ध स्थान तेथला किंवा त्याच्या जवळचा असावा असें ह्मणतां येईल. **विशाखदत्ताचा** आजा हा एक मांडलिक राजा होता. **विशाखदत्ताला** 'महाराज' ही पदवी होती, त्यावरून आजाच्या कारकीर्दीत जें त्याचें ऐश्वर्य होतें त्याहून याच्या कारकीर्दीत त्याची विशेष भरभराट झाली असून तो मोठा राजा झाला असावा असें वाटतें. **मुद्राराक्षसाच्या** कांहीं लेखी पुस्तकांत **विशाखदेव** असें नांव आढळतें. 'देव' हा शब्द मोठ्या राजांच्या नावाला जोडीत असतात हे मार्मिक वाचकांस सांगावयास नको.

याशिवाय **वल्लभदेव** याणें केलेल्या **सुभाषितावलींत विशाखदेव** हें नांव आढळतें. तेव्हां लहानपणीं त्याचें **विशाखदत्त** हेंच नांव असून पुढें त्याणें महाराज ही पदवी संपादन केल्यावर त्याला **विशाखदेव** ह्मणत असतील असें अनुमान करण्यास चांगलाच आधार मिळतो. यावरून **विशाखदत्त** अथवा **विशाखदेव** हा **वटेश्वरा**च्या आसपासच्या प्रदेशाचा राजा होता, असें अनुमान आहे.

वर जी माहिती दिली आहे तिच्याहून अधिक मिळण्यास कांहीं मार्ग नाहीं. हा राजा मोठा कारस्थानी व उलाढाली करणारा असावा. कारण नाटक हें जसें लोकव्यवहाराचें चित्र आहे तसेंच त्यांतलें निरनिराळ्या प्रसंगांचें वर्णन व त्यांतले स्वाभाविक उद्गार हे त्याच्या कर्त्याची स्थिति दाखविणारे चष्मे होत. याविषयी **कालिदास** आणि **भवभूति** यांचीं नाटकें उदाहरणार्थ घेतलीं तर चालतील. **कालिदासा**ची कृति वाचीत असतां हा कवि मोठा रंगेला व आनंदसमुद्रांत पोहत असलेला असा असावा व **भवभूतीं**च्या उद्गारांवरून तो दुःखीकष्टी व उदास असावा, असें मार्मिक वाचकाच्या लक्षांत आल्यावाचून राहणार नाहीं. या **विशाखदत्ता**च्या पूर्वी जितके नाटककार होऊन गेले त्यांचा विषय ह्मटला ह्मणजे बहुतकरून विवाहप्रसंग इत्यादि मौजेच्या व करमणुकीच्या गोष्टी हें तर सिद्धच आहे. असें असतां याणें ते विषय एकीकडे ठेवून आजपर्यंत कोणीही न निवडलेला व अतिशय रूक्ष असा हा राजकीय कारस्थानाचा जो विषय निवडला त्यावरून त्याला याच विषयाची विशेष आवड होती हें उघड दिसतें. ह्या कवीची कवित्वशक्ति वर्णनीय आहे.

प्रसाद हा जो मुख्य गुण तो तर याच्या कवितेत सर्वत्र सारखा दृष्टीस पडतो. याच्या नांवानें केवळ **मुद्राराक्षस** हें एकच नाटक सांप्रत उपलब्ध आहे; पण याच्या कवित्व-शक्तीवरून एवढा एकच ग्रंथ त्याणें केला असावा असें वाटत नाहीं. **सुभाषितावलींत** १५४८ व १७२८ हे दोन श्लोक या कवीच्या नांवानें घेतले आहेत; पण ते दोनही या **मुद्रा-राक्षसांतील** नव्हत. पहिल्यांत एका स्त्रीचें व दुसऱ्यांत वर्षाकालाचें वर्णन आहे. दोहोंच्याही रचनेवरून ते या कवीचे असावेत असें वाटते. तें कसेंही असो. एकंदरींत ह्या कवीनें दुसरे ग्रंथ केले असावेत यांत कांहीं संशय नाहीं.

आतां हा कवि कोणत्या काळांत झाला याविषयीं थोडेंसें विवेचन केलें पाहिजे. आजपर्यंत ह्या काल-निश्चयाच्या संबधानें पाश्चात्य व एतद्देशीय विद्वान् लोकांनीं जें विवेचन केलें आहे त्यावरून हा कवि कोणत्या वेळीं झाला हें निश्चयात्मक ठरविण्यास कांहींएक आधार मि-ळत नाहीं असें सिद्ध होतें. असें आहे तरी कांहीं शोधक लोक याच्या कालाची हद्द—ह्मणजे हा अमक्या शतका-पूर्वी झाला असावा असें दाखविण्याचा प्रयत्न करतात. प्रो० **विल्सन** यांनीं पाश्चात्य लोकांच्या संप्रदायाप्रमाणें, ख्रिस्ती सनाच्या ११ व्या किंवा १२ व्या शतकांत हा कवि झाला असावा असें आपलें मत निःशंकपणें पुढें आणलें आहे. ह्या त्यांच्या मताला मजबूत आधार कांहींच दिसत नाहीं. **विल्सन्** साहेबांचें मत खंडन करणारे, पूर्वी रा. रा. व आतां नामदार **तेलंग** साहेब **यांणीं—दशरूपक** नांवाच्या ग्रंथां-त तीन ठिकाणीं **मुद्राराक्षसाचा** उल्लेख केला आहे. **दश-रूपक** हें **धारेचा** राजा **भोजदेव** याचा चुलता जो **मुंजराज**

याच्या कारकीर्दीत झालें आहे. **भोजराज** हा ख्रिस्ती सनाच्या ९९६ वे वर्षी गादीवर बसला. तेव्हां त्याचा चुलता जो **मुंजराज** तो १० व्या शतकांत होता व **दशरूपक** हा ग्रंथ त्याच्याच कारकीर्दीत झाला, तेव्हां **मुद्राराक्षस** हा ग्रंथ त्याच्या पूर्वीचा आहे असें सिद्ध करून दाखविल्यासारखें केलें आहे; पण त्यालाही सबळ आधार नाहीं. कारण **दश-रूपक** हा ग्रंथ **मुंजराजा**च्या वेळीं झाला हे कबूल करितां येईल; पण खुद्द त्या ग्रंथांत **मुद्राराक्षसा**चा मुळींच उल्लेख नाहीं. तो **अवलोक** नावाची जी त्या ग्रंथाची व्याख्या आहे तींत मिळतो. व्याख्येचा कर्ता जो **धनिक** त्याचा काळ निश्चित झाल्याचें दिसून येत नाहीं. मुळाच्या कर्त्याच्या बापाचें नांव **विष्णु** आणि टीकाकाराच्या बापाचें नावहीं **विष्णु**च होतें. एवढ्यावरून त्या ग्रंथाचे प्रकाशक डा० **हाल** याणीं टीकाकार हा मूल ग्रंथकाराचा बंधु * असें गृहीत केलें आहे; पण ते देखील खात्रीपूर्वक सांगत नाहींत. दोघांच्या बापाचें नांव एक आहे एवढ्यावरूनच बंधु-त्वाचें नातें जोडणें हे खरोखर मोठें चमत्कारिक वाटतें. **दशरूपका**सारख्या महत्वाच्या ग्रंथाची व्याख्या करणारानें ग्रंथकाराशीं जर त्याचें बंधुत्वाचें नातें असतें तर त्याचा कोठेंच उल्लेख केला नसता असें ज्यापेक्षां ह्मणवत नसेल त्यापेक्षां खुशाल त्यावर भरवसा ठेवावा; पण दुसरा कांहीं सबळ आधार मिळेपर्यंत ते नातें गृहीत करणें हे आह्मास मुळींच योग्य वाटत नाहीं. यावरून

* It may be suggested that Dhanika, one of his commentators, and possibly his own brother, was living about the middle of the tenth century. (*See Dr. Hall's Preface to Dasharupa, p. 2*)

**दशरूपक**कर्ता जो **धनंजय** त्याच्या कालावरून **मुद्राराक्षस**-कर्त्याच्या कालाची मर्यादा ठरविणें योग्य दिसत नाहीं. याशिवाय **विल्सन्**, **तैलंग** वगैरे मंडळींनीं आणखीं बरींच अनुमानें काढलीं आहेत व **तैलंग** साहेबांनीं **विशाखदत्त** आमच्या शतकाच्या पूर्वी होता असें ठरविण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला आहे; पण तो विस्तारभयास्तव आमच्यानें येथें देववत नाहीं. त्याचें तात्पर्य इतकेंच कीं, या ग्रंथकर्त्याच्या कालाची जी हद्द ठरविली आहे, ती देखील केवळ आनुमानिक असून काल्पनिक आधारांवर रचलेली आहे.

## मुद्राराक्षसाविषयीं

संस्कृत भाषेंत नाटकें व त्यांचे पोटभेद वगैरे मिळून सुमारें ७८ ग्रंथ आजकाल उपलब्ध होतात. **प्रो० विल्सन्** यांणीं सुमारें ६०[1] ग्रंथांचीं नांवें दिलीं आहेत. त्या सर्वांत बहुतकरून त्यांतील पोटभेदांपैकीं एकेक जातीचा एकेक ग्रंथ लक्ष्यपूर्वक पाहिला म्हणजे त्या जातीचे जे दुसरे ग्रंथ असतील त्यांचें **स्वरूप** तेव्हांच समजून येतें. भ्रमरबाधा,

[1] प्रोफेसर साहेबांनीं "Theatre of the Hindus" या नांवाचा एक प्रसिद्ध ग्रंथ केला आहे. या ग्रंथाचे दोन भाग आहेत. पहिल्या भागांत आपलीं नाटकसंबंधीं विशेष माहिती देऊन पुढें नाटकग्रंथांची एक याद दिली आहे. या यादींत एकंदर ६० दृश्यकाव्यांचीं नांवें आहेत. पैकीं **विल्सन** साहेबांनीं ६ नाटकांचीं भाषांतरें आपल्या ग्रंथांत समग्रहीत केलीं आहेत व २३ नाटकादिकांचा सारांश दिला आहे. ८ ग्रंथांचीं नांवें त्यांणीं **दशरूपक** नांवाच्या ग्रंथावरून घेतलीं आहेत आणि १९ ग्रंथांचीं नांवें **साहित्यदर्पण** नामक ग्रंथावरून दिलीं आहेत व ३ ग्रंथांचीं नांवें मार्जी ख्रिस्तलोकवासी **म्याकेंझी** याच्या संस्कृत ग्रंथसंग्रहाच्या यादीवरून दिलीं आहेत. तथापि याशिवाय आणखी पुष्कळ ग्रंथ सांप्रत उपलब्ध झाले आहेत. आमच्या माहितीवरून त्यांची संख्या सुमारें ७८ हून अधिक आहे. व अद्याप किती उपलब्ध होतील त्याविषयीं कांहीं सांगवत नाहीं.

चित्रदर्शन, मदनज्वर इत्यादि गोष्टी बहुतकरून ठरीव आहेत म्हटलें तरी चालेल. याविषयीं **शाकुंतल, मालतीमाधव** इत्यादि नाटकांतील कल्पना त्याच्या पुढच्या नाटकांतील कल्पनांशीं लावून पाहिल्या म्हणजे सहज दिसून येईल; पण प्रकृत ग्रंथाचें मूळ जें **मुद्राराक्षस** त्याविषयीं मात्र तसें म्हणतां येणार नाहीं.

तसेंच **मुद्राराक्षस** हें नाटक संस्कृत भाषेंत आजकाल उपलब्ध असलेल्या इतर सर्व नाटकांहून अगदीं निराळ्या प्रकारचें आहे. **शाकुंतलादि** सर्व नाटकांत बहुतकरून स्त्रीपुरुषांच्या संबंधाच्या गोष्टी असल्याचें उपलब्ध होतें; मग त्यांचा नायक देव असो किंवा उपदेव असो, बहुतकरून स्त्रियांच्या लीलांचें वर्णन ज्यांत नाहीं असें नाटक या **मुद्राराक्षसा**वांचून संस्कृत भाषेंत आजपर्यंत कोणतेंच उपलब्ध झालें नाहीं असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. कित्येक नाटकांत वीर, करुण हे रस प्रधान असून शृंगार गौण आहे. नाटिका तर बहुतेक शृंगाररसप्रधानच असावयाच्या. व्यायोग वीररसप्रधान असावयाचे. भाण, प्रहसनें वगैरे हास्यरसप्रधान असावयाचीं, असा एक ठरीव नियमच आहे; पण प्रकृत ग्रंथ **मुद्राराक्षस** हें त्यांहून अगदीं स्वतंत्र आहे. यांत मुळापासून शेवटापर्यंत अनेक प्रकारच्या मसलती व कारस्थानें वर्णन केलीं असल्यामुळें यांतील कल्पना वगैरे अगदीं स्वतंत्र आहेत. **शाकुंतलां**तली भ्रमरबाधा जशी थोड्याशा रूपांतरानें **प्रियदर्शिकें**त पाहायला मिळते व **मालविकाग्निमित्रां**तलें चित्रदर्शन जसें **मालतीमाधवां**त मिळतें, तशी यांतील कोणतीही कल्पना दुसऱ्या नाटकांत उपलब्ध होण्याचा संभव नाहीं. कदाचित् करुण-

रस साधण्याकरितां **चंदनदासाला** सुळावर चढविण्याचा जो प्रसंग कवीनें मूळांत घातला आहे तो पुष्कळ अंशानें **मृच्छकटिकांतील चारुदत्ताला** सुळावर चढविण्याच्या प्रसंगाशीं सादृश्य पावणारा आहे असें म्हणतां येईल. तथापि **मृच्छकटिक** आणि **मुद्राराक्षस** या दोहोंचाही कालनिर्णय *अद्याप निश्चयात्मक झाला नाहीं. तेव्हां दोहोंतून कोणता ग्रंथ प्रथम झाला, याचा ठराव करतां येत नसल्या कारणानें **मुद्राराक्षसांतील** कल्पना **मृच्छकटिक**कर्त्यानें घेतली किंवा **मृच्छकटिक**कर्त्याची कल्पना **मुद्राराक्षस**कर्त्यानें घेतली, याचा निर्णय करतां येत नाहीं. तथापि, एकंदरींत वर उल्लेख केलेल्या गोष्टींचें काय तें दुसरीकडे सादृश्य मिळतें. बाकी या नाटकांतील कोणती-

---

* **प्रो० विल्सन्** यांच्या मतें **मृच्छकटिक** हें दहाव्या शतकांत व **मुद्राराक्षस** अकराव्या किंवा बाराव्या शतकांत झालें असावें. ते म्हणतात.—

"Although not named by the authority from which we have principally drawn our general view of the Hindu dramatic system, the Dása Rùpaka, it is unquestionably alluded to in the text of that work, and we may therefore feel assured that this play was written earlier than the tenth century; there is every reason to infer much earlier."

पण याला विशेषसा कांहीं आधार नाहीं. हीं केवळ अनुमानें आहेत. नाहींपेक्षां **मृच्छकटिक** हें प्रथमचें व **मुद्राराक्षस** त्यानंतरचें असें मानतां आलें असतें. व त्यावरून **विशाखदत्तानें** मृच्छकटिकांतील वर सांगितलेली कल्पना घेतली असें मानण्यास हरकत नव्हती. केवळ अनुमानावरूनच ठरवायचें असेल तर **विल्सन्** साहेबांच्या विरुद्ध अनुमान करण्यास थोडा तरी आधार मिळतो. **मृच्छकटिकाच्या** पहिल्या अंकांत **चाणक्याच्या** नांवाचा उल्लेख आहे. (याविषयीं सं० मृ० अं० १ श्लो० ३९ व आम्ही केलेलें **चारुदत्त** आणि **वसंतसेना** याचा भा० १ पृ० २१ यावरील **शकाराचें** भाषण पहा.) यावरून मुद्राराक्षसानंतर **मृच्छकटिक** झालें असें पाहिजे तर अनुमान करतां येईल.

**ही कल्पना दुसऱ्या** कवीला घेतां आली नाहीं. कारण **त्याचें संविधानकच** तसें आहे.

---

## चाणक्याविषयीं.

आतां आमच्या ग्रंथांत वर्णन केलेली गोष्ट कोणत्या काळीं घडली याविषयीं थोडासा विचार करूं. या ग्रंथाचा नायक जो **चाणक्य** त्याचें **श्रीमद्भागवत**[*] व **विष्णुपुराण**[†] या दोन पौराण ग्रंथांत वर्णन आहे. त्याबरोबरच **चंद्रगुप्त** व त्याचें **मौर्यकुल** आणि **नंदराजे** यांचेंही वर्णन आहे. **गुणाढ्य**-कवीनें केलेल्या **बृहत्कथेंत** अथवा त्याचाच संस्कृत भाषेंत उतरलेला सारांश जो **कथासरित्सागर**[‡] यांत **नंद, चंद्रगुप्त, चाणक्य** इत्यादिकांचीं नांवें व त्यांचें वर्णन आहे; तथापि त्यांत **राक्षस** याचें नांव कोठें आढळत नाहीं. यांत ज्याला **वररुचि** म्हटलें आहे तोच **राक्षस** असावा असें आमचें मत[§] आहे. **भागवतांतही** मूळांत **चाणक्याचें** नांव नाहीं. केवळ "कश्चित् द्विजः" इतकाच उल्लेख आहे. यावर टीकाकार **श्रीधरस्वामी**— "द्विजः कौटिल्य–वात्स्यायनादिपर्यायः चाणक्यः" असें ह्मणतात. **मुद्राराक्षसांत** व बृहत्कथेंत **कौटिल्य, चाणक्य** आणि **विष्णुगुप्त** हीं तीन नांवें व **श्रीधरस्वामींनीं** सांगितलेलें **वात्स्यायन** हें चौथें नांव दुसरीकडे प्राचीन ग्रंथांत कोठें मिळत नाहीं. **कामंदकीय** नामक नीतिशास्त्रग्रंथांत

---

**भागवत** स्कं० १२ अ० १ पहा.

**विष्णुपुराण** अं० ४ अ० २४ पहा.

**कथासरित्सागर** ल० १ त० ४—५ पहा. अथवा आह्मी केलेला **बृहत्कथासागर** भा० १ पृ० ५३-८५ पहा.

याविषयीं पुढें मुळांत पृ० २ यावरील टीप पहा.

**चाणक्याच्या** वंशाची महती* वर्णन केली आहे. त्यांत **चाणक्याचा विष्णुगुप्त** या नांवानेंच उल्लेख आहे.

---

## चंद्रगुप्ताविषयीं माहिती.

**पांडवांच्या** समकालीं राजा **जरासंध** हा **मगध** अथवा **बहार** प्रांताचा राजा होता, हें **महाभारतावरून** सिद्ध होतें. **राजसूय** यज्ञाच्या वेळीं **जरासंधाला** मारून त्याचा पुत्र **सहदेव** याला **कृष्णानें** राज्यावर बसविलें. तेव्हां अर्थात् **पांडव** स्वर्गास गेले, त्यावेळीं **मगध** देशचा राजा **सहदेव** होता हें सिद्ध झालें. त्याच्यानंतर **मार्जारि, श्रुतश्रवा** इत्यादि, **रिपुंजय** अथवा **पुरंजय** याच्यापर्यंत वीस राजांनीं राज्य केलें. व **रिपुंजयापर्यंत जरासंधाचा** वंश एकसारखा चालत आला, पुढें मात्र गडबड झाली. **रिपुंजयाचा शुनक** नांवाचा प्रधान होता. त्याणें आपला स्वामी **रिपुंजय** याला मारून **प्रद्योत**† नांवाच्या आपल्या पुत्राला **मगध** देशाच्या राजगादीवर बसविलें. यामुळें **जरासंधाच्या** वंशाचा क्षय होऊन **शुनकाच्या** वंशाकडे **मगधदेशाचें** राज्य आलें. **प्रद्योताचा** पुत्र **पालक**, त्याचा **विशाखयूप**, त्याचा **राजक** व त्याचा **नंदिवर्धन** ह्या पांचही राजांला **प्रद्योतन** असें म्हणत असत. **प्रद्योत** व त्याच्या पुढचे चौघे पुरुष या पांचांनीं मिळून १३८ वर्षे **मगध** देशाचें राज्य केलें. नंतर **प्रद्योतवंशापासून** राज्य हिरावून घेऊन

---

* याविषयी पुढें मुळांत पृ० १६-१७ येथें विशेष वर्णन आलें आहे.

† प्रसिद्ध **बृहत्कथेचा** नायक **वत्सराज** याचा सासरा अर्थात् **पद्मावतीचा** पिता जो **प्रद्योत** तो हाच असावा असें वाटतें. कारण तोही **मगधदेशाचाच** राजा होता. याविषयीं आम्ही केलेल्या **बृहत्कथासागरांत** भाग २ रा पृष्ठ १० पासून पृष्ठ ६४ पर्यंत कथाभाग वर्णन केला आहे तो पहावा.

**शिशुनाग** हा **मगध** देशाचा राजा झाला. त्याचा पुत्र **काकवर्ण**, त्याचा **क्षेमधर्मा**, त्याचा **क्षेत्रज्ञ**, त्याचा **बिंबिसार**, त्याचा **अजातशत्रु**, त्याचा **दर्भक**, त्याचा **अजय**, त्याचा **नंदिवर्धन** व त्याचा **महानंदी** याप्रमाणें **शिशुनागापासून महानंदीपर्यंत** दहा पुरुषांनीं ३६० वर्षें **मगध** देशाचें राज्य केलें. **महानंदीपर्यंत** जे राजे झाले ते सर्व क्षत्रिय होते. तेथून पुढें मात्र राजगादी क्षत्रियांकडून जाऊन तिनें शूद्राचें आधिपत्य स्वीकारलें.

**महानंदी*** याची एक शूद्रजातीची रखेली होती. तिला त्याच्यापासून एक पुत्र झाला होता. त्याला **नंद**† असें नांव ठेविलें होतें. हा मोठा शूर व बलाढ्य होता. यद्यपि **महानंदीची** समानजातीय पट्टराणी होती, व तिचे पुत्रही होते, आणि सांप्रदायाप्रमाणें राज्याचा अधिकार त्यांनाच मिळणें वाजवी होतें; तथापि **नंदाच्या** पराक्रमापुढें व अनावर महत्वाकांक्षेपुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. त्यानें राज्याच्या खऱ्या वारसदारांला हुसकून देऊन सर्व अधिकार आपल्या हातीं घेतला. हा मोठा कृपण होता. याच्याजवळ अपरंपार द्रव्य होतें. कोणी—महापद्म संख्येइतकें त्याच्याजवळ द्रव्य आहे, असें अनुमान करून त्याला **महापद्मपति** असें नांव दिलें होतें. केवळ **महापद्म** असेंही याला लोक म्ह-

* हीच कथा **विष्णुपुराणाच्या** चवथ्या अंशात २४ व्या अध्यायांत वर्णन केली आहे. भागवतांत दिलेली कथा व **विष्णुपुराणांत** वर्णन केलेली कथा यांत फारसें अंतर नाहीं.

† पुढें मूळात **सर्वार्थसिद्धि** असें ज्याला म्हटलें आहे तो हाच असावा. त्यानें मुख्य नाव **सर्वार्थसिद्धि** हेंच असून **नंद** हें आवडतें नांव असावें असें वाटतें. अथवा **नंदा** हें त्याच्या आईचें नांव असेल व त्यावरून त्याला **नंद** म्हणत असतील तर कोणास ठाऊक.

णत असत. हा पराक्रमी राजा क्षत्रियांचा फार द्वेष करीत होता. पूर्वी **परशुरामानें** क्षत्रियांचा जसा संहार केला तसा ह्या महापराक्रमी **नंदानें** क्षत्रियांचा संहार केला. त्याच्या अंगीं अद्वितीय पराक्रम असल्यामुळें त्याचा सामना करण्याची कोणत्याही क्षत्रियाच्या अंगीं ताकद नव्हती. व त्याणें तर असें व्रत घेतलें होतें कीं, क्षत्रियांचें बीज देखील पृथ्वीवर अवशिष्ट राहूं द्यायचें नाहीं ! यापूर्वी जे **मगधदेशचे** राजे झाले त्यांणीं केवळ त्या देशाचेंच राज्य केलें; पण क्षत्रियांचा उच्छेद करणारा हा महापराक्रमी राजा **नंद** सर्व पृथ्वीचा राजा झाला. ज्याचा हुकूम उलंघन करण्याची कोणाचीही छाती नव्हती अशा **नंदानें** बहुत दिवस एकछत्रा पृथ्वीचें राज्य केलें.

**नंदाचे** * **सुमाल्य** इत्यादि आठ पुत्र होते. आठ मुलगे व स्वतः नंद मिळून **नवनंद** असें लोक म्हणत असत. या **नवनंदांनीं** एकसारखें १०० वर्षे राज्य केलें. नंतर कांहीं कारणामुळें **नंदाची** शूद्र जातीची धाकटी स्त्री **मुरा** हिचा पुत्र **चंद्रगुप्त** याचें आणि **सुमाल्य** इत्यादि वडील बंधूंचें मोठें वैर पडलें. व **चंद्रगुप्तानें** **चाणक्य** नांवाच्या महाकारस्थानी ब्राह्मणाचा आश्रय केला. तेव्हां आपला अपमान केल्यावरून क्षुब्ध झालेल्या **चाणक्यानें** युक्तिप्रयुक्तीनें **नवनंदांचा**

* पुढें मूळांत पृष्ठ ३ पासून ५ पर्यंत ही कथा वर्णन केली आहे. तीवरून **नंद** अथवा **सर्वार्थसिद्धि** याची थोरली स्त्री जी **सुनंदा** तिला नऊ पुत्र झाले होते व म्हणूनच त्यांना **नवनंद** म्हणत असत. असें जें लिहिलें आहे तें नंदाच्या संबंधाची इतर ठिकाणीं जी कथा वर्णन केली आहे तिच्या आधारावरून लिहिलें आहे असें समजावें. एकंदरींत या नंदाची कथा जेथें जेथें वर्णन केली आहे तेथें तेथें परस्पर विरोध फार आहेत, त्याविषयीं आमचा इलाज नाहीं हें वाचकांनीं ध्यानांत आणावें.

समूळ नाश करून **चंद्रगुप्ताला** राज्यावर बसविलें. **नंद** हा जरी शूद्रजातीच्या स्त्रीचा पुत्र होता, तरी तो क्षत्रियाच्या वीर्यापासून झाला असल्यामुळें त्याला शूद्र ह्मणत नव्हते.* तो क्षत्रियांतच मोडत होता.

याप्रमाणें **मगध** देशाच्या राज्यश्रीनें **नंदकुळाचा** त्याग करून **मौर्य** अर्थात् **चंद्रगुप्त** याला वरिलें **चंद्रगुप्त** हा एक आमच्या या ग्रंथांतला मुख्य पुरुष होय. याच्या संबंधाचा—त्याच्या जन्मापासून **नंदाचा** निर्वंश करून राज्य प्राप्त होऊन **राक्षसाला** हरवून त्याला दिवाणगिरी देईपर्यंतचा—चरित्रभाग पुढें मुळांत सविस्तर वर्णन केलाच आहे. त्याच्या पुढचा चरित्रभाग ह्मणण्यासारखा कांहीं उपलब्ध होत नाहीं. फक्त त्याच्या वंशांत पुढें कोण कोण झाले व त्यांणीं किती वर्षे राज्य केलें याचें वर्णन उपलब्ध होतें तें येथें देतों.

**चंद्रगुप्ताला वारिसार** नांवाचा पुत्र झाला होता. बापाच्या पश्चात् तो गादीवर बसला. त्याला **अशोकवर्धन** नामक पुत्र झाला. यालाच **अशोक** अथवा **अशोकराज** असेंही म्हणतात. बापाच्या नंतर राजा **अशोक** गादीवर बसल्यावर त्याणें धर्मसंबंधांत मोठा विलक्षण फेरफार केला. **अशोकापर्यंत मगधदेशाची** राजगादी वैदि-

---

* प्रत्येक वर्णाला आपल्या खालच्या वर्णाच्या स्त्रीशीं विवाह करून घेण्याचा अधिकार **धर्मशास्त्रांत** सांगितला आहे. त्याप्रमाणें **महानंदीनें** शूद्र जातीची स्त्री केली. तिला जो नंद नामक पुत्र झाला त्याला शुद्ध क्षत्रियांत जरी गणलें नाहीं तरी तो शूद्रापेक्षा श्रेष्ठ होता. **धर्मशास्त्र**कारांच्या मताप्रमाणें त्याणें पुन्हा क्षत्रियांशी संबंध केला असता तर त्याची संतति पांचव्या पिढीला शुद्ध क्षत्रियांत गणली गेली असती. पण त्याणें तसें न करतां **मुरा** नावाची शूद्रजातीची स्त्री केली ह्मणून तिचा पुत्र **चंद्रगुप्त** हा पक्का शूद्र झाला.

**कधर्मी** राजाकडे* होती, हें प्राचीन इतिहासावरून स्पष्ट होतें, पण **अशोकानें** मात्र धर्मांत बदल केली. यावेळीं या **भरतखंडांत** बौद्धधर्माचा विशेष प्रसार होत चालला होता. बौद्धधर्मोपदेशकांनीं मन वळविल्यावरून ह्मणा किंवा स्वतः त्याची त्या धर्माच्या सत्यतेविषयीं खात्री झाली असेल ह्मणून ह्मणा; राजा **अशोकानें वैदिकधर्माला** झुगारून देऊन **बौद्धधर्माचा** स्वीकार† केला. मग काय विचारतां! आधींच तो सार्वभौम राजा होता, त्याणें जेव्हां **बौद्धधर्माला** आश्रय दिला तेव्हां त्याचें वजन फार वाढलें. **अशोक‡** राजानें साऱ्या **भरतखंडांत** जिकडे तिकडे **बौद्ध** धर्माचा प्रसार करण्याविषयीं एकसारखा प्रयत्न चालविला. देशदेशांतरांत अनेक उपदेशक नेमले. त्याच्या मनांत सर्व **भरतखंड बौद्धमय** करून टाकावयाचें होतें; पण **वैदिकधर्मी** लोकांच्या सुदैवानें तसें होण्यापूर्वींच त्याचा अंतकाळ झाला. नंतर त्याचा पुत्र **सुयशा** गादीवर बसला. त्याचा पुत्र **संगत**, त्याचा **शालिशूक**, त्याचा **सोमशर्मा**, त्याचा **शतधन्वा** आणि त्याचा पुत्र **बृहद्रथ** याप्रमाणें या

---

* **चंद्रगुप्ताचा** पुत्र **बारिसार** हा कोणत्या धर्माचा होता याविषयीं स्पष्ट असें वर्णन कोठें उपलब्ध होत नाहीं, तरी स्वतः **चंद्रगुप्त** वैदिक-धर्मी होता याविषयीं पुष्कळ प्रमाणें मिळतील. फार दूरचें कशाला पाहिजे? पुढें मूळांत ७६ व्या पृष्ठावर **चंद्रगुप्तानें पर्वतेश्वराचें उत्तरकार्य** करून ब्राह्मणास दानें दिलीं आहेत हेंच प्रमाण बस्स आहे.

† **विष्णुपुराणांत** अथवा **भागवतांत अशोकाच्या** धर्मांतराबद्दल मुळींच उल्लेख नाहीं. ही माहिती शिलालेख इत्यादि अवांतर साधनांवरून उपलब्ध होते.

‡ **चंद्रगुप्ताचा** नातू **अशोकवर्धन** अथवा **अशोक** हा ख्रिस्ती सना-पूर्वी ३२० व्या वर्षी राज्य करीत होता, असें कांहीं अर्वाचीन शोधकांनीं सिद्ध केलें आहे.

मौर्यकुळांतील दहा राजांनीं मिळून १३७ वर्षें पृथ्वीचें राज्य केलें. व त्यांच्या नंतर राज्यलक्ष्मीनें मौर्यवंशाला सोडून शुंगवंशाला वरिलें. असो.

विष्णुपुराणांत व भागवतांत परीक्षितीच्या जन्मापासून नंदराजाला राज्याभिषेक झाला, तोंपर्यंत सुमारें १५०० वर्षें होऊन गेलीं* व याच काळांत शुद्ध क्षत्रियांचा वंश राहिला, असें वर्णन केलें आहे. श्रीकृष्ण निजधामास गेले तेव्हांपासून कलियुगाला प्रारंभ झाला† असेंही त्याच पुराणांत वर्णन केलें आहे. भारतीयुद्धांत अभिमन्यु मेला, व त्यावेळीं त्याची स्त्री उत्तरा गरोदर होती. भारतीयुद्ध झाल्यानंतर सुमारें ४ महिन्यांनीं ती प्रसूत होऊन परीक्षिति जन्मास आला असावा. त्याच्यापूर्वी थोडेच दिवस युधिष्ठिराला राज्याभिषेक झाला असावा. व त्यापासूनच युधिष्ठिराचा शक सुरू झाला असें मानणें हें अधिक सयुक्तिक आहे. कलियुगांतला पहिला शककर्त्ता युधिष्ठिर हें तर प्रसिद्धच आहे. युधिष्ठिराला राज्याभिषेक झाल्यावर ३६ वर्षीनीं ‡कृष्ण

---

* आरभ्य भवतो ( परीक्षित· ) जन्म यावन्नन्दाभिषेचनम् ।
एतद्वर्षसहस्रं तु शतं पञ्चदशोत्तरम् ॥
भागवत स्कं० १२ अ० २ श्लोक २६.

† याविषयीं भागवत स्कंध १२ यांत दुसऱ्या अध्यायाचा २९ वा श्लोक पहावा.

‡ भारतीयुद्धाच्या शेवटीं श्रीकृष्ण गांधारीला भेटण्यास गेला त्यावेळीं—त्यानें कपटानें आपले शंभर पुत्र मारविले असें समजून—रागावलेल्या गांधारीनें त्याला—

त्वमप्युपस्थिते वर्षे षट्त्रिंशे मधुसूदन ।
कुत्सितेनाभ्युपायेन निधनं समवाप्स्यसि ॥
महाभारत स्त्रीपर्व अ० २५ श्लो० ४४—४५.

आजपासून ३६ व्या वर्षी वाईट रितीनें मरण पावशील असा शाप दिला व त्याप्रमाणें जरा नांवाच्या व्याधाच्या हातून त्याचा शेवट झाला, असें वर्णन केलें आहे.

निजधामास गेले* व त्याच वर्षीं **परीक्षितीला** राज्याभिषेक करून **पांडव** महाप्रस्थानास गेले. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला असतां **युधिष्ठिरशकाचा** प्रारंभ व **परीक्षितीचा** जन्म याला फार तर महिना दोन महिन्यांचा फरक असेल, याहून जास्त नाहीं. व **युधिष्ठिरशकाच्या** सुरवातीपासून **कलियुगाचा** प्रारंभ मानलाच पाहिजे. अर्थात् **युधिष्ठिरशकाचीं** १५०० वर्षें पुरीं झालीं, त्या वेळीं **नंदाला** राज्याभिषेक झाला. **नंदानें** व त्याच्या पुत्रांनीं मिळून १०० वर्षें राज्य केलें.† व १०० व्या वर्षी **चाणक्यानें** त्यांचा समूळ नाश करून **चंद्रगुप्ताला** राज्यावर बसविलें. अर्थात् **युधिष्ठिरशकाच्या** १६०१ या वर्षी **चंद्रगुप्त** गादीवर बसला हें अगदीं सप्रमाण रितीनें सिद्ध होतें.

येथवर आह्मीं जें विशेष वर्णन केलें आहे त्याचा मुख्य उद्देश ह्मटला ह्मणजे **चंद्रगुप्त** हा कोणत्या काळीं होता हें सिद्ध करावयाचें हाच होय. व तें **आर्यलोकांच्या** ग्रंथांच्या आधारानें दाखविलें आहे. आतां परदेशीय लोक याच्या संबंधानें काय ह्मणतात त्याचा थोडक्यांत विचार करूं. प्रो. एच्. एच्. **विल्सन्** यांच्या मतें **ग्रीकलोकांच्या** ग्रंथांत **सांडरकोट्स्** या नांवाच्या ज्या पुरुषाचें वर्णन आढळतें तोच

---

*श्रीकृष्णाला त्याच्या वयाच्या १२५ व्या वर्षी देवांचें बोलावणें आलें. (भागवत स्कं० ११ अ० ६ श्लो० २५ वा पहा.) व नंतर लवकरच तो निजधामास गेला. यावरून भारतीयुद्धाच्या वेळीं त्याचें वय ८९ वर्षांच्या जवळ जवळ असावें असें दिसतें; पण महाभारतांत जें वर्णन केलें आहे त्याच्याशीं याचा मेळ बसत नाहीं.

†तस्य चाष्टौ भविष्यन्ति सुमाल्यप्रमुखाः सुताः ।
य इमां भोक्ष्यन्ति महीं राजानः स्म शतं समाः ॥
भागवत स्कं० १२ अ० १ श्लो० ११.

**चंद्रगुप्त. अलेक्झांडर** भरतखंडांत आला त्यावेळीं हा लहान होता. व पुढें तो **पालिबोत्रा** (अर्थात् **पाटलिपुत्र**) येथें राजा झाला. **मासिडोन**चा राजा **अलेक्झांडर** अथवा **शिकंदर** याणें या **भरतखंडा**वर स्वारी केली होती. व तो **सिंध** देशाकडून एकेक प्रदेश काबीज करीत करीत **गंगा**-नदीपर्यंत आला होता, हें इतिहासप्रसिद्धच आहे. **अलेक्झांडर** इसवी सनापूर्वी ३२३ व्या वर्षी मरण पावला, व त्याचा शेवट **बाबिलोन** या शहरीं झाला. यावेळी तो **हिंदुस्थाना**वर स्वारी करून स्वदेशीं परत जात होता. तेव्हां निदान एक किंवा दोन वर्षे तरी त्याला **हिंदुस्थान** सोडून झाली असावीं, अर्थात् त्याणें हिंदुस्थानावर स्वारी केली ती ख्रिस्ती सनापूर्वी निदान ३२५ व्या वर्षी केली असावी असें मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. व यावरूनच पाश्चात्य लोकांनीं **चंद्रगुप्त** हा ख्रिस्ती सनाच्या पूर्वी ३१५ व्या वर्षी गादीवर बसला व त्याणें २४ वर्षे राज्य केलें असें वर्णन केलें आहे.

पण यावरून **ग्रीक** लोकांनीं **सॅंडरकोट्स्** याचें जें वर्णन केलें आहे त्याच्याशीं मेळ बसत नाहीं. **युधिष्ठिरशका**च्या सतराव्या शतकांत **चंद्रगुप्त** राज्यावर बसला असें वर दिलेल्या **आर्य**लोकांच्या पौराण ग्रंथावरून सिद्ध होतें. **ग्रीस**-इतिहासकार **अलेक्झांडर** आणि **चंद्रगुप्त** यांची भेट झाली होती असें ह्मणतात. व **अलेक्झांडर** इसवी सनाच्या पूर्वी ३२५ व्या वर्षी **हिंदुस्थानां**त आला होता, असें दिसतें. तेव्हां त्याच्या वेळीं जर **चंद्रगुप्त** असला तर तो **युधिष्ठिरशका**च्या*

* युधिष्ठिर शकाबद्दल कोणी शंका घेईल तर तिला आतां अवकाश नाहीं. कारण त्याच्या शकाच्या १११ व्या वर्षी त्याचा पणतु **जनमेजय** यानें **म्हैसूर** प्रांतापैकीं **अनंतपुर** तालुक्यांत **गौंज** नांवाचा अग्रहार ब्राह्मणांस दान दिला असून त्याचें दानपत्र मिळालें आहे.

२६ व्या शतकांत होता असें ह्मटलें पाहिजे; पण पुराणावरून १७ व्या शतकांत होता असें सिद्ध होतें. तेव्हां यावरून पाहतां पौराणमतांत आणि ग्रीक लोकांच्या मतांत कालाच्या संबंधानें जो मोठा विरोध येतो त्याचा परिहार करणें फार कठीण आहे. पाश्चिमात्य लोकांसारखीं कांहीं तरी अकटोविकट* अनुमानें काढीत बसल्याशिवाय निर्वाह लागणार नाहीं, ह्मणून आह्मी त्याच्या भरीस पडत नाहीं.

प्रो० विल्सन् यांनीं ग्रीकलोकांच्या ग्रंथांतले जे उतारे दिले आहेत, त्यांतल्या वर्णनावरून व त्यांच्या प्रस्तावनेवरून ग्रीक लोकांचा सांडरकोटस् व आमचा चंद्रगुप्त या दोघांचेंही जन्मवृत्त-ग्रीक आणि आर्य लोकांनीं जें वर्णन केलें आहे तेंही-अगदीं तंतोतंत मिळत नाहीं. वर सांगितलेलीं हीं दोन्ही नांवें एकाच पुरुषाचीं असें जरी कनिंङ्ह्याम्, लैसन्, विल्सन् इत्यादि पाश्चात्य विद्वान् लोकांचा विशेष आग्रह आहे. पौराणिकांशीं मेळ घालण्याकरितां आह्मीं त्यांचें मत एकीकडे झुगारून दिलें असतें, पण इतर प्रमाणांवरून तसें करतां येत नाहीं. खुद्द मुद्राराक्षसांतच एक अंतःप्रमाण मिळतें.

* अकटोविकट अनुमानाचा वाचकास येथे थोडासा मासला दाखवितों. पश्चिमेकडील एका पंडितानें अलीकडे असें एक अनुमान काढलें आहे कीं, आपल्या ह्या भरतखंडांत विक्रमाचा जो शक चालतो तो सुरू झाला त्यावेळीं त्यात सुमारें ६०० शांवर वर्षे मिळवून त्याची सुरवात केली; म्हणजे हें शकरूपी बालक सहाशें वर्षांनंतर जन्मास आलें. तेव्हा अर्थात् पहिली सहा शतकें तें गर्भवासात होतें असें म्हटलें पाहिजे याला प्रमाण तर नाहींच, पण ख्रिस्त मेल्यानंतर कांहीं शतकें गेल्यावर त्याचा सन सुरू झाला, हें याला एक उदाहरण आहे व यावरच कायती या अनुमानाची सत्यता! तेव्हां असें एखादें लट्ठ अनुमान काढलें तर पौराणिक आणि ग्रीक यांच्या मतांत वर जो विरोध दाखविला आहे तो सहज दूर करतां येईल हें सांगावयास नको.

पहिल्या अंकाच्या २० व्या श्लोकांत **मलयकेतूशीं** विशेष दोस्ती ठेवणारे असे पांच **म्लेंच्छ** राजे वर्णन केले आहेत. त्यांत **काश्मीरच्या** राजाचें नांव **पुष्कराक्ष** असें घेतलें आहे. **काश्मीरचा** प्रसिद्ध इतिहास **राजतरंगिणी** यांत **चंद्रगुप्त** ज्याकाळीं राज्यावर होता, त्याकालाच्या सुमारास काश्मीरांत **उत्पलाक्ष, हिरण्याक्ष** आणि **हिरण्यकुल*** असे तीन राजे होऊन गेल्याचें वर्णन केलें आहे. **काश्मीरांत उत्पलाक्ष** राजाच्या कारकिर्दीत **म्लेंच्छांचा**† प्रवेश झाला असेंही त्यांतच वर्णन केलें आहे. व त्या ग्रंथकारानें जी कालगणना ‡ दिली आहे तिचाही मेळ बसतो. यावरून

---

* उत्पलाक्ष इति ख्यातिं पेशलाक्षतया गत ।
तत्सूनुस्त्रिंशतं सार्धान् वर्षाणामवशान्महीम् ।
तस्य सूनुर्हिरण्याक्षो स्वनामाङ्कपुरं व्यधात ।
क्ष्मा सप्तत्रिंशतं वर्षान् सप्तमासाश्च भुक्तवान् ॥
हिरण्यकुल इत्यस्य हिरण्याक्षस्य चात्मज ।
षष्टि षष्टिं च मुकुलस्तत्सूनुरभवत् समा· ॥
**कल्हणकृत** राजतरंगिणी त० १ श्लो० २८७ पासून.

† अथ म्लेच्छगणाकीर्णे मंडले चंडचेष्टित ।
**कल्हणकृत** राजतरंगिणी त० १ श्लो० २९० पासून.

‡ **काश्मीरचा** इतिहास लिहिणारा **कल्हण** पंडित याच्या मत **कलियुगाचीं** ६५३ वर्षे होऊन गेल्यावर **कौरव** आणि **पांडव** झाले, असें वर्णन करून त्यांच्या समकालीं १०१ वर्षे **गोनर्द** नांवाच्या तिघां राजानीं राज्य केलें. यावेळीं गतकलि ७५४ झाला. यापुढें १२६६ वर्षांत झालेल्या राजाचें वृत्त या **कवीला** मिळालें नाहीं. यावेळीं गतकलि २०२० झाला. त्यानंतर ८६७ वर्षे होऊन गेल्यावर **उत्पलाक्ष** राजा झाला. व त्यानंतर **हिरण्याक्ष** आणि **हिरण्यकुल** हे झाले. यावेळीं गतकलि २८८७ झाला. साप्रत गतकलि ४९९१ आहे. वर सांगितलेल्या तिघा राजांनीं २७९० पासून २८८७ पर्यंत राज्य केलें. यावरून **उत्पलाक्षाच्या** कारकिर्दीला २२०१ वर्षे झालीं असें सिद्ध होतें. व **ग्रीक** लोकांचा **सॉंडरकोट्स्** हा **ख्रिस्ती सनापूर्वी** सुमारें ३२५ व्या वर्षी **हिंदुस्थानांत** होता. यावरून उभयताच्या वर्णनाचा कांहींसा मेळ बसतो.

पाहतां **उत्पलाक्ष** हाच **मुद्राराक्षसां**तील **पुष्कराक्ष** असावा असें वाटतें. **उत्पल** आणि **पुष्कर** हे दोन्ही शब्द कमलाचे वाचक असून पर्याय शब्द आहेत. यावरून व **चंद्रगुप्ता**चा नातू जो **अशोक** त्याच्या दानपत्रांच्या वगैरे कालगणनेवरून व **ग्रीक** लोकांनीं **सॉंडरकोट्स्** याचा जो काल दिला आहे, त्यावरून **सॉंडरकोट्स्** व **चंद्रगुप्त** हे दोन्ही एकच असें ह्मटल्यावांचून गत्यंतर दिसत नाहीं.

---

## या ग्रंथांतील रस.

मूळग्रंथांत थोडथोडा कांहीं रसांचा समावेश झाला आहे. तरी त्यांत मुख्य रस कोणता हें सांगणें फार कठीण आहे. आह्मांस तर असें वाटतें कीं, या ग्रंथाच्या संविधानकांतला विषय रूक्ष असल्यावरून यांत कोणत्याही एका रसाचा परिपाक झाला आहे, अथवा तो मुख्य* आहे असें मुळींच ह्मणतां येत नाहीं. त्यांतून **शृंगार**† व **हास्य** रसांचा तर या ग्रंथांत मुळीं गंध देखील नाहीं. तसाच **बीभत्स** व **अद्भुत**ही नाहींच असें ह्मटलें पाहिजे. **वीर, करुण** व **भयानक** हे तीन रस बऱ्याच ठिकाणीं साधले आहेत. **वत्सल** व **शांत** या दोन्ही रसांची क्वचित् झांक दृष्टीस पडते तरी वर सांगितलेल्यांतून प्रधानत्व कोणालाही देतां येत नाहीं.

---

* मूळग्रंथाचा टीकाकार धुंडिराज—" **वीरो रसः प्रधानःस्यान्मुद्राराक्षसनाटके** " अर्थात् यांत वीररस प्रधान आहे असें ह्मणतो; पण तें कसें तें बरोबर समजत नाहीं.

† टीकाकार **शृङ्गाररसही** यांत आहे ह्मणतो; पण तो असेल कोठून ? कारण त्याची आश्रयदात्री ( आलंबन ) जी नायिका ती तर यांत मुळींच नाहीं. तेव्हां त्या निराश्रिताला येथें कसा थारा मिळावा? वस्तुत· नायिकेचा अभाव ही एक मुळांत उणीवच आहे असें म्हटलें पाहिजे. कारण नायकाप्रमाणेंच नायिकाही नाटकांत असलीच पाहिजे.

## या ग्रंथाचें संविधानक.

संविधानकाच्या संबंधानें विचार केला तर त्यांत बरीच गुंतागुंत आहे, तरी एकंदरींत तें चांगलें साधलें आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. उपनायक अथवा **चाणक्याचा** प्रतिपक्षी जो **राक्षस** त्याच्या संबंधानें मात्र आमचा ग्रह लोकांच्या समजुतीच्या विरुद्ध झाला आहे. कदाचित् वाचकांस आमच्या ह्मणण्याचें आश्चर्य वाटेल, अथवा ते आम्हांस दुसराच एखादा भलता दोष देण्यासही मागें सरणार नाहींत. तथापि, तसें होईल ह्मणून आह्मी आपलें मत प्रकट केल्यावांचून कधींही राहणार नाहीं. मूळग्रंथाच्या संविधानकाच्या रचनेवरून कवीच्या मनांत नायक व उपनायक या दोघांलाहीं एकापेक्षां एक कारस्थानी पुरुष ठरवावयाचें असून शेवटीं उपनायक अर्थात् **राक्षस** याला काळ प्रतिकूळ झाल्यामुळें हार खावी लागली असें दाखविण्याचा कवीचा हेतु असावा, अशी जी कांहीं विद्वानांची समजून आहे ती अगदीं चुकीची आहे. कवीचा तसा हेतु नव्हता व कदाचित् असलाच तर तो योग्य रितीनें सिद्धीस गेला नाहीं, इतकेंच नाहीं, उलट अगदीं फसला आहे असें दिसतें. तें कसें ते दाखवितों—

आधीं **राक्षसानें** आपल्या डोळ्यांदेखत **चाणक्यासारख्या** तेजस्वी व दृढनिश्चयी मनुष्याचा अपमान होऊं द्यायचा नव्हता. बरें, कदाचित् झाला तरी **चाणक्याला** अनुकूळ करून घेण्याचा प्रयत्न करावयाचा होता. तेंही झालें नाहीं तरी **चंद्रगुप्तासारख्या** दुखविलेल्या घरभेद्या शत्रूचा आणि त्याचा मिलाफ होऊं द्यायचा नव्हता, व

तसें त्याला करतांही आलें असतें. कारण **चंद्रगुप्त** त्यावेळीं सर्वस्वीं **राक्षसा**च्या ताब्यांत होता असें ह्मणण्यास हरकत नाहीं. बरें तेंही असो. प्रत्यक्ष शत्रूच्या नगरांत आपलें कुटुंब ठेवून पळून गेला ही त्याणें फार मोठी चूक केली. **चंदनदासा**वर जर त्याचा इतका लोभ होता, तर त्याणें त्याला आपल्या बरोबर न्यायचें होतें, अथवा त्याची दुसरी कांहीं तरी व्यवस्था लावायची होती. पुढें **शकटदासा**ला त्याणें आपल्या जवळ ठेवला यांत कांहीं वावगें झालें नाहीं; पण त्याच्याबरोबर आलेल्या **सिद्धार्थका**ला—त्याची पुरती परीक्षा केल्यावांचून—आपल्याजवळ ठेवून घेतलें, हा केवढा वेडेपणा! बरें तेंही असो. **भागुरायण** इत्यादि सरदार फितूर झालेले असून ते **मलयकेतू**चे परम विश्वासुक बनूं दिले हें कोण शहाणपण! कदाचित् **भागुरायण मलयकेतू**चा हितकर्ता बनला होता, तेव्हा त्याला त्याच्यानें दूर करवलें नसतें असें ह्मणावें, तर पहिल्या प्रथम **मलयकेतू**वर **राक्षसा**चें जितकें वजन होतें तितकें **भागुरायणा**चें नव्हतें हें अगदीं उघड आहे; कदाचित् होतें असें मानलें तरी **राक्षस** जर मोठा कारस्थानी होता, तर त्याणें त्या दोघांत वैर कां पाडलें नाहीं? **जीवसिद्धि** हा धडधडीत **चाणक्या**च्या पक्षाचा मनुष्य, कित्येक दिवस **राक्षसा**च्या पक्षाचा आपण आहें असें दाखवून त्याच्या विश्वासाला पात्र होतो, ही गोष्ट **राक्षसा**च्या शहाणपणाला बट्टा लावणारी नाहीं काय? **सिद्धार्थक** कित्येक दिवस **राक्षसा**च्या तैनातींत असून त्याच्याजवळ असलेलें **चाणक्या**चें पत्र **राक्षसा**च्या माहितींत येत नाहीं हें काय? **राक्षसा**ची मुख्य मदार काय ती **मलयकेतू**वर होती. तर शत्रुपक्षाच्या लोकांनीं त्याला चो-

होंकडून घेरला असतांही राक्षसाला त्याचें वर्त्तमानदेखील नाहीं, हा कोठला कारस्थानीपणा ? जवाहिरे बनलेल्या ब्राह्मणांनीं पर्वतराजाच्या अंगावरचे दागिने राक्षसाला दिले. ते ब्राह्मण खुद्द कुसुमपुरांतलेच राहणारे होते. राक्षसाचा आणि शकटदासाचा सारा जन्म कुसुमपुरांतच गेला असून त्यांला त्यांचें खरें स्वरूप समजलें नाहीं किंवा तें जाणण्याविषयीं त्यांणीं प्रयत्न केला नाहीं, हें कोठलें शहाणपण ? त्यांनीं तीनच दागिने आणून विकले, यासंबंधानें राक्षसाच्या मनांत विकल्प येणें अगदीं साहाजिक होतें. वस्तुतः अशा प्रकारचे विकल्प एरव्हीं येण्याचें कांहीं कारण नाहीं; पण कारस्थानी ह्मणविणारा राक्षस चंद्रगुप्ताला पदच्युत करून चाणक्यासारख्याला हार देण्याविषयीं मिशांवर ताव देऊन बसलेला असून त्याला अशा कांहींच कल्पना आल्या नाहींत, हें मोठें नवल नव्हे काय ? तशा स्थितींत असलेला साधारणबुद्धीचा मनुष्यदेखील पदोपदीं साशंक असल्यावांचून राहणार नाहीं, हें उघड आहे; पण यापेक्षांही दुसरी एक मजा आहे ती निराळीच. चंद्रगुप्त हा प्रथम अगदीं गरीब व निर्बल असून केवळ चाणक्याच्या आश्रयानें त्याला एवढें मोठें वैभव प्राप्त झालें, व स्वत: तो ऐश्वर्याविषयीं निरिच्छ* असून केवळ चंद्रगुप्ताच्या हिताकरितां झटणारा होता, हें राक्षसाला माहीत नसेल असें ह्मणतां येत नाहीं. असें असून चाणक्यानें चंद्रगुप्ताशीं

* चाणक्यानें एवढा प्रयत्न करून निरपेक्षपणानें शेवटीं राज्यकारभार देखील राक्षसाला दिला यावरून त्याची निरपेक्षता व्यक्त होतेच; पण तो कारभार करीत होता त्यावेळीं देखील वैभवाचा उपभोग करीत नव्हता. ( याविषयीं पुढें भाग २ पृ. १४९ यावरील वेहीनरीचें भाषण पहा. ) यावरून तो किती निःस्पृह होता हें उघड होतें.

जो कृत्रिम कलह केला तो खरा मानून त्याच्यावर स्वारी करायला निघाला याला काय ह्मणावें तें समजत नाहीं.

असो. शेवटीं **मलयकेतूच्या** समोर जो **राक्षसाचा** फजिता उडाला त्यांत त्याणें आपल्या अंगीं शौर्याचा व त्याबरोबरच मसलतीचा फारसा सांठा नाहीं हें अगदीं उघड करून दाखविलें. पण त्याहीपेक्षां **कुसुमपुराजवळच्या** बागेंत भेटलेल्या गळफांस लावणाऱ्या मनुष्यानें त्याला जी खोटी हकीकत सांगितली व त्याच्या सल्ल्यावरून एकाद्या अजागळासारखा हातांतली तरवारदेखील ठेवून **चंदनदासा**जवळ जो तो गेला; त्यांत तर त्याणें आपल्या अंगीं कारस्थानीपणाचा व शौर्याचा गंध देखील नाहीं हें जगजाहीर करून दाखविलें. जर तो मोठा शूर होता तर तरवार एकीकडे ठेवून **चंदनदासाचें** रक्षण करावयास आला असता ?य? **चाणक्याच्या** मनांत त्याला कैद करावयाचें अथवा मारावयाचें नव्हतें, ही गोष्ट निराळी; पण कदाचित् त्याणें तसा हुकूम दिला असता तर **राक्षस** बोकडासारखा मारला गेला नसता काय ! कोणताही शूर पुरुष—ज्या ठिकाणीं शौर्याचाच मुख्यत्वें उपयोग आहे अशा ठिकाणीं—हातांतलें शस्त्र एकीकडे ठेवून जाईल काय ? व तसें करणाराला वेडा ह्मणूं नये तर काय ह्मणावें ? असो; तात्पर्य इतकेंच कीं, कवीनें ठिकठिकाणीं **चाणक्याकडून** त्याला मोठा स्वामिभक्त व शूर ह्मणविलें आहे, एवढ्यावरूनच पाहिजे तर त्याला कारस्थानीही ह्मणावें; पण त्याचें वर्त्तन—कवीनें दाखविलें आहे तें—मूळापासून अखेरपर्यंत सर्व भोळेपणाचें आहे यांत कांहीं संशय नाहीं. मग तो मुळींच कारस्थानी नव्हता किंवा कवीला त्याला तसें बनवितां आलें

हा, या गोष्टीचा निर्णय करणें फार कठीण आहे. तथापि कंदरींत त्याला कारस्थानी ही पदवी देतां येत नाहीं. वरून राक्षसाला आह्मी अगदींच मूर्ख ठरवितों असें मात्र णीं समजूं नये. त्याचें शाहणपण भोळेपणानें मिश्र लें होतें. चंद्रगुप्ताला मारण्याकरतां त्याणें ज्या कपट-कि केल्या त्यावरून त्याच्या अंगीं कारस्थानीपणा नव्हता सेंही नाहीं; पण तो केवळ ठराविक होता. नीतिशास्त्र-ारांनीं सांगितलेले उपाय त्याणें केले तथापि त्यास विशेष ाहाणपणाचें साह्य नव्हतें ह्मणून त्यांचा कांहीं उपयोग ाला नाहीं. आमच्या मतें एकंदरींत कवीनें राक्षसाचें पात्र । एक निस्सिम स्वामिभक्तीचा पुतळाच बनवून दाखविला ाहे यापरतें दुसरें कांहीं एक नाहीं. मित्रवात्सल्याविषयींही ाची तारीफ केली पाहिजे; पण या संबंधानें त्याच्यापेक्षांही ंदनदास विशेष स्तुतीस पात्रभूत आहे. असो.

येथवर आह्मांस जें कांहीं लिहावयाचें होतें तें थोडक्यांत लहिले. आणखीही पुष्कळ गोष्टी लिहिण्यासारख्या आहेत; ण तसें केल्यास विस्तार फार होईल ह्मणून त्या भरीस पडत ाहीं. शेवटीं साऱ्या संस्कृत भाषेंत अपूर्व असें जें हें राजका-स्थानी मुद्राराक्षस त्याचें आह्मीं यथामति जें रूपांतर करून ाचकांस सादर केलें आहे, त्याचा योग्य वाटेल त्याप्रमाणें त्यां-ीं स्वीकार करावा, अशी प्रार्थना करून व ज्यांणीं पुस्तकादि-कांच्या द्वारें उत्तम साह्य केलें आणि विशेषप्रकारची माहितीही ांगितली त्या सर्वांचे आभार मानून लेखणीला विश्रांति देतों.

**मुंबई,**
गिरगाव पोर्चुगीज चर्च
लाईन घर नं० २०
तारीख १ जानेवारी १८९०.

**वामन शास्त्री इसलामपुरकर.**

ॐ नमः श्रीगणेशाय.

# आर्यचाणक्य.

धन्या केयं स्थिता ते शिरसि? शशिकला किं नु नामैतदस्याः?
नामैवास्यास्तदेतत्परिचितमपि ते विस्मृतं कस्य हेतोः? ।
नारीं पृच्छामि नेन्दुं कथयतु विजया, न प्रमाणं यदीन्दुर्
देव्या निह्नोतुमिच्छोरिति सुरसरितं शाठ्यमव्याद्विभोर्वः ॥ १ ॥

ह्या कलियुगाच्या प्रारंभीं *मगध देशांत †कुसुमपुर नांवाच्या राजधानींत ‡नंद नांवाचे क्षत्रिय राजे राज्य करीत होते. त्यांत सर्वार्थसिद्धि नांवाचा महापराक्रमी राजा

---

* **मगध** हें नाव पूर्वी विशेष प्रसिद्ध होतें, पण सांप्रत या देशाला **बहार** प्रांत म्हणतात. हा **बंगाल** इलाख्यांत मोडतो.

† **पाटलिपुत्र** अथवा सांप्रत ज्याला **पाटणा** ह्मणतात त्यालाच **कुसुमपुर** हें दुसरें नाव आहे. **मगध** देशाची मुख्यराजधानी येथेंच होती. **पांडवांच्या** वेळचा ह्या देशाचा राजा **जरासंध** याच्या राजधानीचें नाव **गिरिव्रज** होतें असें **भागवतादि** ग्रंथांत वर्णन केलें आहे. त्यालाच पुढें **पाटलिपुत्र** व नंतर **कुसुमपुर** ही नावें पडली असावीं. **पाटलिपुत्र** हें नाव कसें पडलें याविषयीं आह्मी केलेल्या बृहत्कथासागरांत मोठी चमत्कारिक कथा सांगितली आहे. भा० १ पृ० २४—३५ पहा.

‡ कलियुगांत क्षत्रिय नाहींत, असें पुराणांत वर्णन केलें आहे. **नंद** हे शेवटचे क्षत्रियराजे. **नंदाचा** वंशक्षय झाला तेव्हांपासून पुढें जे राजे झाले ते शूद्र असें वर्णन केल्याचें आढळतें. पण तें खरें दिसत नाहीं. कारण "कलियुगांत क्षत्रिय नाहींत" हें वचन प्रमाण मानलें तरी आणखी सुमारें २७००० वर्षेंपर्यंत ह्मणजे द्वापाराच्या अखेरीपासून ३२००० वर्षेंपर्यंत युगसंधि आहे. खऱ्या कलियुगाचा प्रारंभ ३२००० वर्षांनंतर होणार. असें पौराणिकांचेंच मत असल्यामुळें कलियुगांत क्षत्रियाचा अभाव असला तर तो ३२००० वर्षांनंतर असला पाहिजे. **विक्रमादित्य, पृथुराज, श्रीहर्षदेव,**

होता. त्यानें बहुत वर्षें पृथ्वीचें राज्य केलें. त्याच्या-जवळ नऊशें कोटी भरेल इतकें द्रव्य होतें. या द्रव्यसंग्रहाच्या संबंधानें लोकांत त्याची मोठी प्रसिद्धि होती. निरनिराळ्या अधिकारावर नेमलेले **वक्रनास** इत्यादि त्याचे अनेक मंत्री असून त्यांत ***राक्षस** नांवाचा एक ब्राह्मण मुख्य प्रधान होता.

त्या **राक्षसाची** नीतिशास्त्रांत विशेष प्रवीणता असून तो मोठा कारस्थानी होता. स्वत: त्याचें वर्तन पवित्र व निर्दोषी होतें व इतरांकडून तसें वर्तन करविण्याच्या कामीं

---

इत्यादि निरनिराळे मोठमोठे राजे होऊन गेले असून ते मोठे स्वधर्मनिष्ठ असून आपल्याला क्षत्रिय ह्मणवीत असत. ते क्षत्रियांला विहित असे अश्वमेधादि यज्ञ करीत होते, व हे सर्वही **नंदवंशाचा** क्षय झाल्यानंतर उत्पन्न झाले आहेत. तेव्हा **नंदवंशक्षयानंतर** क्षत्रिय नाहींत, असें ह्मणणें सयुक्तिक दिसत नाहीं. सांप्रतही राजस्थानात क्षत्रिय असून ते स्वधर्माप्रमाणें वर्तन करीत आहेत.

* **गुणाढ्य** कवीनें पिशाचभाषेंत रचलेल्या **बृहत्कथेंत** नंदराजाचें चरित्र वर्णन केलें असून त्यांत **नंदाचा** मुख्य प्रधान कांहीं दिवस **शकटाल** व नंतर **वररुचि** होता, असें सांगितलें आहे. प्रकृतस्थलीं **राक्षस** ह्मटला आहे तो कदाचित् **वररुचीच** असावा असें वाटतें. कारण **राक्षस** हें एका जातीच्या क्रूर प्राणिवर्गाचें सामान्य नाव आहे, व अशा प्रकारचें सामान्य नाव विशेष नाव झाल्याचें कोठें आढळत नाहीं. उदाहरणार्थ, मनुष्य हें सामान्य नाव आहे. पण तेंच एका व्यक्तीचें विशेष नांव असें मानता येणार नाही. याशिवाय **वररुचीचा** काहीं कारणामुळें अत्यंत जिवलग मित्र झालेला एक **राक्षस** होता, व तो त्याच्या साह्यानें अनेक अचाट कृत्यें करीत असे, असें **बृहत्कथेंत** सांगितलें आहे. त्यावरून अलौकिक चमत्कार करणाऱ्यांला लोक जसे देव किंवा देवाचा अंश म्हणतात, तसेंच **वररुचीनें** राक्षसाच्या साह्यानें अचाट कृत्यें केल्यावरून लोक कदाचित् त्याला **राक्षस** म्हणत होते असतील. **वररुचीचीं** अचाट कृत्यें वगैरे समजून घेण्याची त्याला इच्छा असेल त्याणीं आम्हीं महाराष्ट्र भाषेंत रचलेल्या **बृहत्कथासागर** नावाच्या पुस्तकाचा पहिला भाग पहावा.

तो नेहमीं दक्ष असे. त्यानें **नंदाच्या** राज्याचीं सर्व सूत्रें आपल्या हातांत धरलीं होतीं. विद्वान्, शूर, व राजा आणि प्रजा यांच्या हिताविषयीं तत्पर असून स्वतः निस्पृह असल्या-मुळें **राक्षस** सर्व लोकांना अत्यंत प्रिय झाला होता. त्याचें राजकार्यनिपुणत्व इतकें कांहीं विलक्षण होतें कीं, तो कारभार करूं लागल्यापासून **नंदाच्या** राज्याला उपमा देण्यासारखें पृथ्वीवर दुसरें उत्तम राज्यच नाहीं असें झालें होतें!

राजा **सर्वार्थसिद्धि** याला दोघी स्त्रिया होत्या. वडील बायकोचें नांव **सुनंदा,** ही क्षत्रियाची कन्या असून वडील-पणाच्या नात्यानें पट्टराणी झाली होती. धाकट्या बायकोचें नांव **मुरा,** ही एका शूद्राची* मुलगी होती. तिचें सौंदर्य व स्वभाव फार आवडत असल्यावरून **सर्वार्थसिद्धि** राजाची तिच्यावर विशेष प्रीति होती. राजाची धाकट्या बायकोवर मर्जी होती तरी पट्टराणी **सुनंदा** हिचा त्याणें अनादर केला होता, असें नाहीं. दोघींलाही तो त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें वागवीत होता.

याप्रमाणें राजा **सर्वार्थसिद्धि** ह्याला दोघी स्त्रिया होत्या तरी पुष्कळ दिवस त्यांच्या पोटीं संतति झाली नव्हती. दिव सेंदिवस वय अधिक होत चाललें असून संतान होण्याचें कांहींच लक्षण दिसेना, ह्मणून राजा फार दुःखी होता, अशा स्थितींत एके दिवशीं त्याच्या घरीं कोणी मोठा

---

‡ **नंद हा** क्षत्रिय होता तरी त्यानें शूद्राची मुलगी **मुरा** हिला आपली स्त्री करून घेतली. कारण कोणत्याही वर्णाला आपल्या खालच्या वर्णांतील मुली-शीं विवाह करून घेण्याविषयीं धर्मशास्त्रकारांची आज्ञा असून ती पूर्वी प्रचा-रांतही होती.

तपोनिष्ठ अतिथि सहज प्राप्त झाला. पोटीं पोरबाळ कांहीं नसलें ह्मणजे साधुसंत अतीथअभ्यागत यांच्या सेवेकडे गृहस्थाश्रम्यांचें विशेष लक्ष्य असतें. त्यांतून बायकांला तर त्यांचा फारच नाद असतो.

तो अतिथि मोठा तेजस्वी आहे असें पाहून राजा **सर्वार्थसिद्धि** आणि त्याच्या दोघी स्त्रिया यांणीं त्याचें भक्तिपूर्वक विशेष आदरातिथ्य केलें. त्यांनीं त्या तपस्व्याला रत्नखचित उत्तम आसनावर बसवून अर्घ्यपाद्य इत्यादि उपचारांनीं यथाविधि पूजा केली. आणि त्याच्या आज्ञेनें त्याचें पादोदक राजानें दोघी स्त्रियांच्या मस्तकांवर शिंपलें.

पादोदक शिंपडतांना राजानें बुद्धिपूर्वक तसें केलें नाहीं, तरी पट्टराणी **सुनंदा** हिच्या मस्तकावर त्याचे नऊ थेंब पडले व धाकटी स्त्री **मुरा** हिच्या मस्तकावर एकच थब पडला. हा साहजिक घडलेला प्रकार पाहून त्या तपस्व्यानें—पट्टराणीला नऊ पुत्र होतील, व **मुरे**ला एकच होईल; पण तो मोठा गुणवान् व भाग्यशाली होईल, असें सांगितलें. राजानें हा आपल्यावर मोठा अनुग्रह झाला, असें मानून तो अतिथीच्या चरणीं अत्यंत लीन झाला.

याप्रमाणें संततीविषयीं काळजी करीत असलेल्या राजावर अनुग्रह करून अतिथि निघून गेला. इकडे त्या अतिथीच्या प्रसादानें ह्मणा, किंवा तसा योग आल्यावरून ह्मणा—राजाच्या दोन्ही स्त्रिया गरोदर होऊन अनुक्रमानें थोरलीला नऊ व धाकटीला एक असे पुत्र झाले. **सुनंदे**च्या नऊही पुत्रांला **नंद** अथवा **नवनंद** असेंच ह्मणत

असत. **नवनंद*** या नांवानेंच ते विशेष प्रसिद्ध झाले होते. हे नऊही बंधु मोठे तेजस्वी असून पराक्रमी होते. मुख्य-प्रधान **राक्षस** याणें लहानपणापासून त्यांला उत्तम शिक्षण देऊन सर्व विद्या आणि कला यांत विशेष प्रवीण केलें होतें.

**मुरे**ला एकच पुत्र झाला. त्याला **मौर्य** असें नांव ठेविलें. **सुनंदे**च्या नऊही पुत्रांपेक्षां हा मुलगा मोठा बुद्धिमान् असून पराक्रमी होता. राजा **सर्वार्थसिद्धि** याचा धाकट्या बायकोवर विशेष ओढा होता, ह्मणूनच केवळ नाहीं, तर त्या पुत्राच्या गुणांला व स्वभावाला पाहून राजा त्याच्यावर विशेष प्रेम करीत होता. आपल्या यजमानाशीं एकनिष्ठपणानें वागणाऱ्या **राक्षसानें सुनंदे**च्या पुत्रांप्रमाणेंच **मौर्या**वरही विशेष लक्ष्य ठेवून त्याला विद्याकला इत्यादिकांत प्रवीण केलें.

राजा **सर्वार्थसिद्धि** दिवसेंदिवस थकत चालला. आतां राज्यभार वाहण्याची दगदग फार दिवस तोलली जाणार नाहीं असें पाहून त्याणें कांहीं परमार्थ साधण्याचा विचार केला. मुख्य प्रधान **राक्षस** हा सर्वस्वीं आपल्या हिताविषयीं तत्पर असून तो सर्व प्रकारें समर्थ व शूर असल्यामुळें राज्याविषयीं त्याला कांहींच काळजी नव्हती; पण आपले मुलगे आपसांत भांडतील, याची मात्र मोठी भीति होती. **सुनंदे**चे नऊ पुत्र असून

* **श्रीमद्भागवता**च्या १२ व्या स्कंधात **नवनंद** असेच ह्मटलें आहे; पण **गुणाढ्या**च्या **बृहत्कथें**त **नंद** नऊ असल्याचें कोठेंच आढळत नाहीं. त्यांत **नंद** राजाची जी कथा वर्णन केली आहे ती येथें सांगितलेल्या कथेशीं पुष्कळ ठिकाणीं मिळत नाही. याविषयीं **बृहत्कथासागर** भाग १ ला पृ० ५१—८४ पहा.

ते मोठे पराक्रमी होते. वडीलपणाच्या नात्यानें राज्याचा अधिकार त्यांच्यापैकीं ज्येष्ठ बंधूला मिळणार हें तर सिद्धच होतें; तथापि ते स्वभावानें उग्र असून मोठे खुनशी होते. राजाची आवडती स्त्री **मुरा** हिचा एकुलता एक मुलगा असून तो शूद्रीचा पुत्र असल्यामुळें राज्याचा वारसा सांगण्याचा त्याला अधिकार नव्हता. तरी त्याचा उत्तम स्वभाव व गुण यांला मोहित होऊन लोक त्याला विशेष चाहत होते. यामुळें **सुनंदे**चे पुत्र अर्थात् त्याचा द्वेष करीत असत, व नवनंद हे केव्हांतरी **मौर्या**चा घात करतील अशी राजालाही भीति होती.

ह्मातान्या राजानें त्यांतल्या त्यांत **मौर्या**चें हित करावें ह्मणून **सुनंदे**च्या पुत्रांपैकीं वडील मुलग्याला राज्याभिषेक करून **मौर्या**ला त्याचा मुख्य सेनापति केलें. कारण, तो आपल्या गुणांनीं फौजेला अनुकूल करून घेईल व त्याच्या योगानें त्याचा बचाव होईल, असें राजानें मनांत आणलें होतें. याप्रमाणें पुत्राला राज्य देऊन मुख्य प्रधान **राक्षस** याला जें काय सांगावयाचें होतें, तें सांगून राजानें पारमार्थिक साधन करण्याकरितां तपोवनाचा आश्रय केला.

इकडे **राक्षसा**च्या राज्यकारस्थानाखालीं अधिकार चालविणाऱ्या **नंदा**चें राज्य पूर्वीप्रमाणेंच उत्तम प्रकारें चाललें होतें. आपला सावत्र बंधु **मौर्य** याच्या संबंधानें ***नंद** वरचेवर कांहीं कुरकूर करीत असत. पण सर्व कारभार **राक्षसा**च्या हुकुमानें चालला असून **नंद** हे केवळ नांवाचे

* नंद हे नऊ असामी बंधु होते यामुळें त्यांचा बहुवचनात निर्देश केला आहे तरी क्वचित् एकवचनाचाही प्रयोग केला आहे. मुळांतही असेंच आहे.

धनी होते व **मौर्याला राक्षस** योग्य रीतीनें वागवीत होता, यामुळें बरेच दिवसपर्यंत **नंदाचें** कांहीं चाललें नाहीं.

**मौर्य** जसा बुद्धिमान् होता, तसाच सामर्थ्यवान्ही होता. त्यानें पुष्कळ स्त्रिया करून घेतल्या होत्या. व त्यांच्या पोटीं त्याला एकंदर शंभर पुत्र उत्पन्न झाले होते. **नंद** हे आपण नऊजण सहोदर बंधु आहों ह्मणून जी मोठी घमंड बाळगीत होते, ती **मौर्याला** बलवान् व पराक्रमी असे शंभर पुत्र झाल्यामुळें अर्थातच नाहींशी झाली. **राक्षसानें नंद** आणि **मौर्य** यांचा कलह न होऊं देतां बरेच दिवसपर्यंत नेटानें कारभार चालविला होता; तथापि दिवसेंदिवस त्या दोघां सावत्र बंधूंचा द्वेष अधिकाधिक वाढतच गेला.

**मौर्याच्या** हातीं सर्व फौजेचा अधिकार होता, व जसजसे त्याचे पुत्र प्रौढ होत गेले, तसतसे त्याणें आपल्या हाताखालीं निरनिराळ्या अधिकारांवर त्यांना नेमलें; यामुळें **नंदाला** त्यांचें फार भय वाटूं लागलें. राज्याचा अधिकार काय तो फौजेच्या बळावर चालावयाचा, आणि ती तर **मौर्यानें** व्यापली. तेव्हां तो आपला केव्हां घात करील याचा कांहीं नेम नाहीं, असा संशय घेऊन **नंदांनीं** पुत्रांसहवर्तमान **मौर्याचा** नाश करण्याची मसलत चालविली.

मुख्य प्रधान **राक्षस** हा मोठा चतुर होता. **मौर्याचें** वर्तन संशय घेण्यासारखें नसून तो तशी गोष्ट करणार नाहीं, अशी **राक्षसाची** खात्री होती. तरी **नंदाच्या** अतिशय आग्रहापुढें त्याचाही कांहीं इलाज चालेनासा झाला. शेवटीं **मौर्याला** विश्वास उत्पन्न करून कांहीं राजकीय कारणाकरितां पुत्रांसहवर्तमान तूं थोडे दिवस

अगदीं गुप्त ठिकाणीं राहिलें पाहिजेस, असें सांगून **मौर्या**-करवीं तसें करण्याचें वचन घेतलें. आणि त्याला नकळत एक मोठें भुयार तयार करून शंभर पुत्रांसहवर्तमान **मौर्याला** युक्तीनें त्या भुयारांत घातलें, आणि तत्काल भुयाराच्या दारावर मोठी शिळा ठेवून तें बंद केलें!

वस्तुतः स्वतः महापराक्रमी असून एकापेक्षां एक शंभर पुत्र त्याच्या साह्याला तयार होते. अशा **मौर्याला** भुयारांत घालण्याची **नंदांची** छाती झाली नसती, पण तो विश्वासानें फसला. **नंदांच्या** विरुद्ध कांहीं खटपट करावी, असें त्याच्या ध्यानीमनीं देखील नव्हतें; ह्मणून तो मोकळ्या मनानें वागत होता. ज्यांच्या अंगीं शौर्य असतें ते पुरुष बहुतकरून मनाचे मोकळे असतात. त्यांला कुजक्या कल्पना घेत बसण्याची संवय नसते. ते आपल्या तरवारीच्या बळावर बेफिकीर असतात. **मौर्य** व त्याचे पुत्र अशाच प्रकारचे होते. राजकीय मसलतीकरितां थोडे दिवस अज्ञातवास पत्करावा लागला तरी कांहीं हरकत नाहीं, असें समजूनच **मौर्य** व त्याचे पुत्र भुयारांत गेले. नाहींपेक्षां बळजोरीनें त्यांला तशा ठिकाणीं घालण्याची **नंदाची** मुळींच छाती झाली नसती.

याप्रमाणें विश्वासानें फसवून **मौर्याला** भुयारांत घातल्यावर त्या दुष्ट व क्रूर **नंदांनीं** अतिशय निर्दयपणाचें वर्तन केलें. शंभर पुत्र व **मौर्य** अशा एकशें एक मनुष्यांला निर्वाहाकरितां ह्मणून एक लहानशा गाडगेंभर पाण्यांत कालविलेलें सात्वांचें पीठ* व एक गाडगेंभर पाणी

---

* उत्तरहिंदुस्थानांत सात्वांचें पीठ पाण्यांत कालवून पिण्याची चाल आहे. याला संस्कृतांत सक्तू व हिंदी भाषेंत सत्तू ह्मणतात.

दोरीला बांधून प्रतिदिवशीं त्या भुयारांत सोडीत असत! नंदांनीं आपला घात केला ही गोष्ट, भुयाराच्या दारावर मोठी शिला ठेवून त्याचा अगदीं पक्का बंदोबस्त करून घेतला, तेव्हांच **मौर्याच्या** मनांत येऊन चुकली; पण उपयोग काय ? सापळ्यांत सांपडलेल्या वाघापेक्षांही या वेळीं त्याची स्थिति फार वाईट झाली होती. त्यानें आपल्या भोळेपणाविषयीं पुष्कळ शोक केला; पण शेवटीं निरुपायास्तव त्याला तेथल्या तेथें टांचा घासून मरणें भाग पडलें !

एकशें एक मनुष्यांच्या दाढेला देखील लागावयाचें नाहीं, इतक्या थोड्या सात्वांच्या पिठावर व डोळ्यांला लावायला देखील पुरावयाचें नाहीं इतक्या पाण्यावर त्यांचा कसा निर्वाह लागणार ! तें थोडेंसें सात्वांचें पीठ सर्वांनीं वांटून घेतलें तर एकाचेंही पोट भरणार नाहीं, आणि शेवटीं सगळेच मरून जाणार. तेव्हां कोणी तरी एकानें त्यांवर निर्वाह करून जगावें हें बरें, असा विचार करून **मौर्यानें** आपल्या पुत्रांला तसें करण्यास सांगितलें.

**मौर्याच्या** शंभर पुत्रांपैकीं वडील पुत्राचें नांव **चंद्रगुप्त**. हा बुद्धि व पराक्रम यांनीं सर्वांहून अधिक होता. **मौर्यानें**, एकानें कोणी तरी वांचावें अशी तोड काढली तेव्हां आपसांत भवति न भवति होऊन शेवटीं—**चंद्रगुप्तानें** तें सात्वांचें पीठ व पाणी यांचा स्वीकार करून, जिवंत रहावें असा निश्चय झाला. नंदांनीं दुष्टपणानें त्याला संकटांत घातलें तरी **मौर्य** त्यांचा आजपर्यंत तितका द्वेष करीत नव्हता. पण आतां मात्र तो त्यांचा पक्का वैरी झाला. **चंद्रगुप्तानें**

जिवंत रहावें, असा ठराव झाला, तेव्हां **मौर्यानें** त्याची पाठ थोपटून—जर तूं खरा पितृभक्त असशील तर **नंदांचा** अगदीं निर्वंश करून टाक, असें सांगितलें. व **चंद्रगुप्तानें**ही त्याप्रमाणें करण्याची प्रतिज्ञा केली.

विचार करून पाहिलें तर **मौर्याचें** व **चंद्रगुप्ताचें** या वेळीं हें मनोराज्यच होतें. कारण, **चंद्रगुप्त** जिवंत राहिला होता तरी भुयारांतून बाहेर आल्यावांचून त्याच्या हातून कांहींच होण्यासारखें नव्हतें. व सात्वांचें पीठ आणि पाणी यावयाचें बंद झालें म्हणजे त्याचे प्राणही राहण्याचा संभव नव्हता. तथापि पुढें जें होईल तें होईल, कदाचित् तसा योग आला तर **नंदांचा** सूड घेऊं, या आशेवर त्यांनीं तशी व्यवस्था केली.

नंतर प्रतिदिवशीं सात्वांचें पीठ आणि पाणी भुयारांत येई तें **चंद्रगुप्त**च घेत असून बाकीचे त्याबद्दल कांहीं कुरकूर न करतां भुकेची आग सहन करीत होते. **चंद्रगुप्ता**ला, आपण एकट्यानेंच सात्वांचें पीठ व पाणी घ्यावें, हें योग्य वाटलें नाहीं. व तें सर्वांनीं थोड-थोडें घ्यावें, असा त्यानें आग्रह धरला तरी बापाच्या व बंधूंच्या सांगण्यावरून त्याला तो सोडावा लागला. त्याणें पुढच्या कार्यावर दृष्टि देऊन आपलें मन घट्ट केलें. नंतर लवकरच अन्नपाण्यावांचून राहिल्यामुळें पटापट त्यांचे प्राण जाऊं लागले! याप्रमाणें नव्याण्णव पुत्र व स्वतः **मौर्य** त्या भयंकर भुयारांत टांचा घासून हायहाय करीत व **नंदांला** अभिशाप देत मृत्यूच्या मुखांत पडले!

वस्तुतः या क्रूर कृत्याचा दोष मुख्य प्रधान **राक्षस**

याच्या माथीं ठेवण्यास कांहीं हरकत नाहीं. नंद हे राजे होते, तरी ते अविचारी असून मूर्ख होते. राक्षसासारख्या बुद्धिमान् व कारस्थानी असूनही धर्मन्यायाला अनुसरून वागणाऱ्या प्रधानाच्या कारकीर्दीत त्यानें अशी लाजिरवाणी गोष्ट होऊं द्यावयाची नव्हती. मौर्य व त्याचे पुत्र बलाढ्य असल्यामुळें नंदांच्या राज्याला अपाय होईल, अशी त्याला भीति वाटत असती तर त्याणें त्या शूर पुरुषांला एकाद्या बिकट लढाईच्या प्रसंगांत घालून पाहिजे तर त्यांचा नाश करवावयाचा होता. पण विश्वासानें भुयारांत घालून अन्नपाण्यावांचून वळवळायला लावून त्यांचे जीव घेतले, ही गोष्ट फारच वाईट झाली! एकंदरींत हीं राजकारस्थानेंच मोठीं भयंकर आहेत. सर्व लोक आपल्या हातीं अधिकार येण्यापूर्वी धर्म अधर्म न्याय अन्याय यांचें विवेचन करितात, व अमुक करावें, तमुक करावें असें सांगतात, व दुसऱ्यांच्या कृतीला दोषही देतात; पण त्यांच्याच हातीं अधिकार आला ह्मणजे धर्माला आणि न्यायाला एकीकडे गुंडाळून ठेवून हवींतशीं कृत्यें करण्याला मागें पुढें पहात नाहींत!

बिचारा चंद्रगुप्त त्या भुयारांत जिवंत राहिला होता, व आपल्याला केव्हां संधि मिळेल आणि केव्हां नंदांचा सूड घ्यायला मिळेल, याची तो वाट पहात होता. या भुयारांतून आपली सुटका होऊन बापाजवळ केलेली प्रतिज्ञा पूर्ण करावी, असा त्याचा बळकट इरादा होता. तरी तसा योग येण्याचा असंभव वाटून तो वरचेवर नाउमेद होत होता. पण भवितव्यता बलवत्तर असल्यामुळें त्याचा तो हेतु पूर्ण होण्याचा संभव अगदीं जवळ येऊन पोहोंचली.

मौर्याला पुत्रांसहवर्तमान भुयारांत घातल्यापासून नंदांला अतिशय आनंद झाला. त्यांला आपल्या हृदयांतला एक कांटा काढून टाकल्यासारखें वाटलें. बरेच दिवस होऊन गेले, तेव्हां भुयारांतले आपले शत्रु बहुतकरून मेले असतील, किंवा मरणाच्या पंथांत असतील, असें समजून त्यांची दुर्दशा पाहून आपले डोळे थंडगार करावे, या हेतूनें नंदांनीं भुयाराचें दार खुलें केलें. तेव्हां एकट्या चंद्रगुप्तावांचून बाकीचे सर्व मरून पडले आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तें पाहून त्यांना फार संतोष झाला. चंद्रगुप्ताला तरी कशाला ठेवावा? असा विचार करून त्याला मारण्यास तयार झाले होते. पण—त्याच्या हातून आपल्याला मृत्यु येण्याकरितांच कीं काय चंद्रगुप्तावर दया करून त्यांणीं त्याला जिवंत ठेवलें!

याप्रमाणें निरपराधी शंभर मनुष्यांचा बळी घेऊन त्या मूर्खांनीं आपल्याला कृतकृत्य मानलें, पण जो चंद्रगुप्त त्यांचा समूळ घात करणार, त्याच्याविषयीं त्यांला कांहींच वाटलें नाहीं. भवितव्यता मोठी बलवत्तर आहे. तिच्या योगानें भलत्याच्या भलत्याच गोष्टी होतात, व प्रसंगीं बुद्धीला मोह उत्पन्न होतो. चंद्रगुप्ताला भुयारांतून वर काढलें, त्या वेळीं तो अत्यंत कृश व दीन झाला होता. पण लौकरच पूर्व स्थितीवर आला. बाप व बंधु यांची उत्तरक्रिया करण्याविषयीं लोकांनीं त्याला आग्रह केला, तेव्हां त्याच्या मनांत करावयाची नव्हती. तथापि आपल्याविषयीं संशय येऊं नये ह्मणून त्याणें ती कशी तरी केली. नंदांचा सूड घेतल्यावांचून आपल्या बापाचा व बंधूंचा अंतरात्मा शांत

होणार नाहीं. म्हणून आपण ज्या वेळीं तें कृत्य करूं त्या वेळीं त्यांची उत्तरक्रिया करावी, असा गुप्त इरादा धरून तो सवड पहात होता.

हातीं कांहीं सत्ता वगैरे नसल्यामुळें **चन्द्रगुप्त** निर्माल्य-वत् झाला होता. पण बुद्धीचा प्रभाव दाखविण्याची लव-करच त्याला संधि मिळाली.

एके दिवशीं **नंदांच्या** सभेंत एक विलक्षण गूढ प्रश्न प्राप्त झाला. मुख्य प्रधान **राक्षस** याणें आपल्या शाहाणपणानें व पराक्रमानें बाकीच्या सर्व राजांला पादाक्रांत करून टाकलें होतें. जिकडे तिकडे **नंदांचा** ध्वज फडकत अ-सून **राक्षसाचा** सर्वांवर दरारा बसला होता. राजेलोक निरुपायास्तव **नंदांचा** हुकूम मानीत होते, तरी मनांत जळफळत होते. व **नंदांची** सत्ता झुगारून देण्याविषयीं त्यांचे मनोरथ चाललेच होते. **सिंहलद्वीपच्या** राजानें उत्तम कारागिरांकडून एक मेणाचा सिंह तयार कर-विला. तो इतका हुबेहुब होता कीं, चतुर मनुष्यांला देखी-ल तो खरोखरीचाच सिंह आहे, असें वाटत होतें. त्या-च्या पोटांत कांहीं यंत्राची योजना करून ठेवल्यामुळें तो जिवंत सिंहाप्रमाणें किंकाळ्या फोडीत असून हुबेहुब त्याच्या सारख्या चेष्टा करीत असे. त्या सिंहाला एका मोठ्या पिंजऱ्यांत घालून **सिंहलद्वीपच्या** राजानें तो **नंदराजाच्या** कचेरींत पाठविला. आणि—तुमच्या दरबारांत कोणी शहाणा पुरुष असेल तर त्याणें—सिंहाला पिंजऱ्यांतून बाहेर न काढतां व पिंजरा आगींत न ठेवतां याला वितळवून टाकावा, अशी सूचना केली होती.

2

**सिंहलद्वीपच्या** राजाचा जासूद **नंदांच्या** सभेंत सिंहाचा पिंजरा घेऊन पोहोंचला, व त्याणें **सिंहलेश्वराचें** पत्र दिलें. तें **राक्षसानें** वाचून पाहिलें, तेव्हां सर्वांला मोठा विचार पडला. मुख्य प्रधान **राक्षस** व इतरही मोठमोठे शहाणे होते. पण तो सिंह कशाचा आहे, याविषयीं कोणाचीच कांहीं कल्पना चालली नाहीं. **चंद्रगुप्त**ही तेथें बसला होता, तो बुद्धिमान् आहे, अशी **नंदांचीही** समजूत होती. त्यांणीं थट्टेनें—तुझी कांहीं कल्पना चालत असेल तर चालिव, असें सांगितल्यावरून **चंद्रगुप्तानें** लक्षपूर्वक पाहून तो सिंह मेणाचा आहे, असा आपल्या मनांत निश्चय केला. आणि लोखंडाची पहार तापवून आणून ती त्याच्यावर धरली तेव्हां तो हळू हळू वितळून गेला! हें त्याचें विलक्षण चातुर्य पाहून सर्व लोक अगदीं थक्क झाले व जिकडे तिकडे **चन्द्रगुप्ताची** तारीफ सुरू झाली.

**चंद्रगुप्तानें** जें काम केलें तें झालें नसतें तर आपल्या दरबारच्या लोकांच्या शहाणपणाचा बोजवारा उडाला असता. **चंद्रगुप्तानें** दरबारची अब्रू रक्षण केल्याबद्दल **नंदांला** अतिशय आनंद होऊन त्यांनीं त्याला मोठी शाबासकी दिली, व पहिल्यापेक्षां त्याला अम्मळ सौम्यपणानें वागवूं लागले. तथापि लौकरच त्यांच्या मनांत **चंद्रगुप्ताविषयीं** द्वेष उत्पन्न झाल्यावांचून राहिला नाहीं.

**चंद्रगुप्त** सर्व लक्षणांनीं संपन्न होता. त्याचे हात गुडघ्यांपर्यंत लांब होते. पायांच्या तळव्यावर ध्वज, वज्र, इत्यादि उत्तम राजचिन्हें होतीं. त्याचा स्वभाव मोठा उदार असून अंगीं शौर्य विशेष होतें. त्याचे विचार पोक्त

असून फार खोल होते. सर्वांशीं नम्रपणानें वागून त्यांला अनुकूल करून घेण्याची हातोटी त्याला उत्तम प्रकारें साधली होती. तो पट्टराणीच्या संततीपैकीं नव्हता, तरी राजपुत्राचा पुत्र होता. त्याचे उत्तम गुण व आकृति पाहिली ह्मणजे—हा कोणी सामान्य मनुष्य नसून सार्वभौम राजा होण्याला योग्य आहे, असें लोकांना वाटत होतें. दिवसेंदिवस दरबारांतील कामदार व इतर लोक यांचा त्याच्यावर विशेष अनुराग बसत चालला.

दुष्टबुद्धीच्या मनुष्याला दुसऱ्याचे उत्तम गुण व त्याचा उत्कर्ष मुळींच सहन होत नाहीं. यामुळें नंद पुनः **चंद्रगुप्ताचा** विशेष द्वेष करूं लागले. त्याचा त्यांणीं घातच करावयाचा; पण सुदैवानें त्यांला तशी बुद्धि सुचली नाहीं. **चंद्रगुप्ताला** रिकामा ठेवला तर तो कांहीं खटपटी करील, ह्मणून त्याच्याकडे कांहींतरी कामगिरी द्यावी, असा बूट निघाला. खरें ह्मटलें तर **चंद्रगुप्ताला** सेनापतीचें काम देणें योग्य होतें; व त्याच्या बापानें तें काम केलें असल्यामुळें त्याचा त्यावर विशेष हक्क पोहोंचत होता. पण त्याची हेळणा करावी ह्मणूनच कीं काय **नंदांनीं** अन्नछत्रावर त्याची नेमणूक केली!

**चंद्रगुप्ताला,** आपल्या बापाला व नव्याण्णव भावांना **नंदांनीं** कोणत्या रीतीनें मारलें व बापाचें प्राणोत्क्रमण होतें असतां आपण काय प्रतिज्ञा केली, त्याचें विस्मरण झालें नव्हतें. त्या गोष्टीची आठवण करून तो सर्पासारखा वरचेवर सुस्कारे टाकीत होता; पण करतो काय! शत्रु प्रबळ असल्यामुळें मुकाट्यानीं सवड मिळण्याची वाट पहात

होता. वस्तुतः अन्नछत्राच्या देखरेखीसारखें भिकार काम हातीं घेणें त्याला मोठें लाजिरवाणें वाटलें, तथापि निरुपायास्तव त्याणें तें काम पत्करलें. व त्याच द्वारानें त्याचा हेतु पूर्ण होऊन सर्व प्रकारें उदय झाला!

याप्रमाणें ज्याचा क्रोधाग्नि हृदयांत धगधगतो आहे, पण निरुपायास्तव ज्याणें बाह्यात्कारें सौम्यरूप धारण केलें आहे, असा **चंद्रगुप्त** त्या भिकार अन्नछत्राची देखरेख ठेवण्याचें काम करीत असतां, **नंदांचा** समूळ उच्छेद करून **चंद्रगुप्ताला** ऐश्वर्याच्या शिखरावर बसविणारा, बुद्धि व प्रभाव यांच्या योगानें अप्रतिम या प्रकारच्या अलौकिक पुरुषाची त्याला गांठ पडली.

**कान्यकुब्ज** देशांत **चणक** नांवाचा एक मोठा विद्वान् ब्राह्मण होता. तो वेद आणि वेदांगें यांत पारंगत असून नीतिशास्त्रांत मोठा प्रवीण होता. त्याणें नीतिशास्त्रावर स्वतंत्र *ग्रंथ रचले होते. **चणकाला** अप्रतिम बुद्धिमान् असा **विष्णुगुप्त** नांवाचा एक पुत्र होता. त्याणें अल्पवयांत चतुर्दश विद्या आणि कला यांचा अभ्यास पुरा केला. तो वयानें लहान होता, तरी बुद्धीनें आणि तेजानें **बृहस्पति**,

---

* **रामायण**, **महाभारत**, व **स्मृति**, इत्यादि प्राचीन ग्रथांत प्रसगाविशेषानें थोडथोडी राजनीति सागितली आहे. पण सर्व विषय एकत्र मिळेल, अशा प्रकारचे या विषयावर ग्रंथ रचले नव्हते. ही उणीव **चणकानें** भरून काढण्याचा प्रारभ केला. व त्याच्या पुत्रानें अर्थात् **विष्णुगुप्तानें** त्याचा विशेष विस्तार केला. **लघुचाणक्य** आणि **वृद्धचाणक्य** नावांचे नीतिशास्त्रावरचे जे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत, त्यांतून **लघुचाणक्य** हा ग्रंथ आद्य असून **चणकानें** रचलेला असल्याबद्दल विद्वान् लोकांत प्रसिद्धि आहे. या उदंतीचा आधार धरून **चणकाचा** पुत्र **विष्णुगुप्त** याणें **वृद्धचाणक्य** व दुसरे इतर ग्रंथ रचले असें म्हणतात.

व अग्नि यांलाही मागें टाकणारा होता. त्यानें विशेषतः एकाच वेदाचें अध्ययन केलें होतें, तरी बुद्धिप्रभावानें चारही वेदांचा अर्थ तो जाणत होता.

**चणक** हा ब्राह्मण होता, तरी प्रतिग्रह न घेणारा असून गृहस्थी* संप्रदायानें वागत होता. यामुळें त्याचा पुत्र **विष्णुगुप्त** मोठा विद्वान् होता, तरी त्याची भिक्षुकांत गणना नव्हती. **चणक** हा राजकीय कामांत उलाढाली करणारा असल्यामुळें **विष्णुगुप्ता**ला लहानपणापासून त्याच विषयाची आवड होती. **विष्णुगुप्ता**चें या वेळीं अवघें पंधरा वर्षांचें वय होतें. त्याच्या बुद्धीचा प्रभाव लोकांत विशेष प्रख्यात झाला होता, तरी तो केवळ अध्ययनादिकांच्या संबंधानेंच होता. राजकारस्थानांत पडण्याचा समय अजून आला नव्हता, व त्यामुळें त्या कामांत त्याचा विशेष लौकिक नव्हता; तरी हा अप्रतिम कारस्थानी होईल, असें सर्वांचें अनुमान होतें. **चणका**ला आपला पुत्र मोठा नांवलौकिकास चढेल अशी पूर्ण खात्री होती.

**विष्णुगुप्ता**ला† **चणका**चा पुत्र ह्मणून **चाणक्य** असें

* गृहस्थ म्हणजे संसारी अथवा गृहस्थाश्रमात असणारा, असा या शब्दाचा संस्कृतात अर्थ घेतात, तरी प्रचारात—दान दक्षिणा न घेणारा गृहस्थ व ती घेणारा भिक्षुक असें म्हणण्याची चाल आहे, तिलाच आह्मीही अनुसरलों आहों.

† **चाणक्य** हा ब्राह्मण होता याविषयी काहीच संशय नाहीं तथापि त्याला **विष्णुगुप्त** असें ह्मटलें आहे यावरून थोडासा संशय येण्याला कारण होतें. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार वर्णांच्या विशेष नामापुढें शर्म, वर्म, गुप्त अथवा पालित आणि दास हे शब्द अनुक्रमें जोडावे असा नियम असून प्राचीन ग्रंथात बहुतकरून असाच परिपाठ आहे. त्याप्रमाणें **चाणक्य** ब्राह्मण असल्यामुळें ज्याच्या नावापुढें 'शर्म' शब्द लावायचा अर्थात् त्याला **विष्णुशर्मा** म्हणायचें, तें सोडून वैश्यांच्या नांवा-

म्हणत असत. लहानपणीं मुलांशीं खेळत असतां देखील त्यानें कांहीं कावा करून आपल्या सोबत्यांना हां हां म्हणतां

---

पुढें लावायचा 'गुप्त' शब्द लावून **विष्णुगुप्त** असें नांव का ठेवलें ? ही एक मोठी शंका आहे. व त्या 'गुप्त' शब्दावरून **चाणक्य** वैश्य होता असेंही कदाचित् कोणाच्या मनात येईल, तर त्यासंबंधानें थोडासा येथे विचार केला पाहिजे.

**हितोपदेश** व **पंचतंत्र** या नांवाचे जे दोन ग्रंथ अत्यंत प्रसिद्ध आहेत त्यांची रचना करणारे दुसरे कोणीही असोत; पण **चाणक्य** अथवा **विष्णुगुप्त** यांनी जी नीति सांगितली तिलाच आधारभूत धरून त्या दोन्हीही ग्रंथाची रचना झाली आहे हें अगदी उघड आहे. **हितोपदेशांत** व **पंचतंत्रांत विष्णुगुप्त** असें न म्हणता **विष्णुशर्मा** असें म्हटलें आहे व या पुस्तकाला आधारभूत जें **मुद्राराक्षस** त्यात स्वत **चाणक्यानें**च आपल्याला **विष्णुगुप्त** असें म्हटलें आहे (See मुद्राराक्षसनाटक Act 1, page 61, Bombay Sanskrit Series) व इतरानीही पुष्कळवेळा त्याचें तसेंच नाव घेतलें आहे. असें आहे तरी **हितोपदेश** व **पंचतत्र** यातला **विष्णुशर्मा** आणि **मुद्राराक्षसां**तला **विष्णुगुप्त** एकच आहे यात काहीं संशय नाहीं, व यावरून वर्णभेदानें शर्म, वर्म इत्यादि जे शब्द लावायचे ते कधी कधी व्यत्यास पावत असत असें म्हणण्यास आधार मिळतो. हा व्यत्यास 'शर्म,' आणि 'गुप्त' अथवा 'रात' यांतच झाल्याचें दिसून येतें. उदाहरणार्थ **शुकाचार्य** आणि राजा **परीक्षिति** याचीच नावें घेतली तरी चालेल. **शुका**ला 'ब्रह्मरात' आणि **परीक्षिती**ला 'विष्णुरात' अशी नावें होती. यांचा उल्लेख **श्रीमद्भागवतांत** पुष्कळ ठिकाणीं आढळतो 'रात' म्हणजे रक्षित अर्थात् 'ब्रह्मरात' म्हणजे ब्रह्मानें (वेदानें) रक्षण केलेला व 'विष्णरात' म्हणजे विष्णूनें रक्षण केलेला असा या नावात अर्थ आहे. 'रात' आणि 'गुप्त' या शब्दाचा अर्थ एकच असून काही फरक नाहीं. एकच 'रात' शब्द **शुकाचार्य** ब्राह्मण असून त्यांच्याही नांवाला लावला व **परीक्षिति** क्षत्रिय असून त्याच्याही नांवाला जोडला आहे. याशिवाय **याज्ञवल्क्या**च्या पित्याला **देवरात, काशिराजाला ब्रह्मदत्त,** सिद्धातकर्ता ब्राह्मण असून **ब्रह्मगुप्त** या नावांनी प्रसिद्धि असल्याचें दिसून येतें. व **मौर्य** हा शूद्र असून त्याला **चंद्रगुप्त** म्हटलें आहे. यावरून आमच्या **कथानायकाला विष्णुगुप्त** असें म्हटलें आहे तें अयोग्य नसून मागच्या संप्रदायाला अनुसरूनच आहे असें सिद्ध होतें.

चकवावें. अशी त्याची जन्मतःच कुटील बुद्धि असल्या-मुळें लोकांनीं त्याला **कौटिल्य** असें नांव दिलें. व या नांवाचा इतका प्रसार झाला कीं, त्याचें मूळचें नांव **विष्णुगुप्त** हें अगदीं लोपल्यासारखेंच झालें. **चाणक्याच्या** अंगीं जे विशेष गुण होते, त्यांत हातीं धरलेल्या कामाचा पिच्छा सोडायचा नाहीं, हा गुण मुख्य होता. कारस्थानी पुरुषांला ह्या गुणाची विशेष आवश्यकता आहे. सामान्य मनुष्य एकादें काम विशेष विचार न करितां आरंभतात, व त्यांत कांहीं अडचण आली कीं लगेच तें सोडूनही देतात; पण **चाणक्य** तसा नव्हता. तो कोणतेंही काम दूरवर विचार केल्याशिवाय हातीं घेत नसे व घेतलें तर तें कधींही शेवटास नेल्यावांचून सोडीत नसे. त्याचा स्वभाव फार रागीट असून मोठा खुनशी होता. त्याला दृढनिश्चयाचें साह्य मिळाल्यामुळें त्याचीं मोठमोठीं कार्यें सिद्ध होऊन **चाणक्य** अविनाशी अशा कीर्तिमंदि-रांत विराजमान झाला.

बुद्धिमान् असून ज्यांच्या अंगीं कर्तबगारी असते, त्या पुरुषांला उगीच पडून राहवत नाहीं. **चाणक्याला** कुठल्या तरी राजकारस्थानांत शिरून आपला बुद्धिप्रभाव दाख-वावा, अशी फार इच्छा होती. पण पिढीजादा कोणताही अधिकार त्याच्याकडे नसल्यामुळें त्याला मुद्दाम त्यावि-षयीं प्रयत्न करावा लागला.

**नंद** हे **स्वभावानें** दुष्ट असल्याचा चहूंकडे बभ्रा झाला होता, तथापि **राक्षसाच्या** चातुर्यानें व त्याच्या सद्वर्तनानें राज्याचें गाडें सुयंत्र चाललें होतें व प्रजाही अनुरक्त होत्या.

तथापि **चंद्रगुप्ताच्या** संबंधानें थोडीशी गडबड चालली होती. कांहीं मंडळी **चंद्रगुप्ताच्या** पक्षाची होती. तसा समय न आल्यामुळें कोणीं आपला भाव व्यक्त करून दाखविला नव्हता, तरी हळुहळू खटपटी चालल्या होत्या.

**चाणक्य** कोणच्या तरी दरबारांत शिरण्याच्या विचारांत होता. या वेळीं **नंद** हे सार्वभौम राजे होते, तेव्हां अर्थात् मोठें दरबार काय तें त्यांचें. **नंदांचा** मुख्य प्रधान **राक्षस** याच्या बुद्धिवैभवाचा चोहोंकडे लौकिक पसरला होता, व जो तो त्याची तारीफ करीत होता. शाहण्याला शाहण्या मनुष्याच्या हाताखालीं राहणें आवडतें, व कदाचित् सामना करायचा झाला तरी शाहण्याशींच करावा असें वाटतें. **राक्षसासारख्या** शाहण्याजवळ कांहीं तरी आपली कर्त्तबगारी दाखवावी; असा विचार करून **चाणक्य नंदांच्या** दरबारांत प्रवेश करण्याच्या हेतूनें त्यांची मुख्य राजधानी **कुसुमपुर** येथें आला.

**चाणक्य** भिक्षुक नव्हता, हें वर सांगितलेंच आहे. सामान्यतः त्याच्या घरची स्थिति चांगली होती; तरी या वेळीं त्याणें भिक्षुकाचें सोंग घेतलें होतें. कोणत्याही राजदरबारांत सामान्यतः असें असतें कीं, स्वतः राजे लोक आल्या गेल्या मनुष्याकडे विशेष लक्ष पुरवीत नाहींत, व त्यांच्या जवळ असलेले कामदार लोक—कदाचित् हा आपल्यापेक्षां वरिष्ठ होईल, किंवा याच्या पुढें आपलें कांहीं चालणार नाहीं, अशा भीतीनें दुसऱ्या मनुष्याला दरबारांत शिरूं देत नाहींत! तेव्हां ज्याला तेथें प्रवेश करायचा असेल त्यानें मुंगीच्या रूपानें आंत शिरून मग

हत्तीचें रूप प्रगट केलें पाहिजे. ही गोष्ट **चाणक्य** पुरतेप-णीं जाणून होता. ह्मणून त्याणें आपल्या योग्यतेप्रमाणें डामडौल वगैरे कांहीं न करतां अगदीं दरिद्री ब्राह्मणाचें सोंग घेतलें.

अतीथ अभ्यागताला अनोळखी ठिकाणीं देवळें, धर्म-शाळा, किंवा अन्नछत्रें यांचाच प्रथम आश्रय करावा लागतो. त्याप्रमाणें **चाणक्या**ची स्वारी अन्नछत्रांत येऊन पोहोंचली. तो तेथें इतर अन्नार्थी लोकांबरोबर बरेच दिवस पुख्खा झोडीत पडला होता; तथापि गुप्तपणें दर-बारांतला अंतर्गत भेद समजून घेण्याचा त्याचा एकसारखा प्रयत्न चालला होता.

**चाणक्य** ज्या छत्रांत राहिला होता त्यावरचा मुख्य अधिकारी **चंद्रगुप्त** होता. अन्नछत्र, धर्मशाळा, पाणपोई इत्यादि मुषाफरांच्या जाग्यांत निरनिराळ्या वेषानें अनेक मोठमोठे पुरुष देखील कदाचित् येतात असें समजून व **चंद्रगुप्ता**ला नंदांचा सूड घेण्याकरितां कोणा तरी मोठ्या पुरुषाचा आश्रय संपादन करण्याची विशेष इच्छा होती; ह्मणून तो तेथें येणाऱ्या प्रत्येक मनुष्याला लक्षपूर्वक तपा-शीत होता.

तेजस्वी हिरा उकिरड्यांत पडला तरी झांकला जात नाहीं. **चाणक्य** अन्नार्थी बनला होता तरी त्याचें तेज झांकलें नव्हतें. यामुळें **चंद्रगुप्ता**चें—तो तेथें आल्या दि-वसापासून त्याच्यावर विशेष लक्ष होतें. व हा मनुष्य असाधारण योग्यतेचा असावा, असें त्याचें अनुमान होतें, तथापि त्याच्याविषयीं विशेष कांहीं माहिती मिळाली

नव्हती, व त्याच्याशीं तसा स्नेहही झाला नव्हता. म्हणून **चंद्रगुप्तानें** आपल्या हेतूच्या संबंधानें त्याच्याकडे कांहीं गोष्ट काढिली नाहीं. कारण एखादेवेळ ती गोष्ट फुटली तर आपल्या प्राणावर बेतेल, म्हणून तो फार जपत होता. त्याप्रमाणें त्याचा हेतु पूर्ण होण्याची वेळ लौकरच प्राप्त झाली.

एके दिवशीं **चाणक्य** त्या छत्राच्या जवळच एक तलाव होता, तेथें स्नान करून वेदघोष करीत सोंवळ्यानें छत्राकडे परत येत असतां वाटेंत एक दर्भाचें ठोंब होतें, त्यांतले दर्भ त्याच्या पायांला लागून कांकोरे आले. **चाणक्याचा** स्वभाव अतिशय रागीट होता, हें वर सांगितलेंच आहे. त्याला दर्भानें आपला पाय कापला ही गोष्ट बिलकूल सहन झाली नाहीं. त्यानें आपल्या खांद्यावरचे ओले पिळे व हातांतला तांब्या खालीं ठेवून, डाव्या हातांत काठी होती, तिच्या योगानें सारे दर्भ झोडपून झोडपून तोडून टाकले. दर्भ तोडले तरी त्याच्या रागाची शांति झाली नाहीं. म्हणून काठीनें त्यांचें ठोंब मुळापासून खणून काढण्याचा त्याचा प्रयत्न चालला होता!

**चंद्रगुप्ताची** त्याच्या वर्तनावर सारखी नजर होतीच, व या वेळीं तो तेथें जवळच होता. **चाणक्यानें** मुळापासून काय काय केलें, तें सर्व त्यानें पाहिलें. **चाणक्य** घामाघुम झाला असून काठीनें दर्भांचीं मुळें खणीत आहे हें पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें आणि तो त्याच्या जवळ येऊन त्याला नमस्कार करून म्हणाला, 'महाराज, हा काय उद्योग चालला आहे?'

**चाणक्य** म्हणाला, 'अरे, तुला ठाऊक नाहीं का? ह्या

बेटच्या दर्भांनीं विनाकारण माझा पाय कापला. तेव्हां ह्या दुष्टांला समूळ नाहींसें करून टाकण्याकरितां मी यांचीं पाळें-मुळें खणून काढीत आहें.'

**चाणक्याचें** हें उत्तर ऐकून **चंद्रगुप्ताला** मोठा आनंद झाला. दरिद्रानें गांजलेल्या मनुष्याला अकस्मात् द्रव्याचा निधि सांपडावा, त्याप्रमाणें या पुरुषाची गांठ पडली, असें **चंद्रगुप्तानें** मानलें. यःकश्चित् निर्जीव दर्भ याच्या पायांला लागल्यावरून हा इतका रागावला असून दर्भांचीं पाळेंमुळें खणून काढण्याचा प्रयत्न करीत आहे; तर सजीव मनुष्यानें याचा अपराध केला असतां हा काय करील, याची कल्पनाच करावयास नको! असें समजून **चंद्रगुप्तानें** आपल्या कामाकरितां **चाणक्याचे** पाय धरण्याचा मनांत निश्चय केला.

**चाणक्य** काडीनें उकरीत असल्यामुळें फार श्रम होऊन तो अगदीं घामाघुम झाला होता. **चंद्रगुप्तानें**—खोरें, कुदळ आणून देतों, म्हणून सांगितलें; पण तो नको म्हणाला. शेवटीं बराच वेळ श्रम करून त्यानें आपल्या पायांला कांकोरे काढणाऱ्या दर्भांचीं पाळेंमुळें जेव्हां खणून काढलीं तेव्हां त्याचा जीव थंड झाला. नंतर आपल्या धोतरांचे पिळे व तांब्या घेऊन स्वारी परत छत्रांत आली. **चंद्रगुप्तानें** त्याचें साह्य घेण्याचा निश्चय केला होता, तरी त्या संबंधानें अद्याप तो त्याच्याजवळ कांहीं बोलला नव्हता. **चाणक्याचें** जेवण खाण आटपलें असून या वेळीं तो प्रसन्न आहे, असें पाहून **चंद्रगुप्तानें** हळूच त्याची हकीकत विचारली. तेव्हां **चाणक्यानें** आपला वृत्तांत त्याला सांगितला

पण **कुसुमपुरांत** येण्याचा खरा उद्देश काय, तेंमात्र सांगितलें नाहीं.

जशी **चंद्रगुप्तानें चाणक्याची** हकीकत विचारली तशीच **चंद्रगुप्ताचीही** त्याणें विचारली. तेव्हां **चंद्रगुप्तानें** भुयारांत प्रवेश केला यापर्यंतची सर्व हकीकत सांगितली. पण **नंदाच्या** विरुद्ध आपण आहें, असें मात्र दाखविलें नाहीं. एखादा सामान्य समजुतीचा मनुष्य असता तर त्याच्या लक्षांत आलें नसतें; पण **चाणक्यासारख्या** मसलती मनुष्याला त्यांतलें तात्पर्य काय तें तेव्हांच समजलें. त्याशिवाय इतके दिवस तेथें राहून त्याणे जी गुप्त बातमी काढली होती तीवरून **चंद्रगुप्ताचे** बंधु व बाप यांला **नंदांनीं** भुयारांत कोंडून कसे मारले, व कां मारले, ह्या गोष्टी त्याणें ऐकल्या होत्या. व त्यावरून **चंद्रगुप्त** हा **नंदांचा** हाडवैरी आहे, असें तो समजला होता. व याच्याच संबंधानें कांहीं उलाढाली करतां येतील असेंही त्याचें अनुमान होतें. तथापि त्याणें या वेळीं आपला कांहींच आशय व्यक्त करून दाखविला नाहीं.

चाणक्यानें आपल्या गोष्टी मुद्दाम विचारल्या व त्या लक्षपूर्वक ऐकून घेतल्या; हें पाहून **चंद्रगुप्ताला** थोडीशी उमेद आली. व त्या दिवसापासून तो **चाणक्याशीं** अधिकाधिक संघट्टण ठेवूं लागला. नंतर कधीं कधीं त्या दोघांचे एकांतही होऊं लागले. **चंद्रगुप्त नंदांचें** वैर साधण्यास फारच उत्सुक होता. तरी उतावळेपणानें आपली सगळी हकीकत एकदम न सांगतां **चाणक्याचा** रागरंग पाहून हळुहळू त्याणें आपला सर्व वृत्तांत व उद्देश त्याला

कळविलें. **चंद्रगुप्ताची** ती दीन स्थिति पाहून—याला कांहीं साह्य करावें, असें **चाणक्याच्या** मनांत आलें. व हें कार्य कोणत्या रीतीनें साधावें, याविषयीं तो विचार करूं लागला. **चंद्रगुप्तानें** त्याच्या मनाप्रमाणें वर्तन करून **चाणक्याला** आपलें विशेष अगत्य लागेल असें केलें; तरी **चाणक्य** त्याच्यावर अद्याप पूर्ण विश्वास ठेवूं लागला नव्हता.

महत्त्वाकांक्षी पुरुष सर्वत्र साशंक असतात. ते आपल्या देहाविषयीं शंका बाळगीत नाहींत, हे त्यांचे मोठे उपकारच ह्मणावयाचे. नाहींपेक्षां पुत्र, आप्त, इष्टमित्र किंवा दुसरा कोणी पाहिजे तो असो; त्यांना त्याच्याविषयीं शंका नाहीं असें कधीं व्हायचेंच नाहीं. **चंद्रगुप्त** सर्व प्रकारें **चाणक्याच्या** चरणीं लीन झाला होता, तरी—याचें कार्य झालें ह्मणजे हा आपल्या आज्ञेंत राहील किंवा नाहीं, याची त्याला शंका वाटतच होती! **चंद्रगुप्तही** शहाणाच होता. **चाणक्याच्या** मनांत कोणता संशय असेल हें तो समजला होता. तरी त्याणें फारशी घाई केली नाहीं. व आणाशपथा घेऊन **चाणक्याचा** संशय दूर करण्याचा प्रयत्न न करतां आपल्या वर्तनानेंच त्याणें त्याची खात्री केली.

एके दिवशीं उभयतां याच संबंधाच्या गोष्टी बोलत असतां **चाणक्यानें** बोलण्याच्या बहरांत—**नंदांचें** राज्य तुला मिळवून देतों, अशा अर्थाची प्रतिज्ञा केली. ती ऐकून **चंद्रगुप्ताला** फार आनंद झाला. तरी त्याचा हेतु निराळाच होता, व तो सिद्ध होण्याविषयीं **चाणक्याची**

तोंडांतून ह्यावेळपर्यंत कांहींच उद्गार निघाला नव्हता, ह्मणून नंदांचें राज्य मिळवून देण्याची चाणक्यानें प्रतिज्ञा केली, व त्याप्रमाणें तो आपल्याला राज्य देईल अशी चंद्रगुप्ताची खात्री होती; तरी त्याचें विशेष समाधान झालें नाहीं.

चंद्रगुप्ताला राज्य मिळविण्याची इच्छा नव्हती असें नाहीं; तरीपण आपल्या बापाला आणि भावांला तशा वाईट रीतीनें मारलें, त्याचा बदला घेण्याकरितां नंदांचा समूळ उच्छेद करावा, असा त्याचा विशेष हेतु होता. पण चाणक्यानें ह्यावेळपर्यंत त्याविषयीं कांहींच सांगितलें नव्हतें. उघडच आहे, नंद हे जसे चंद्रगुप्ताचे हाडवैरी झाले होते, तसे ते अद्याप चाणक्याचे झाले नव्हते, हें सांगावयास नको. त्याणें नंदांचें राज्य मिळवून देण्याची प्रतिज्ञा केली ती केवळ चंद्रगुप्ताच्या लोभाला गुंतूनच केली. व कांहीं कारस्थानें करून युक्तिप्रयुक्तीनें चंद्रगुप्ताला राज्य मिळवून द्यावें, असा त्याचा हेतु होता. मग त्यांत तसा प्रसंग आला तर नंदांला मारण्यास तो मागें सरला असता, असें मुळींच नाहीं. तथापि नंदांचा समूळ नाश करावा, ह्याच कामाकडे त्याची अद्याप विशेष प्रवृत्ति झाली नव्हती. चंद्रगुप्ताला राज्य साधून द्यावयाचें हाच काय तो मुख्य उद्देश. त्याला अनुसरून जें काय करावें लागेल, तें करण्यास तो तयार होता.

चंद्रगुप्ताच्या मनांत नंदांचा समूळ उच्छेद करण्याची चाणक्याकडून प्रतिज्ञा करवावी असा हेतु होता; पण उगीच तसें करण्याविषयीं आपण सांगितलें, तरी तो कबूल करील असें मात्र त्याला वाटत नव्हतें. आपण तसें कर-

ण्यास सांगितलें आणि त्याला त्याचा कदाचित् राग आला तर सगळेंच ऑफस् होईल; ह्मणून तो फार भीत होता. **चाणक्य** मोठा मानी असून अतिशय तापट आहे, तेव्हां नंदांकडून त्याचा कांहीं तरी अपमान झाला तर हा आपो-आप त्यांच्या नाशाविषयीं प्रवृत्त होईल, व त्यामुळें आ-पला हेतु आयताच पूर्ण होईल. असा विचार करून **चं-द्रगुप्त** नंदांकडून **चाणक्याचा** अपमान होण्याचा कांहीं प्रसंग मिळण्याची वाट पहात होता. त्याप्रमाणें लौकरच त्याचा हेतु पूर्ण झाला.

नंदराजाच्या घरीं कांहीं एक मोठा भोजनाचा* समारं-भ होता. त्या दिवशीं मोठमोठ्या विद्वान् ब्राह्मणांलाही आमंत्रण होतें. ही संधि पाहून **चंद्रगुप्तानें चाणक्याला** जेवणाचें आमंत्रण दिलें व **चाणक्यानें** तें मान्यही केलें. दोन प्रहरची वेळ झाली हळूहळू सर्व मंडळीही जमली. एकमेकाच्या समोरासमोर दोन रांगांनीं पात्रें मांडलीं होतीं. एका रांगेनें ब्राह्मण व एका रांगेनें क्षत्रिय, बसावे अशी योजना केली होती.

**चाणक्य** गैर माहीत असल्यामुळें त्याला आपण कोणत्या ठिकाणीं बसावयाचें तें माहीत नव्हतें. तरी तो मोठा अभिमानी व ताठ्याचा मनुष्य होता. तो या पंक्तीं-त-उत्तम प्रकारची ज्या पानावर विशेष तयारी त्याला

---

* येथें 'भोजनाचा समारंभ होता,' असें सांगितलें आहे, पण **बृहत्कथेंत** श्राद्धाचा प्रसंग होता व एक लक्ष रुपये दक्षिणा आणि मुख्य आसन मिळेल असें **चाणक्याला शकटालानें** कबूल केलें होतें असें सांगितलें आहे. येथें **चाणक्याला** आणणारा **चंद्रगुप्त** आहे, त्याबद्दल तेथें **शकटाल आहे.** आह्मीं केलेला **बृहत्कथासागर** भाग पहिला पृष्ठ ८१-८२ पहा.

दिसली, त्या पानावर जाऊन बसला. तें पान नंदराजाकरितां तयार केलेलें होतें. चंद्रगुप्त तेथला व्यवस्थापक होता, म्हणून त्याला ती गोष्ट समजली; पण त्याणें बुध्याच तिकडे दुर्लक्ष केलें. या निमित्तानें कांहीं तरी तंटाबखेडा होऊन चाणक्याला राग आणण्याचें काम अनायासें सिद्ध होईल तर पहावें, असाच त्याचा हेतु होता, व अखेरीस तेंच सिद्ध झालें.

चाणक्य आधींच त्या पानावर जाऊन बसला होता. इतक्यांत नंद व त्यांच्या बरोबरची मंडळी आली. इतर चाकर माणसांनीं चाणक्याला तेथून उठविलें असतें; पण चंद्रगुप्त तेथला मुख्य अधिकारी असून तो कांहींच बोलत नाहीं म्हणून ते त्याच्या वाटेस गेले नाहींत. नंदांसारख्या हिरवट स्वभावाच्या व भाग्यमदानें उन्मत्त झालेल्या पुरुषांला ती गोष्ट कशी सहन होणार? ते पानाच्या जवळ येऊन पोहोंचले; तरी चाणक्य ठासून बसला होता तो मुळींच उठला नाहीं.—अरे हा येथें कसा आला! याला येथें कोणीं बसविलें? असें त्याणें विचारिलें, तेव्हां चाकरमंडळींत एकच गडबड उसळली.* या वेळीं चंद्रगुप्त जवळच होता, त्याला राजानें विचारलें, तेव्हां तो म्हणाला, 'हा मोठा तेजस्वी व विद्वान ब्राह्मण आहे. तो एकंदम मुख्य पानावर येऊन बसला. त्याला ऊठ म्हटलें तर कदाचित् रागावेल, म्हणून मी कांहीं बोललों नाहीं.'

* येथें पानावर बसण्याच्या संबंधानें चाणक्याशीं बोलाचाली झाली, असें आहे, पण बृहत्कथासागरांत सुबन्धु नांवाचा एक नंद राजाचा आश्रित मोठा पंडित होता त्याच्याशीं चाणक्याचा भांडाभांडी झाली असें वर्णन केलें आहे. बृहत्कथासागर भाग १, पृष्ठ ८२-८६ पहा.

**चंद्रगुप्ता**चा खरा मतलब काय होता, तो **चाणक्याला** किंवा **नंदांला** मुळींच माहीत नव्हता. **चाणक्याचें** वय अल्प असल्यामुळें हा कोणीतरी यःकश्चित् भटोबाचा मुलगा आहे, असें समजून **नंदांनीं** त्याला उठविण्यास सांगितलें. पण त्या तेजस्वी पुरुषाला ओढून काढण्याची चाकरांची छाती झाली नाहीं, हें पाहून **नंदांला** फारच राग आला. काळ फिरला ह्मणजे बुद्धीला विपर्यास होतो. आपल्या घरीं आमंत्रण देऊन आणलेला ब्राह्मण मुख्य आसनावर बसला ह्मणून त्यांत काय गेलें होतें! **नंद** हे सार्वभौम राजे होते. **चाणक्य** मुख्य पात्रावर बसला किंवा त्याच्याहीपेक्षां मोठ्या उंच पात्रावर बसला ह्मणून त्यानें त्यांची योग्यता कांहीं कमी झाली असती काय! त्यांणीं आज्ञा केली असती तर **चाणक्य** बसला त्या पानावर जी तयारी होती, तिच्यापेक्षां शतपट अधिक तयारी दुसऱ्या पानावर झाली असती. मुख्यत्व हें कांहीं त्या निर्जीव भांड्यावर किंवा जाग्यावर अवलंबून असत नाहीं. मुख्य जो असेल तो ज्या ठिकाणीं बसेल, त्यालाच मुख्यत्व येतें. पण हा विचार काळानें ज्यांची बुद्धि ग्रासली आहे, अशा **नंदांच्या** मनांत कोठून येणार!

चाकरलोक **चाणक्याला** ओढून काढण्याला धजत नाहींत व स्वतः त्याला ऊठ ह्मटलें तरी तो उठत नाहीं, असें पाहून **नंदांनीं** स्वतःच हाताला धरून त्याला ओढलें. **राक्षस** इत्यादि प्रधान मंडळी व इतर लोक नको नको ह्मणत होते, पण—ह्या भटाच्या पोराची इतकी प्रतिष्ठा कशाला पाहिजे, ह्मणून **नंदांनीं** त्याला पानावरून ओढून काढलें. **मग**

काय विचारावें! निर्जीव दर्भ सहज पायाला लागला ह्मणून त्याचीं पाळेंमुळें खणणाऱ्या चाणक्याच्या अंगाला नंदांचा हात लागतांच तो अग्नीसारखा लाल झाला. आणि क्रोधाच्या आवेशांत त्या जाग्याच्या मध्यभागीं उभा राहून शेंडी मोकळी सोडून व वर हात करून ह्मणाला, 'सर्व लोक हो! माझी प्रतिज्ञा ऐका. मला मुद्दाम बोलावून आणून माझा असा अपमान करणाऱ्या उन्मत्त झालेल्या ह्या नंदाचा मी कुलक्षय केल्यावांचून राहणार नाहीं. ज्या वेळीं नंदाचा निर्वंश करीन त्या वेळींच मी आपली शेंडी बांधीन. तोंपर्यंत ही अशीच मोकळी राहील!'

याप्रमाणें प्रतिज्ञा करून पाय आपटीत व दांतओंठ खात चाणक्य तेथून बाहेर निघाला. नंदाला त्याच्या प्रतिज्ञेविषयीं फारसें कांहीं वाटलें नाहीं. भटाचा मुलगा अचाट व अविचारी असून रागाच्या आवेशांत कांहींतरी बडबडतो आहे, असें समजून त्यांणीं त्याची हुर्यो उडविली! विपरीत प्रसंग आला ह्मणजे शहाण्या शहाण्या माणसांला देखील भुरळ पडते. राक्षसासारख्या चतुर व समर्थ प्रधानाच्या देखत अशी अयोग्य गोष्ट व्हावी, हें मोठें चमत्कारिक आहे. पण त्याला देखील या वेळीं भ्रांति पडल्यासारखें झालें.

चंद्रगुप्त मुकाट्यानीं ती मौज पहात होता. कांट्यानें कांटा निघण्याची वेळ आली आहे, हें पाहून त्याला फार आनंद झाला. चाणक्यानें नंदाचें राज्य मिळवून देण्याची प्रतिज्ञा केली होती, तरी चंद्रगुप्ताला त्या संबंधानें विशेष आनंद झाला नव्हता. या वेळीं चाणक्य नंदाचा पूर्ण वैरी

होऊन त्याणें प्रतिज्ञा केली, ती ऐकून **चंद्रगुप्त** कृतकृत्य झाला. आतां नंदांचीं शंभर वर्षें पुरीं भरलीं, अशी त्याच्या मनाची खात्री झाली. **नंदाचा** नाश करायाचा असा जो त्याचा संकल्प होता, तो अनायासें आपोआप होणार असून त्याचें राज्य आपल्याला मिळणार, हें तर पूर्वींच सिद्ध झालें होतें. तेव्हां आतां त्याचीं दोन्ही कार्यें सिद्ध झालीं. आतां येथें राहिलों तर कदाचित् आपल्यावर कांहींतरी लचांड येईल, असें समजून **चंद्रगुप्तानें** हळूच तेथून पाय काढला, आणि तो **चाणक्याला** जाऊन मिळाला.

**नंदांनीं चाणक्याची** प्रार्थना करून क्षमा मागितली असती तर हें प्रकरण इतक्या विकोपाला गेलें नसतें. पण गतश्रीक झालेल्या **नंदांला** व त्यांच्या दुर्दैवानें मोहित झालेल्या **राक्षसाला** तसें करण्याचें सुचलें नाहीं. **चाणक्यासारख्या** तेजस्वी पुरुषाचा क्रोधाग्नि **चंद्रगुप्तासारख्या** अनुकूळ वाऱ्यानें पेटविला असतां **नंदकुलरूपी** अरण्याला जाळण्याविषयीं प्रसृत झाल्यावांचून कां राहील?

याप्रमाणें **चाणक्य** व **चंद्रगुप्त** दोघेही झटून **नंदाचा** नाश करण्याच्या तयारीस लागले; पण त्यांच्याजवळ फौजफांटा अथवा द्रव्य यांपैकीं मुळींच कांहीं नव्हतें. **चाणक्य** मोठा बुद्धिमान् व कारस्थानी होता, तरी पण **नंदासारख्या** सार्वभौम राजाचा नाश करणें हें कृत्य कांहीं लहानसान नव्हे. फौजेच्या साह्यावांचून आपल्या हातून कांहीं होणार नाहीं. तेव्हां प्रथम कोणातरी **नंदाच्या** द्वेषी राजाला उत्तेजन देऊन त्याला कांहीं आमिष दाखवून अनुकूळ करून घेण्याचा प्रयत्न करावा, असा त्यांनीं विचार केला.

**पंजाब** देशाचा **पर्वतेश** नांवाचा एक राजा **नंदाच्या** राज्याच्या सरहद्दीवर रहात असून तो मनापासून **नंदाचा** द्वेष करीत होता. तरी **नंदाचा** प्रधान **राक्षस** याच्या कारस्थानापुढें त्याचा कांहीं इलाज चालत नव्हता हा अंतर्गत भेद **चंद्रगुप्तानें** कळविल्यावरून प्रथम त्याला अनुकूळ करून घेण्याकरितां **चंद्रगुप्ता**सहवर्तमान **चाणक्य** त्याच्याशीं मसलत करण्याकरितां गेला. त्या उभयतांनीं **पर्वतराजाची** भेट घेऊन अनेक प्रकारें त्याचें मन वळवून त्याला **नंदाच्या** राज्यापैकीं अर्धा भाग देण्याचें कबूल केल्यावरून तो त्यांच्या तर्फेनें **नंदावर** स्वारी करण्यास तयार झाला. स्वतः त्याच्याजवळ विशेष फौज नव्हती, तरी त्याच्या सरहद्दीवर पुष्कळ म्लेंच्छ* लोक रहात होते, व त्यांच्याशीं **पर्वतराजाचा** विशेष संबंध होता, ह्मणून त्याणें म्लेंच्छांला भर देऊन अनुकूळ करून घेतलें आणि लढाईची कडेकोट तयारी केली.

स्वतः **पर्वतराजा** मोठा बलाढ्य असून शूर होता. त्याला **चाणक्यासारख्या** मसलती पुरुषाचें पूर्ण साह्य मिळून **चंद्रगुप्ता**सारखा घरचा भेदी मिळाल्यामुळें या स्वारींत

---

* 'म्लेंच्छ' या शब्दानें साप्रतकाळीं मुसलमानाचें ग्रहण करण्याचा संप्रदाय आहे; पण वस्तुत तसें करण्याला विशेष आधार नाहीं. कारण, मुसलमानी धर्माची स्थापना करणारा **महमद** याला होऊन सुमारें १,२०० वर्षे झालीं. पण म्लेंच्छ हा शब्द फार प्राचीन आहे. **भारती** युद्धाला सुमारें ५००० रावर वर्षें झालीं. त्या लढाईंत म्लेंच्छ राजे होते. म्लेंच्छ हा शब्द **महाभारतांत** पुष्कळ ठिकाणीं आला आहे. यावरून पाहतां मुसलमान हेच म्लेंच्छ नव्हत हें उघड सिद्ध होतें. वैदिकधर्माच्या विरुद्ध अथवा त्याला न मानणारे जे लोक होते त्यांना आर्यलोक म्लेंच्छ म्हणत असत, इतकेंच घेणें आम्हास योग्य वाटतें.

आपल्याला खरोखर जय येईल, अशी त्याची खात्री झाली होती. **चाणक्याच्या** सल्ल्यानें म्लेंच्छांची मोठी फौज बरोबर घेऊन **पर्वतराज कुसुमपुरावर** स्वारी करण्याकरितां निघाला. **चाणक्यानें पर्वतराजाला नंदाचें** अर्धे राज्य देण्याचें वचन दिलें होतें, पण त्यांतला खरा हेतु निराळाच होता. कोणीकडून तरी **पर्वतराजाला** उमेद येऊन तो लढाईला तयार व्हावा, इतकाच त्याचा मतलब होता. बाकी काम झाल्यावर **पर्वतराजाला** तरी ठेवावें असें मुळींच त्याच्या मनांत नव्हतें; पण हा त्याचा हेतु त्या शूर **पर्वतराजाच्या** मुळींच लक्ष्यांत आला नव्हता!

**पर्वतराज** लढाईच्याच तयारीनें **कुसुमपुरावर** येणार, ही बातमी **नंदाला** अगोदर न कळण्याविषयीं **चाणक्यानें** विशेष बंदोबस्त ठेवला होता कारण, **पर्वतराजानें** कडेकोट तयारी केली होती तरी, फौजेचें आणि द्रव्याचें विशेष बल असल्याकारणानें **नंदाचा** पराभव होईलच अशी त्याला खात्री वाटत नव्हती. **पर्वतराज** आपल्यावर येतो आहे, हें वर्तमान आधींच **नंदाला** समजलें तर ते लढाईची विशेष तयारी करतील, व त्या योगानें **पर्वतराजाचा** त्यांच्यापुढें निभाव लागणार नाहीं. ह्मणून **नंद** असावध असतां एकाएकीं त्यांच्यावर घाला घालावा, असा **चाणक्याचा** हेतु होता. आपण कडेकोट बंदोबस्त ठेवला आहे, तरी **राक्षसासारख्या** कारस्थानी पुरुषाला आपली तयारी असल्याचें वर्तमान कळल्यावांचून राहणार नाहीं, व तसें झालें ह्मणजे तो लढाईची विशेष तयारी करील. याकरितां **चाणक्यानें** दुसरीच एक योजना केली.

इंदुशर्मा नांवाचा एक ब्राह्मण चाणक्याचा परम मित्र होता. अगदीं लाहानपणापासून त्या उभयतांची गट्टी जमली होती. इंदुशर्म्यानें साधारण इतर विद्याभ्यास केला होता, तरी मंत्र तंत्र जारण मारण इत्यादिकांत तो फार प्रवीण होता. कित्येक मंत्रांच्या त्याला सिद्धीही प्राप्त झाल्या होत्या. तो पाहिजे त्या मनुष्याला मंत्रसामर्थ्यानें मोहित करीत असे. चाणक्यानें इंदुशर्म्याला या वेळीं आपल्या मसलतींत घेऊन—कांहींतरी जादू करून राक्षसाला मोहित करण्याकरितां, कुसुमपुरांत पाठविलें. इंदुशर्म्यानें क्षपणकाचा* वेष घेऊन राक्षसाची भेट घेतली. आणि बाह्यात्कारें अगदीं निरपेक्षता व वैराग्य दाखवून

* क्षपणक हा शब्द फार संदिग्ध असून महाराष्ट्र भाषेंत क्षपणक कोणाला म्हणतात हें खात्रीपूर्वक सांगता येत नाहीं, व सांप्रत या पंथाचे लोक आहेत किंवा काय हेंही निश्चयानें सांगवत नाहीं. वेदांतशास्त्राच्या मोठमोठ्या ग्रंथांत क्षपणकाच्या मताचा उल्लेख केल्याचें पुष्कळ ठिकाणीं आढळतें. वेदांतवाद्यांनीं त्याचें खंडनही केलें आहे. त्यावरून क्षपणक हे मोठे प्रबल मतवादी होते असें सिद्ध होतें. तरी त्याच्या मताचे स्वतंत्र ग्रंथ अद्याप उपलब्ध झाल्याचें आढळत नाहीं. आनंदगिरि व माधवाचार्य यांच्या शंकरविजयांत शंकराचार्यांनीं क्षपणकाशीं वाद करून त्याचें खंडन केल्याचें वर्णन केलें आहे. सामान्यतः क्षपणक म्हणजे कानफाटे असें लोक समजतात; पण त्याला कांहीं विशेष आधार नाहीं. इंदुशर्म्यानें क्षपणकाचा वेश घेऊन जीवसिद्धि असें नांव धारण केलें होतें. त्याचे या ग्रंथांत अनेक ठिकाणीं जे उद्गार निघाले आहेत त्यावरून तो जैन लोकांतला जती झाला होता असें दिसतें व क्षपणक हा जैनांपैकींच एक पंथ असावा. तथापि वेदांतवाद्यांनीं जैन आणि क्षपणक यांचा निरनिराळ्या दोन नांवांनीं उल्लेख केला आहे त्यावरून त्या उभयतांचे सिद्धांत परस्परांहून अगदीं भिन्न असले पाहिजेत हें उघड सिद्ध होतें. आमच्या वाचकांस आम्ही असें सुचवितों कीं त्यांनीं विशेष भानगडींत न पडतां क्षपणक म्हणजे जैनांतला जती अथवा महंत असें समजावें म्हणजे झालें.

**राक्षसा**च्या आपल्यावर विश्वास उत्पन्न करून घेऊन त्यानें त्याच्यावर मोहनी मंत्राचा प्रयोग केला. **राक्षस** आपल्या मंत्रसामर्थ्यांत आला असें पाहून **नवनंद** व मोठमोठे कामदार यांच्या भेटी घेऊन सवडीप्रमाणें त्यांच्यावरही मंत्राचा प्रयोग केला.

एरव्हीं **राक्षसा**सारखा चतुर मंत्री इतका अगदीं गाफल राहिला नसता. **चाणक्य** प्रतिज्ञा करून गेला आहे, व तंटयाचें मुख्य बीज **चंद्रगुप्त** हा त्याच्या बरोबर आहे, तेव्हां कांहींतरी उलाढाली झाल्यावांचून रहाणार नाहींत, असें समजून तयारीवर राहिला असता; पण **इंदुशर्म्या**-च्या जादूनें मोहित झाल्यामुळें त्याच्या हातून कांहींएक झालें नाहीं. मुख्य प्रधानाची जी अवस्था झाली, तीच इतर प्रधानांचीही झाली होती; ह्मणून त्यांणींही कांहीं प्रयत्न केला नाहीं. राजेसाहेब **नंद** यांच्याविषयीं तर कांहीं बोलावयासच नको. भर तारुण्य, उत्तम रूप, सार्व-भौमसत्ता व अपरंपार द्रव्य यांच्या मदाचे एकावर एक पडदे पडल्यामुळें ते तर केवळ अंधच झाले होते. तशां-तून मोठा बलाढ्य व बुद्धिमान् असून आपल्या हितावि-षयीं तत्पर अशा **राक्षसा**वर त्यांचा सर्व भरिभार अस-ल्यामुळें राजकीय कामाकडे ते मुळींच लक्ष पुरवीत नव्हते. अनेक प्रकारचे नाच रंग तमाशे करून चैनींत सारा वेळ घालवावा, हाच काय तो त्यांचा मुख्य व्यवसाय होता! अशा स्थितींत भटाचा पोरगा **चाणक्य** किंवा भिकारी **चंद्रगुप्त** हे त्यांच्या लक्षांत तरी कोठून येणार? तात्पर्य, **चाणक्याच्या** हालचालीवर **नंदा**च्या दरबारानें मुळींच लक्ष्य ठेवलें नाहीं.

ही स्थिति चाणक्याच्या फायद्यावर पडली, हें येथें सांगावयास पाहिजे असें नाहीं. इंदुशर्म्यानें आपल्या मंत्रसामर्थ्यानें नंदाचें दरबार भलत्याच नादांत गुंतविलें होतें, अशा संधीस पर्वतराज मोठ्या तयारीनें नंदावर येऊन त्याणें कुसुमपुराला आपल्या फौजेचा वेढा दिला. इंदुशर्म्याचें इतकेंच कर्तव्य होतें. पर्वतराजाच्या फौजेचा वेढा पडला, हें पाहून इंदुशर्म्यानें आपली जादू काढून घेतली. तेव्हां राक्षस व नंद हे शुद्धीवर आले; पण उपयोग काय? शत्रूंनीं वेढा दिल्यामुळें त्यांना लढाईची तयारी करण्याची विशेष सवड मिळाली नाहीं.

यःकश्चित् पर्वतराजानें आपल्यावर चाल केली, ही गोष्ट नंदाला मुळींच सहन झाली नाहीं. राक्षस दुसरी कांहीं तजवीज योजण्याच्या विचारांत होता, पण नंदांनीं त्याचें न ऐकतां शत्रूशीं लढाईच सुरू केली. तेव्हां राक्षसालाही त्यांच्याबरोबर येणें भाग पडलें. राक्षसानें आपल्या शौर्याची व शहाणपणाची कमाल केली; तरी त्याचा कांहीं इलाज चालला नाहीं. क्रोधाच्या आवेशानें अनावर झालेले नंद विशेष विचार न करितां एकदम शत्रूवर तुटून पडले, ते पर्वतराजाच्या सैन्यरूपी वाऱ्यानें पेटविलेल्या चाणक्याच्या क्रोधाग्नींत पतंगासारखे भस्म झाले! जिकडे तिकडे कापाकापी सुरू होऊन शत्रूंनीं मोठमोठे सरदार व मुख्य राजे नवनंद यांना ठार केलें. मुख्य धनी नवनंद तर मेले व आतां शहराचा विनाकारण विध्वंस होत असून प्रजेचा क्षय होत आहे, हें पाहून राक्षसानें निरुपायास्तव शत्रूशीं सल्ला करण्याची तजवीज केली.

नंदाला मारतेवेळीं चंद्रगुप्त दंड थोपटून पुढें उभा राहिला होता. आपल्या बापाला व नव्याण्णव बंधूंला विश्वासघातानें अन्नपाण्यावांचून कोंडून मारलें त्याचा हा मी सूड घेतों, असें बोलून त्याणें नंदाचा नाश केला. ही गोष्ट राक्षसाला फार असह्य झाली होती. सर्व प्रकारें मोड झाल्यामुळें लढाई पुढें चालविण्याचें त्याचें सामर्थ्य नव्हतें, तथापि त्यांतले त्यांत युक्तिप्रयुक्तीनें चंद्रगुप्ताचा नाश करावा, आणि नंदांच्या वंशापैकीं म्हातारा सर्वार्थसिद्धि बाकी राहिला होता त्याला गादीवर बसवावा असा त्याचा मुख्य हेतु होता.

त्याणें असा विचार केला कीं, स्वतः चंद्रगुप्ताजवळ द्रव्य किंवा फौज मुळींच नाहीं. त्याणें काय तो ह्या पर्वतराजाच्या बळावर एवढा पराक्रम केला आहे. पर्वतराज हा चंद्रगुप्ताचा किंवा चाणक्याचा कोणी संबंधी आहे, असेंही नाहीं. त्याला कांहींतरी आशा दाखवून यांणीं वश करून घेतला असेल. तेव्हां पर्वतराज जसा चंद्रगुप्ताला अनुकूळ झाला तसा विशेष आशा दाखविली तर आपल्यालाही कां वश होणार नाहीं ! याकरितां पर्वतराजाला चंद्रगुप्तापेक्षां कांहीं अधिक द्यायचें कबूल करून आपल्या पक्षाला अनुकूळ करून घ्यावा, आणि त्याच्या करवीं चंद्रगुप्ताचा नाश करवावा, अशी त्याची मसलत होती.

राक्षसाचा हा विचार खरा झाला. कांहीं एका विवक्षित लाभाच्या आशेनें जे लोक कोणाचाही पक्ष धरतात, ते, त्याच्यापेक्षां अधिक देण्याला तिसरा कोणी कबूल

झाला तर, त्यालाही अनुकूल होतात. बोलूनचालून लाभावरच त्यांची दृष्टि असल्यामुळें जिकडून अधिक लाभ होईल तिकडे ते जातात. राक्षसानें पर्वतराजाला चंद्रगुप्तापेक्षां विशेष लोभ दाखविल्यावरून तो राक्षसाच्या पक्षाला अनुकूळ झाला, आणि त्यानें तत्काल लढाई बंद केली. तेव्हा अर्थात् चंद्रगुप्ताला त्याचें ह्मणणें मान्य करावें लागलें.

या वेळीं कुसुमपुर अराजक झालें होतें. राज्याचे मुख्य अधिकारी नंद—जे नऊ बंधु होते ते सर्व—मरण पावल्यामुळें राजगादी रिकामी पडून लोक बेदिल झाले होते. घरोघर, लढाईत मेलेल्या आप्त इष्टमित्रांच्या संबंधानें, रडारड सुरू झाली होती. अशा स्थितींत धोका दिसल्यावरून चाणक्याच्या आज्ञेनें चंद्रगुप्तानें राजवाड्यांत प्रवेश न करतां राज्याधिकाराचा मात्र स्वीकार केला. वस्तुतः या वेळीं तेथें असलेल्या सर्वांत राज्याचा अधिकार विशेषेंकरून चंद्रगुप्ताकडेच पोहोंचत होता. कारण, नुकतेच मेलेले जे नवनंद त्यांचा हा पुतण्या असल्यामुळें त्याला विशेष हक्क होता. राक्षसानें, जिकडे तिकडे थारवाथारव करून बळात्कारें चंद्रगुप्ताला अनुकूळ झाल्यासारखें दाखवून, शहर त्याच्या हवालीं केलें. तेव्हां चंद्रगुप्तानें चाणक्याच्या कृपेनें प्राप्त झालेल्या यशाचें निशाण कुसुमपुराच्या मुख्य दरवाज्यावर फडकाविलें.

याप्रमाणें बहुत दिवस मनांत धुमसत असलेला वैराग्नि विखरून नंदाचा नाश करून चंद्रगुप्तानें, परलोकस्थ असा जो आपला पिता त्याच्या व बंधूंच्या अंतरात्म्याला

आनंद देणारी आपली प्रतिज्ञा पुरी केली. व चाणक्यानें शरणागत चंद्रगुप्ताला कबूल केल्याप्रमाणें नंदाचें राज्य देऊन, पात्रावरून ओढून काढणाऱ्या नवनंदांना मारून आपली प्रतिज्ञा पूर्ण केली, तरी सर्वांसमक्ष इतके दिवस मोकळी ठेवलेली शेंडी बांधली नाहीं. कारण, पुढें आणखीं पुष्कळ भानगडी करावयाच्या राहिल्या होत्या.

राक्षसानें पर्वतराजाला मोठी आशा दाखवून त्याच्याशीं सख्य केलें, हें वर सांगितलेंच आहे. राक्षसानें—नंदाचें सर्व राज्य तुला देईन, असें पर्वतराजाला वचन दिलें होतें. त्याप्रमाणें पर्वतराज आशा धरून बसला होता. सर्व शहर चंद्रगुप्ताच्या ताब्यांत गेलें होतें, व राक्षस बाह्यात्कारें चंद्रगुप्ताला अनुकूळ झाल्यासारखें दाखवीत होता; तरी आंतून त्याचा निराळाच बेत चालला होता. युक्तिप्रयुक्तीनें पर्वतराजाच्या साह्यानें चंद्रगुप्ताला मारावें व पर्वतराजाला कांहींतरी हुलकावणी दाखवून, ह्यातारा राजा सर्वार्थसिद्धि तपश्चर्या करीत होता, त्याला आणून पुनः गादीवर बसवावा, आणि मग पर्वतराजाला पिटाळून लावावा, अशी त्याची मसलत होती.

राक्षसाची नंदवंशावर विलक्षण भक्ति होती. इतका सर्व अनर्थ झाला तरी आपल्या यजमानाच्या घराण्याचें हित करण्याविषयीं तो अत्यंत तत्पर होता. ह्या त्याच्या एकनिष्ठ स्वामिभक्तीला प्रजा अनुकूळ असल्यामुळें आपली मसलत सिद्धीस जाईल, अशी त्याला उमेद होती. ह्यातारा सर्वार्थसिद्धि कुसुमपुराच्या जवळच एका पवित्र ठिकाणीं हरि हरि करीत बसला होता. त्याच्यावर कदाचित्

शत्रु हल्ला करतील ह्मणून राक्षसानें त्याला तेथून काढून दूर ठिकाणीं नेऊन ठेविलें, व पर्वतराजाशीं त्याचीं कारस्थानें सुरू झालीं.

चंद्रगुप्त मोठ्या बंदोबस्तानें राजवाड्याच्या बाहेर राहिला असून चाणक्य शहराच्या बाहेर रहात होता. कारण, राक्षस मसलती करीत असून शहरांतील लोक बहुतकरून त्याला अनुकूळ आहेत, व नंदाचा नाश करणारा काय तो हाच असें समजून लोक कदाचित् आपला घात करतील, याची त्याला शंका होती. पर्वतराजही शहराच्या बाहेर आपल्या फौजेचा तळ देऊन तेथेंच रहात होता. राक्षस आपल्या मूळच्या ठिकाणांच होता, तरी तेथून पर्वतराजाशीं त्याच्या मसलती चालल्या होत्या. पर्वतराजालाही या वेळीं विलक्षण अभिमान झाला होता. तो चाणक्य व चंद्रगुप्त यांना मुळींच जुमानीत नव्हता. त्याला असें वाटलें कीं, जें काय झालें तें सर्व आपल्या पराक्रमानें झालें आहे. त्यांत चाणक्याचें किंवा चंद्रगुप्ताचें कसलें महत्त्व!

पर्वतराज आपणच स्वारी करून चंद्रगुप्ताला व त्याबरोबर चाणक्यालाही मारून टाकण्यास तयार झाला होता; पण राक्षसानें त्याला तसें करूं दिलें नाहीं. कारण, चाणक्यानें काय काय तजविजी केल्या आहेत, त्या त्याला माहित झाल्या होत्या. व पर्वतराजाला तितका शिरजोर होऊं देऊन घरांत घुसूं देणें हेंही त्याला इष्ट वाटत नव्हतें, ह्मणून त्यानें त्याचा इरादा मोडून काढला. 'लढाई करून चंद्रगुप्त तुला वश होणार नाहीं व त्याचा पराभवही

करतां येणार नाहीं; मी कांहीं कपटाची युक्ति काढून **चंद्रगुप्ताला** मारून सर्व राज्य तुला देतों,' असें **राक्षसानें** पर्वतराजाला आश्वासन दिल्यामुळें तो स्वस्थ बसला.

**पर्वतराज**, **चंद्रगुप्ताला** आपण सहज मारूं, अशी घमंड बाळगीत होता; पण **चंद्रगुप्ताचा** पाठराखा **चाणक्य** या संबंधानें असावध होता असें नाहीं. कारण, आपल्या जवळ स्वतःचा फौज ना फांटा, काय तो **पर्वतराजाच्या** बळावर सारा व्यूह रचलेला. तेव्हां **पर्वतराज** कदाचित् आपल्याला प्रतिकूळ झाला तर सारा प्रयत्न व्यर्थ जाणार, व तोही आपली बेपरवा करणार, हें जाणून **चाणक्यानें** आधींच तयारी करून ठेविली होती. राजगादीशीं **चंद्रगुप्ताचा** बराच संबंध होता. **चंद्रगुप्ताच्या** बापानें फौजेचा मुख्य अधिकार चालविला असून फौजेंतले बहुतेक लोक त्याच्यावर अनुरक्त होते. याशिवाय **नंदांनीं** मोठ्या क्रूरपणानें **चंद्रगुप्ताच्या** बापाचा व त्याच्या बंधूंचा नाश केल्यामुळें तो लोकांच्या दयेलाही पात्र झाला होता. यामुळें माजिराजाची अवशेष राहिलेली फौज प्रसंगीं **चंद्रगुप्ताला** साह्य करण्याविषयीं तयार असून लोकांचा त्याच्याकडे विशेष ओढा होता. याशिवाय आणखीही कित्येक लोकांना व आसपासच्या कित्येक मांडलिक राजांना **चाणक्यानें** अनुकूळ करून घेतलें होतें. यामुळें **पर्वतराज** प्रतिकूळ झाला तरी आपलें कांहीं नुकसान होईल अशी **चाणक्याला** भीति नव्हती, ह्मणूनच **राक्षसानें** **पर्वतराजाला** **चंद्रगुप्तावर** हल्ला न करण्याची सल्ला दिली आहे हें **चाणक्याला** समजलें होतें तरी तो घाबरला नव्हता.

**राक्षस** बाह्यात्कारें **चंद्रगुप्ताला** पक्षपात दाखवून आंतून त्याचा घात करण्याचा विचार करीत होता. दुसरा कांहीं उपाय योग्य न वाटल्यावरून त्याणें एक विषकन्या* तयार केली, आणि ती **चंद्रगुप्ताकडे** पाठवून तिच्या द्वारें त्याचा नाश करण्याचा बेत केला; पण **चाणक्य** याविषयां गाफल नव्हता. **राक्षस** असें असें करणार ह्मणून त्याला आधींच समजलें होतें. **राक्षसानें**, अतिशय सुंदर व नवयौवना अशी एक मुलगी आपल्याकडे आहे, ती आपण महाराजांला नजर करतों असें सांगून, ती विषकन्या **चंद्रगुप्ता**कडे पाठविली. **चाणक्यानें** कन्या येण्यापूर्वीच **चंद्रगुप्ताला** पुढची व्यवस्था काय करावयाची ती सांगून ठेविली होती.

ती कन्या **चंद्रगुप्ताजवळ** आली, तेव्हां **चंद्रगुप्तानें** तिला अनुकूळ करून घेऊन, कोणालाही न कळत ती **पर्वतराजा**कडे, **राक्षसानें** आपल्याला नजर केली आहे असें सांगून, पाठविली. **पर्वतराज** फारसा विचारी मनुष्य नव्हता. त्या

* विषकन्या अर्थात् विषयुक्त कन्या. विष अनेक प्रकारांनीं तयार करतां येतें. पूर्वी शत्रूचा नाश करण्याकरितां जे अनेक उपाय योजीत असत, त्यापैकीं विष हा एक उपाय होता. शत्रु ज्या प्रदेशांतून येत असेल तेथील झाडा झुडपाला व गवताला वगैरे विष लावावें, तेथील जलाशय विषानें दूषित करावे, त्याच्या पाशीं विषकन्या सोडाव्या इत्यादि प्रकार चालत. या संबंधानें आह्मीं केलेला **बृहत्कथासागर** भाग २ यांत काशीचा राजा **ब्रह्मदत्त** याच्या प्रधानानें **वत्सराजाच्या** फौजेवर जे प्रयोग केले आहेत ते पहावे. विषकन्या अशा रीतीनें तयार करीत असत कीं,— संभोग करताच तो करणाऱ्याच्या अंगात विषाचा संचार होईल अशा रीतीनें एखाद्या सुंदर व तरुण मुलीच्या अवयवात विष घालावयाचें व त्यावरून स्वतः तिला कांहीं बाधा न होण्याची योजना करावयाची.

कन्येला पाहतांच तिच्या रूपाला मोहित होऊन त्यानें तत्काळ तिच्यावर झडप घातली, व विषाच्या प्रभावानें लवकरच त्याचा बळी पडला! हें वर्तमान ऐकून चाणक्याला मोठा आनंद झाला. त्याणें पर्वतराजानें सख्य केलें होतें, तें एका कार्यापुरतेंच होतें. पर्वतराजाला प्रबळ होऊं देणें हें त्याला इष्ट नव्हतें; तथापि तो अखेरपर्यंत चाणक्याच्या पक्षानेंच वागला असता तर त्याचा असा परिणाम झाला नसता. पण त्याचें आयुष्य सरल्यामुळें त्याला ही विपरीत बुद्धि सुचली. लांडग्याचें हृदय अतिशय क्रूर आहे असें ह्मणतात; पण राजकारस्थानी पुरुषांच्या हृदयाइतकें तें क्रूर असेल असें वाटत नाहीं. कारण बाप, भाऊ, मुलगा, व गुरु, कोण पाहिजे तो असो, जो त्यांच्या इच्छेच्या विरुद्ध जाईल तो कारस्थानी पुरुषांला वध्य झाल्याशिवाय रहातच नाहीं. असो. ज्याप्रमाणें कृष्णानें इंद्राच्या शक्तीनें कर्णाकरवीं घटोत्कचाला † मारविलें, त्याप्रमाणें आपल्याच पक्षाच्या पर्वतराजाला विषकन्येकरवीं मारवून चाणक्य बिनघोर झाला!

† घटोत्कच हा भीमाचा मुलगा असून राक्षसासारखा उग्र होता तो पांडवांच्या पक्षानें कौरवाशीं लढत होता. त्यानें आपल्या पराक्रमानें पांडवांला मोठें साह्य केलें. कौरवांचा दिवसेंदिवस अधिकाधिक मोड होत चालला, व लौकरच त्यांचा समूळ नाश होण्याची संधि आली हें पाहून पांडवांकडचा मुख्य कारस्थानी श्रीकृष्ण याला घटोत्कचाची गरज नाहींशी झाली तो बलाढ्य व क्रूर असल्यामुळें कदाचित् प्रतिकूल झाला, तर पांडवांला भारी होईल ह्मणून युक्तीनें त्याचा नाश करावा, असा विचार करून रात्रियुद्धाच्या प्रसंगीं कर्णानें अर्जुनाला मारण्याकरितां ह्मणून जी अमोघ शक्ति राखून ठेविली होती, तिणें घटोत्कचाचा कृष्णानें नाश करविला. या कृत्यांत त्याचे दोन हेतु सिद्ध झाले. त्या अमोघ शक्तीनें अर्जुनाचा नाश होण्याची जी भीति होती ती नाहींशी होऊन बलाढ्य घटोत्कचाचाही नाश झाला. ही कथा महाभारतांत द्रोणपर्वांत आहे.

कारस्थानी पुरुषांना बलाढ्य पुरुषांची विशेष जरूर असते; पण त्यानें आपल्या मनाप्रमाणें वागावें असें ते इच्छितात. परंतु बहुतकरून तसें होत नाहीं. कारण बलाढ्य असलेला मनुष्य विशेषेंकरून बेपरवा असतो, व कारस्थानी मनुष्याच्या अंगां विशेष बळ नसतें. अर्थात् तो त्याची परवा ठेवीत नाहीं. यामुळें कारस्थानी पुरुष आपलें काम होईपर्यंत त्याच्या आर्जवानें वागून युक्तिप्रयुक्तीनें त्याचा नाश करून टाकतात. चाणक्याला नंदाचा नाश करण्याच्या कामीं पर्वतराजासारख्या बलाढ्य पुरुषानें साह्य पाहिजे होतें. व तें कार्य सिद्ध होईपर्यंत तो त्याच्याशीं स्नेहानें व आर्जवानें वागला. पण आतां, त्याची विशेष जरूर नाहीं व कदाचित् त्याच्यापासून आपल्याला अपाय होईल ह्मणून त्याणें त्याचा घात करविला.

चंद्रगुप्त नंदाच्या राजगादीवर बसला होता, तरी त्याची स्थिति अद्याप विशेष मजबूत झाली नव्हती. शहरांतील बहुत लोक राक्षसाच्या पक्षाचे असून ते चंद्रगुप्ताचा घात करण्याविषयीं तयार होते. पर्वतराजाला वस्तुतः चाणक्यानेंच मारविलें होतें तरी, त्याणें त्या संबंधानें राक्षसाच्या नांवाचा पुकारा केला. चाणक्यानें त्याला मारलें असें प्रसिद्ध झालें असतें तर पर्वतराजाची बलाढ्य फौज व त्याचा शूर पुत्र मलयकेतु यांणीं तत्क्षणींच हाहाकार केला असता. विषकन्या चंद्रगुप्ताचा घात करण्याकरितां राक्षसानें पाठविली होती, यामुळें चाणक्यानें खोटी बातमी उठविली, तरी ती लोकांना खरी वाटण्याचा संभव होता. इकडे राक्षसालाही मोठी अडचणच होती. कारण,

विषकन्या चंद्रगुप्ताचा घात करण्याकरिता आपण पाठविली, असें तो जाहीर करता तर तिकडूनही मोठें भय होतें. चंद्रगुप्ताशीं तो उघड वैर करतो, असें सिद्ध होऊन त्याच्यावर आतांच संकट ओढवलें असतें. यामुळें चाणक्यानें, पर्वतराजाला राक्षसानें मारविलें, असा खोटा पुकारा केला, तरी राक्षसाला त्याच्या संबंधानें कांहींच बोलतां आलें नाहीं.

पर्वतराजाचा याप्रमाणें नाश झाला तरी त्याचा पुत्र मलयकेतु ह्याच्या संबंधानें चाणक्याला धास्ती होतीच. कदाचित् तो कांहीं तरी खटपट करील ह्मणून चाणक्यानें आपल्या पक्षाचे लोक त्याच्याकडे पाठवून त्याला मोठी दहशत उत्पन्न केली. मलयकेतु पर्वतराजाइतका प्रबळ नसून कांहींसा भित्रा होता. तव्हां त्या गरिबाला मारण्यांत काय अर्थ आहे असें समजून चाणक्यानें त्याला पिटाळून लावण्याची तजवीज केली. 'राक्षसानें विश्वासघात करून तुझ्या बापाला तर मारलेंच; आणि तो आतां पुढें काय करील, याचा नेम नाहीं. तो तुला देखील मारण्याच्या तयारींत आहे,' इत्यादि प्रकारें त्याला भय घातल्यामुळें व नुकताच बापाचा घात झाल्याचें त्याच्या डोळ्यांपुढें असल्यामुळें मलयकेतु घाबरून गेला, आणि आपला फौजफांटा वगैरे बरोबर घेऊन त्याणें आपल्या राजधानीकडे पळ काढला. नंदाचें राज्य नको आणि कांहीं नको. प्राण वांचले तर पुरे, असें त्याला झालें होतें.

याप्रमाणें प्रबळ पर्वतराजाचा घात करून व भेकड मलयकेतूला पळवून लावून चाणक्यानें राक्षसाचा एक प्रयत्न

ह्मणून पाडला; तथापि तो स्वस्थ बसला नाहीं. चंद्र-केतूला मारण्याविषयीं तो दुसऱ्या अनेक योजना करीत होता. राक्षसाने दारुवर्मा, विजयकेतु, शकटार, इत्यादि अनेक मित्र होते, त्यांच्या साह्याने तो कांहीं खटपटी करीत होता. त्यानें चंद्रगुप्ताला फसवून एका खळग्यांत पाडण्याची तजवीज करून ठेविली होती.

मलयकेतु पळून गेला, हें पाहून राक्षसाला कुसुमपुरांत राहण्याचें धैर्य नाहींसें झालें. चाणक्यानें खोटीच बातमी उठवून मलयकेतूला पळविलें; तथापि आपण पुन: त्याला मसलत देऊन चंद्रगुप्तावर स्वारी करण्याची भर द्यावी, असा विचार करून राक्षस मलयकेतूच्या पाठोपाठ निघून गेला. मलयकेतु आपल्या नगरांत पोहोंचतो आहे तों राक्षसही त्याला येऊन भेटला. राक्षसानें मलयकेतूचा बाप पर्वतराज याला नंदाचें राज्य मिळवून देण्याचें वचन दिलें होतें, त्यावरून मलयकेतु राक्षसाला आपला पूर्ण हितकर्ता असें समजत होता. यद्यपि पर्वतराजाला राक्षसानेंच विषकन्येकरवीं मारविलें, असें चाणक्यानें त्याच्या मनांत भरून दिलें होतें; तथापि राक्षसानें त्याबद्दल खरी हकीकत सांगून मलयकेतूचा संशय दूर केल्यावरून तो राक्षसावर पूर्ण विश्वास ठेवूं लागला.

याप्रमाणें चाणक्य आणि राक्षस हे दोघे अचाट बुद्धीचे व मोठे कारस्थानी पुरुष दोन शहरांत राहिले. ह्मणजे चाणक्य कुसुमपुरांत व राक्षस मलयकेतूच्या नगरांत राहिला. दोघांनींही दोघां राजपुत्रांना आपल्या बगलेंत मारलें. चाणक्यानें चंद्रगुप्ताला घेतलें व राक्षसानें मल-

यकेतूला घेतलें, आणि एकमेकांवर निरनिराळे मसलतीचे प्रयोग चालविले. या उभयतांच्या हेतूंत मात्र मोठें अंतर होतें. राक्षस, चंद्रगुप्ताला मारून, चाणक्याचा मोड करून, साधेल तर सर्वार्थसिद्धीला नाहीं तर मलयकेतुला तरी राज्य देऊन, आपण पूर्वीप्रमाणें कारभार चालविण्याची इच्छा करीत होता; पण चाणक्याचा हेतु याहून निराळा होता. त्याला कारभार वगैरे चालविण्याची बिलकूल आशा नव्हती. नंदाचा नाश करून चंद्रगुप्ताला राज्य देण्याची त्यानें प्रतिज्ञा केली होती, ती तर पूर्ण झालीच. चंद्रगुप्ताला सार्वभौम पद मिळालें. पण चतुर व स्वामिभक्त असून शूर, असा मंत्री मिळाल्यावांचून तें त्याचें ऐश्वर्य स्थिर राहणार नाहीं; तेव्हां कोणी तरी योग्य मनुष्य पाहून त्याच्या गळ्यांत कारभाराची माळ घालून आपण मोकळें व्हावें, असा त्याचा इरादा होता. राक्षसाची, आपले यजमान नंद, यांच्या ठिकाणीं किती एकनिष्ठ भक्ति आहे, ती त्यानें प्रत्यक्ष पाहिली होती. व राक्षसाचें चातुर्य आणि शौर्य हेंही त्याला माहीत होतें; ह्मणून राक्षसालाच चंद्रगुप्ताचा प्रधान करून द्यावा, आणि आपण या खटल्यांतून अलग व्हावें, असा त्याचा संकल्प झाला होता.

याप्रमाणें राक्षसाला चंद्रगुप्ताचा दिवाण करावा, असा चाणक्यानें संकल्प केला होता, तरी तसा योग येणें फार कठीण होतें. कारण चाणक्यानें नंदाचा नाश करविल्यामुळें, राक्षस चाणक्याला व चंद्रगुप्ताला आपले वैरी समजत असून होईल त्या रीतीनें त्यांचा सूड घेण्याविषयीं

प्रयत्न करीत होता. याशिवाय नंदाच्या कुळांतला म्हातारा सर्वार्थसिद्धि अद्याप जिवंत होता, व चंद्रगुप्ताचा नाश करून त्याला पुनः राज्यावर बसवावा, असा राक्षसाचा हेतु होता. म्हणून चाणक्याच्या हेतूप्रमाणें राक्षस चंद्रगुप्ताचा दिवाण होण्याचा संभव नव्हता. आणि या सर्वांहीपेक्षां मुख्य अडचण निराळीच होती. ती अशी कीं, चाणक्य हा मोठा अभिमानी असल्यामुळें, त्याला, तूं अमुक काम कर, असें आर्जवानें सांगणें बिलकुल आवडत नव्हतें. वर सांगितल्याप्रमाणें अडचणी होत्या, तरी चाणक्यानें राक्षसाला विनयपूर्वक सांगितलें असतें तर त्याणें चंद्रगुप्ताची दिवाणगिरी अगदींच नाकारली असती, असें नाहीं. तथापि त्या मानी चाणक्याला तसें करणें इष्ट नव्हतें. राक्षसाच्या सर्व मसलती हाणून पाडून त्याला अगदीं दीनवाणा करून तो शरण येई असें करावें, व नंतर त्याच्याशीं सख्य करून चंद्रगुप्तानें राज्य त्याच्या हातीं द्यावें, असा त्याचा इरादा होता; व म्हणूनच त्याणें अनेक मसलती चालविल्या.

याप्रमाणें केवळ अभिमानास पेटलेल्या दोघां मसलती पुरुषांनीं एकमेकांचीं कारस्थानें हाणून पाडण्याचा प्रयत्न करून त्या पायीं हजारों मनुष्यांचा बळी घेतला. तो प्रकार अनुक्रमानें पुढें येईल.

राक्षसाचा नंदवंशावर विशेष पक्षपात असून म्हातारा सर्वार्थसिद्धि जिवंत होता, व त्याला पुनः राज्यावर बसविण्याचा त्याचा इरादा होता, हें वर सांगितलेंच आहे. नंदाच्या वंशापैकीं काय तो एक हा सर्वार्थसिद्धिच राहिला

होता. त्याला मारून टाकलें ह्मणजे **नंदाचा** अगदीं निर्वंश होईल. तेव्हां अर्थात् **राक्षसाचा** जो त्याच्या वंशावर इतका पक्षपात आहे, तो आपोआपच नाहींसा होईल, असा विचार करून **चाणक्यानें** प्रथम त्या ह्मातान्यावर हत्यार धरलें. तो बिचारा **सर्वार्थसिद्धि** सर्वसंगपरित्याग करून **कुसुमपुराच्या** जवळच एकांतस्थळीं हरिहरि करीत बसला होता. त्याला राज्याची किंवा दुसऱ्या कशाचीच इच्छा नव्हती. **चाणक्य** कदाचित् त्याच्यावर शस्त्र धरील, ह्मणून **राक्षसानें** त्याला दूर गुप्त ठिकाणीं नेऊन ठेविलें होतें, हें पूर्वी सांगितलेंच आहे.

**चाणक्यानें सर्वार्थसिद्धीला** मारण्याचा इरादा करून कांहीं लोक त्याच्या शोधाकरितां पाठविले. जंगली लोकांना अनुकूळ करून घेऊन जिकडे तिकडे दऱ्याखोऱ्यांतून त्याचा शोध करीत करीत शेवटीं ते **चित्रकूट** पर्वतावर येऊन पोहोंचले. दुर्दैवी **सर्वार्थसिद्धि** त्याच पर्वतावर एका गुहेंत राहिला होता. जंगली लोकांनीं त्याला शोधून काढलें, तेव्हां **चाणक्याच्या** सरदारांनीं त्याच्या भोंवतीं वढा दिला.

या वेळीं **सर्वार्थसिद्धीची** स्थिति फार शोचनीय होती. त्याच्याजवळ थोडाशा चाकरमाणसांवांचून दुसरें कोणीच नव्हतें. आपण सर्वसंगपरित्याग केला असून आतां आपल्यावर हें संकट कां आलें याचें त्याला मोठें आश्चर्य वाटलें. **राक्षसानें** मुळच्या ठिकाणाहून काढून त्याला या ठिकाणीं आणलें, तेव्हां, **चाणक्यानें** आपले पुत्र (नवनंद) मारले व **चंद्रगुप्ताला** राज्य मिळालें, हें वर्त-

मान त्याला माहीत होतें. पुत्रांच्या मरणाबद्दल त्याला दुःख झालें, तरी **चंद्रगुप्ता**ला राज्य मिळालें, याबद्दल त्याला वाईट वाटलें नव्हतें. कारण त्याची धाकटी राणी **मुरा** ही विशेष आवडती असल्यामुळें तिचा पुत्र **मौर्य** याच्यावर त्याचें विशेष प्रेम होतें.

**नवनंदां**नीं **मौर्य** व त्याचे पुत्र यांना मोठ्या क्रूरपणानें मारलें, हें **सर्वार्थसिद्धी**ला मुळींच आवडलें नव्हतें. तरी त्याच्या हातीं सत्ता नसून मुलगे आपलें ऐकणार नाहींत, असें समजून तो त्या संबंधानें त्यावेळीं कांहींच बोलला नाहीं. एकंदरींत **चंद्रगुप्ता**ला राज्य मिळालें, याचा त्याला कांहीं अंशीं संतोषच झाला होता. आपण कांहीं खटपट करीत नाहीं, व **चंद्रगुप्ता**विषयीं आपली अनुकूलता आहे, तेव्हां **चाणक्य** कितीही क्रूर असला तरी तो आपल्यावर कांहीं संकट आणील, असें त्याला वाटलें नव्हतें.

अशा स्थितींत शस्त्रधारी पुरुषांचा आपल्या भोंवतीं एकाएकीं गराडा पडलेला पाहून भयभीत होऊन 'अरे, हें काय! असें कां!' ह्मणून तो त्यांस विचारूं लागला. तेव्हां त्याच्याशीं विशेष कांहीं न बोलतां—हें सर्व तुझा अत्यंत विश्वासु व हितकर्ता ह्मणविणाऱ्या **राक्षसा**च्या पक्षपाताचें फल आहे; हूं, बैस खालीं, पुरे कर आतां वडबड, घे देवाचें नांव, आणि जा आपल्या पुत्रांच्या शोधाला, असें बोलून एका क्रूर मनुष्यानें त्या ह्मातान्याचें डोकें चेंडूसारखें उडविलें! हरहर! या कृत्याला काय ह्मणावें तें कळत नाहीं. प्रत्यक्ष **राक्षस** देखील निरुपद्रवी प्राण्याला खात नाहींत; पण महत्त्वाकांक्षी **चाणक्या**ला गरीब **सर्वार्थसिद्धी**चा घात करणें कांहींच

कठीण वाटलें नाहीं! वस्तुत: त्या ह्मातान्यापासून कोणत्या-ही प्रकारचा अपकार होण्याचा संभव नव्हता. केवळ चाणक्यानें आपली ईर्षा पूर्ण करण्याकरितांच त्याचा घात केला!

याप्रमाणें राक्षसाचा नंदवंशावरचा पक्षपात समूळ नाहींसा करण्याकरितां निरपराधी सर्वार्थसिद्धीचा नाश करून चाणक्य संतुष्ट झाला. चाणक्याला असें वाटलें कीं, नंदाच्या सरळ वंशापैकीं ह्मणून आतां कोणीच राहिलें नाहीं; तेव्हां अर्थात् राक्षसाची त्याच्या वंशावरची भक्ति शिथिल होईलच, व तिचा ओघ चंद्रगुप्ताकडेच वळेल. कारण, चंद्रगुप्त हा नंदाच्या कुळांपैकीं सवर्णस्त्रीचा वश नसला तरी तद्वंशीयच असल्यामुळें राक्षसाला लागलें तर त्याचेंच भगत्य लागल, असें चाणक्याचें अनुमान होतें व शेवटीं तेंच खरें झालें. चाणक्य चंद्रगुप्ताविषयां रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून जपत होता. तो किती जपत होता हें पुढील गोष्टीवरून व्यक्त होईल.

एके दिवशीं एका गृहस्थानें दुसऱ्या एका गृहस्थाच्या बायकोला, आज चंद्राला ग्रहण लागणार, असें सांगितल्यावरून, ती त्यावेळीं ब्राह्मणांला भोजन देण्याकरितां स्वयंपाकाच्या तयारीस लागली होती, इतक्यांत तिचा नवरा घरीं आला. त्याणें विशेष प्रकारची तयारी पाहून, हें काय! ह्मणून बायकोला विचारलें, तेव्हां तिणें, ग्रहणपर्वणीच्या निमित्तानें ही तयारी केली आहे, असें सांगितलें.

तें ऐकून त्या गृहस्थाला मोठें वाईट वाटलें. त्याला ज्योतिषशास्त्राची चांगली माहिती होती. तो बायकोला

म्हणाला, 'अग, मला ज्योतिषशास्त्राचीं चौसष्ट अंगें* पूर्णपणें माहीत आहेत. तूं केवळ ब्राह्मणांच्या उद्देशानें भोजनाची तयारी करीत असशील तर खुशाल कर; पण आज चंद्रग्रहण आहे, असें ज्यानें तुला सांगितलें, त्यानें मात्र तुला फसविलें असावें असें वाटतें. केतूसहवर्तमान राहु चंद्राचें पूर्णमंडळ ग्रासण्याविषयीं मोठ्या आवेशानें त्याच्यावर चाल करीत आहे, तरी'—

त्या गृहस्थाचें वाक्य अद्याप पुरें झालें नव्हतें, इतक्यांत **चाणक्य**, गुप्तरीतीनें नगरांत संचार करीत होता, तो, त्या गृहस्थाच्या दरवाज्यांत येऊन पोहोंचला. **चाणक्य** रात्रंदिवस **चंद्रगुप्ताचें** रक्षण करण्याविषयीं किती जपत होता, हें निराळें सांगावयासच नको. 'केतूसहवर्तमान क्रूर ग्रह (राहु) चंद्रावर चाल करीत आहे.' हे त्या गृहस्थाच्या तोंडचे शब्द कानीं पडतांच, **चाणक्य** कावराबावरा होऊन ह्मणाला, 'काय! मी असतांना † चंद्रावर (**चंद्रगुप्तावर**) दुसरा कोण चाल करणार?'

इतक्यांत तो गृहस्थ आपलें वाक्य पुरें करण्याकरितां

---

* येथें 'चौसष्ट अंगें' असें ह्मटलें आहे; तरी चौसष्ट हीं मुख्य अंगें नसून त्यांत २४ अंगें व ४० उपांगें आहेत. दोनही मिळून चौसष्ट होतात, ह्मणून त्यांचा असा उल्लेख केला आहे. हीं ज्योतिःशास्त्राचीं चौसष्ट अंगें व उपांगें गर्गऋषीनें विस्तारपूर्वक वर्णन केलीं आहेत. थोडक्यात त्याची येथें माहिती देता येणार नाहीं म्हणून आम्हीं त्याची उपेक्षा केली.

† त्या गृहस्थाच्या वाक्याचा चाणक्यानें दुसराच अर्थ घेतला होता. '**केतु**' म्हणजे **मलयकेतु** व 'क्रूर ग्रह' म्हणजे **राक्षस** असें समजून तो 'चंद्रावर' ह्मणजे **चंद्रगुप्तावर** चाल करणार असें तो गृहस्थ म्हणतो, असें चाणक्याला वाटलें.

ह्मणाला,—'पण बुध त्याच्या जवळ असल्यामुळें तो त्याचें रक्षण करीत आहे.'

त्याच्या स्त्रीनें चाणक्याच्या तोंडचे शब्द ऐकले; पण तो घराच्या बाहेर असल्यामुळें, हें कोण बोलला, तें तिला समजलें नाहीं. ह्मणून ती ह्मणाली, 'अहो, बाहेर कोणीं बोललेंसें वाटतें; 'आपण असतां चंद्रावर कोण चाल करणार!' असें त्यानें ह्मटलें. पण पृथ्वीवर राहून आकाशांतल्या चंद्राचें रक्षण करण्याविषयीं इच्छा करणारा असा हा कोण असावा बरें?'

तो गृहस्थ ह्मणाला, 'होहो, खरें खरें. बाहेर कोणसा बोलला खरा; पण माझें तिकडे लक्ष गेलें नाहीं. पूर्वीं बोललों तेंच पुनः बोलतों, म्हणजे जवळ कोणी असला तर तो पुनः बोलेल.' असें सांगून तो गृहस्थ पहिल्याप्रमाणेंच ग्रहणाच्या संबंधानें बोलला.

तें ऐकून चाणक्य रागानें ह्मणाला, 'अरे ! मी असतांना चंद्रावर चाल करण्याची इच्छा करणारा दुष्ट कोण आहे!'

चाणक्याचा स्वर ओळखून, तो गृहस्थ आपल्या बायकोला ह्मणाला, 'हो आतां समजलों. हा चाणक्य आहे. हा मोठा कुटिलबुद्धीचा असून ज्यानें आपल्या क्रोधाग्नींत नंदाचा वंश बलात्कारानें जाळला, तोच ही स्वारी!—'चं

* बहुतकरून पांच ग्रहाचा योग आल्यावाचून ग्रहण येत नाहीं. तथापि त्या पांचात जर बुध हा ग्रह जवळ असेल तर मुळींच ग्रहण लागत नाहीं. कारण बुध चंद्राचें रक्षण करतो. याविषयीं गर्गानें सांगितलें आहे कीं, "केवळ पांच ग्रह एकत्र जमले एवढ्यावरूनच ग्रहण सांगूं नये, तर त्यांत जर बुध नसेल व त्यांचें युद्ध होत असेल तरच ग्रहण आहे असें सांगावें."

द्रावर मह चाल करतो' हे माझ्या तोंडचे शब्द ऐकून नां-वाच्या सादृश्यावरून—**चंद्रगुप्ता**वर शत्रु चाल करीत आहे, असें समजून स्वारी रागावली आहे. असो. आतां आपण ही गोष्ट सोडून देऊं या म्हणजे झालें.' असें बोलून तीं उभयतां नवराबायको मुकाट्यानीं बसलीं.

इकडे रागावलेला **चाणक्य**, आपली मोकळी सोडले-ली शेंडी हातांत धरून, बरोबर असलेल्या **शार्ङ्गरव** नांवाच्या शिष्याला म्हणाला, 'कायरे, मी जिवंत असतां **चंद्रगुप्ता**वर कोण स्वारी करण्याची इच्छा करीत आहे? हत्तीचे गंडस्थळ फोडल्यामुळे त्याच्या रक्तानें, – सायका-ळच्या आरक्त झालेल्या चंद्रमंडलाप्रमाणें लाल दिसणारी व जांभई देत असतां जबडा उघडल्यामुळें बाहेर दिसणारी, सिंहाची दाढ उपटण्याविषयीं कोण मूर्ख प्रयत्न करीत आहे! तसेंच **नंद**कुलाचा नाश करणारी केवळ नागीणच असून कोपाग्नीच्या धुरानें काळी झालेली अशी ही माझी शेंडी, मीं बांधूं नये अशी कोण इच्छा करीत आहे? अरे, पण **नंद**कुल-रूपी अरण्याला जाळणारा वणवा, असा जो मी, त्या माझ्या रागाचा प्रताप न जाणून आपलें आणि दुसऱ्याचें बळ न सम-जणारा मूर्ख, **चंद्रगुप्ता**वर स्वारी करून टोळासारखा माझ्या क्रोधाग्नींत जळण्याची इच्छा करणारा पुरुष कोण आहे बरें?'

'अरे **शार्ङ्गरवा**, मला बसावेसें वाटतें. तर आतां कोठें बसावें बरें?'

**चाणक्य** राहत होता ती जागा जवळच होती; म्हणून **शार्ङ्गरव** म्हणाला, 'गुरुमहाराज, ही आपली मठी जव-ळच आहे. तेथें चलावें म्हणजे झालें.'

**शार्ङ्गरवानें** जवळ आहे असें सांगितल्यावरून, **चाणक्य** त्याच्या बरोबर आपल्या घरांत गेला. चंद्रावर चाल करणार, ही गोष्ट ऐकून तो रागानें लाल झाला होता. बराच वेळ त्याची स्थिति मोठी चमत्कारिक झाली होती.

**सर्वार्थसिद्धीचा** नाश केला, तेव्हां आतां **राक्षस** निरुत्साह होऊन आपल्या कचाटय़ांत सांपडल, असें समजून **चाणक्यानें, सर्वार्थसिद्धि** मेल्याचें वर्तमान **राक्षसाच्या** कानावर जाईल, अशी तजवीज केली; तरी तो निरुत्साह झाला नाहीं. **नंदाचा** अगदीं निर्वंश झाला याबद्दल त्याला अतिशय दुःख झालें. तरी **पर्वतराजाला** आपण वचन दिलें होतें, तें पुरें करण्याला आतां कांहीं हरकत नाहीं, असें समजून तो विशेषच झटून तयारी करूं लागला. त्यानें **मलयकेतुला** उत्तेजन देऊन **चंद्रगुप्तावर** स्वारी करण्याची तयारी केली होती. **मलयकेतुच्या** आसपास मोठे पराक्रमी म्लेंच्छ राजे होते, त्यांना अनुकूळ करून घेऊन **मलयकेतूनें चंद्रगुप्तावर** स्वारी करण्याचा बेत केला.

**नंदाचें** नांव देखील राहिलें नव्हतें, व **कुसुमपुरांत चंद्रगुप्त** राज्याधिकार चालवीत होता. तरी शहरांतील लोक पूर्णपणें त्यावर अनुरक्त झाले नव्हते. अद्याप ते कांहीं तरी गडबड करतील अशी **चाणक्याला** भीति होती. **मलयकेतु कुसुमपुरावर** स्वारी करणार, ही बातमी **राक्षसाच्या** पक्षाच्या लोकांनां साऱ्या शहरभर पसरली. बहुत दिवसांच्या सहवासामुळें व त्याच्या उत्तम गुणांमुळें **राक्षसावर** लोकांची विशेष भक्ति होती. **मलयकेतुला राक्षसाचें** पूर्ण साह्य असून तो मोठ्या तयारीनें स्वारी

करणार, हें ऐकून त्याला फार आनंद झाला. राक्षसाच्या पक्षाचे लोक प्रत्येक दिवशीं नव्यानव्या कांहीं तरी कंड्या पिकवीत होते, त्यामुळें नगरवासी लोक बिथरण्याचा संभव दिसूं लागला.

बापाला ( पर्वतराजाला ) चाणक्यानें मारविलें यामुळें मलयकेतु फारच रागावला आहे, व राक्षसाच्या साह्यानें तो चंद्रकेतूला मारून बापाचा सूड उगविणार, हें वर्तमान कुसुमपुरांत जिकडे तिकडे पसरल्यामुळें, चाणक्याला काळजी उत्पन्न झाली. आतां याविषयीं काय उपाय करावा, अशी त्याच्या मनांत विवंचना उत्पन्न झाली; पण पुनः त्याला वाटलें कीं, त्याच्याविषयीं इतकी काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. आपल्या पक्षाला एका चंद्रगुप्तावांचून कोणी देखील मनुष्य अनुकूळ नव्हता. अशा वेळीं नंदवंशाचा नाश करण्याविषयीं प्रतिज्ञा करून आपण ती पूर्णही केली, तेव्हां आतां मलयकेतु चंद्रगुप्तावर स्वारी करणार, ही बातमी लोकांत पसरली तरी तिचा बंदोबस्त करणें मला मोठेंसें कठीण आहे, असें नाहीं.

कारण, शत्रूच्या स्त्रिया ह्याच कोणी एक दिशा त्यांचे मुखचंद्र शोकरूपी धुरांनीं काळे ठिक्कर करून, मंत्रिरूप वृक्षावर गूढमसलतरूपी वाऱ्यानें मोहरूपी राखाडी विखरून, नगरवासिजन व ब्राह्मण इत्यादिकांला वर्ज करून नंदवंशाचे अंकुर समूळ जाळून टाकले व आतां जाळण्याला कांहीं राहिलें नाहीं, ह्मणूनच माझा क्रोध—जंगल जाळून आपोआप शांत होणाऱ्या वणव्यासारखा हळुहळु शांत

होत आहे. तसेंच मी **नंदाच्या** घरीं भोजनाकरितां येऊन अग्रासनावर बसलों तेव्हां ते दुष्ट **नंद** माझ्या हाताला धरून ओढीत असतां,—ती गोष्ट ज्यांला सहन झाली नाहीं, पण निरुपायास्तव खालीं मान घालून, दुःखित होऊन ज्यांनीं दीनमुद्रेनें माझ्याकडे पाहिलें होतें; तेच लोक—परिवारासह पर्वतशिखरावरून सिंहानें गजेंद्राला ओढावें, तसा परिवारासह मी **नंदाला** सिंहासनावरून खालीं पाडलेला पाहून, आतां काय म्हणत असतील बरें? वस्तुतः माझी प्रतिज्ञा तर पूर्ण झालीच आहे, तथापि केवळ **चंद्रगुप्ता**-करितांच मी शस्त्र हातांत धरलें आहे.

पृथ्वीच्या हृदयाचे केवळ रोगच असे **नवनंद** मी समूळ नाहींसे केले. **मौर्य** अर्थात् **चंद्रगुप्त** याच्या ठिकाणीं,—सरोवरांत कमलिनीला स्थिर करावी त्याप्रमाणें, राजलक्ष्मीला स्थिर केली. माझा राग आणि प्रीति या दोहोंचींही फलें माझे शत्रु **नंद** यांच्या ठिकाणीं व मित्र **चंद्रगुप्त** याच्या ठिकाणीं अनुक्रमें मी समसमान विभागून दिलीं.

हो. इतकें सगळें केलें खरें; पण जोंपर्यंत **राक्षसाला** मीं आपल्या कह्यांत आणून ठेवलें नाहीं, तोंपर्यंत **नंदाचा** वंश निर्मूळ केला किंवा **चंद्रगुप्ताची** राजलक्ष्मी स्थिर केली, असें मुळींच ह्मणतां येत नाहीं. अंमळ विचार करून ह्मणाला, नंदवंशावर **राक्षसाची** निरतिशय भक्ति आहे. **नंदाच्या** वंशापैकीं कोणीही जिवंत असेल तर तो स्वस्थ बसावयाचा नाहीं, व माझ्या मनांत त्याला **चंद्रगुप्ताचा** प्रधान करावयाचा आहे, तेव्हां ती गोष्ट मुळींच सिद्धीला जावयाची नाहीं. **नंदवंशीयाला** राज्य मिळवून देण्याच्या

प्रयत्नाविषयीं निरुत्साह झाला, तर मग तो आमच्या हातीं लागेल, असें समजूनच तपोवनांत राहणाऱ्या नंदवंशीय दुर्दैवी सर्वार्थसिद्धीला मी मारविलें. नंदवंश नाहींसा झाल्यामुळें वस्तुतः आतां त्यानें ह्या खटपटीचा नाद सोडावा. पण सर्वार्थसिद्धि मेला तरी मलयकेतूला बगलेंत मारून तो आमच्या नाशाविषयीं विशेष प्रयत्न करीत आहे, असें समजतें.

राक्षसाच्या ह्या निरतिशय स्वामिभक्तीविषयीं संतुष्ट होऊन आकाशाकडे लक्ष लावून राक्षसाला उद्देशून ह्मणाला, 'शाबास, अमात्या राक्षसा शाबास, मंत्रिबृहस्पते शाबास! ह्या जगांत पुष्कळ लोक सेवा करीत आहेत; पण तुझ्यासारखा कोणीच आढळत नाहीं. धनी ऐश्वर्यावर असतां जे लोक त्याची सेवा करतात, ते केवळ त्याच्यापासून लाभ होण्याच्या इच्छेनेंच करितात. कोणी ऐश्वर्यापासून भ्रष्ट झालेल्या धन्याचीही सेवा करतात; पण ते तरी, तो धनी पुनः आपल्या ऐश्वर्यावर आरूढ होईल, व त्याच्यापासून आपलें विशेष कल्याण होईल, ह्याच आशेनें करितात. पण धन्याचा अगदां निर्वंश झाला असतांही—त्यानें पूर्वी केलेल्या उपकारांचें स्मरण करून, जे त्याच्याविषयीं तुझ्यासारखे स्वामिभक्त प्रयत्न करतात, ते परम धन्य होत, व ह्मणूनच तुला चंद्रगुप्ताचा दिवाण करण्याविषयीं मी प्रयत्न करीत आहें.

खरोखर तुझ्यासारखा सर्वगुणसंपन्न दिवाण असेल तरच उपयोग. नाहीं तर, धन्यावर एकनिष्ठपणें भक्ति ठेवणारा आहे, पण अडाणी असून भि-

त्रा आहे, तर त्याचा काय उपयोग? बरें, बुद्धिमान् असून पराक्रमीही आहे; पण तो जर स्वामिभक्त नसला तर त्याचा तरी काय उपयोग ? प्रज्ञा, पराक्रम, आणि स्वामिभक्ति, हे तिन्ही गुण ज्याच्या अंगीं असतील, असेच पुरुष राजकार्याचा भार वाहण्याला योग्य होतात. अन्यप्रकारचे सेवक हे राजांच्या केवळ बायका होत असें ह्मटलें तरी चालेल. ह्मणजे बायको बरी वाईट कसली असली, तरी जसें तिचें पोषण करावयाचें, तसेंच गुणहीन सेवकांचें केवळ मेहरबानीखातर पोषण करावयाचें असतें. त्यापासून उपयोग ह्मटला तर कांहींच होत नाहीं.'

असें आहे ह्मणूनच मीही या गोष्टीच्या संबंधानें असावध राहिलों नाहीं. **राक्षसाला** आपल्या हातांत घेण्याविषयीं आमचा प्रयत्न चाललाच आहे. **चंद्रगुप्त** आणि **पर्वतराज** हे दोघेही मला सारखेच आहेत, असें लोक मानीत असत. कारण, **पर्वतराजालाही** मी अर्धे राज्य द्यावयाचें कबूल केलें होतें. तेव्हां दोहोंतून कोणाचाही नाश झाला तरी माझा अपकार केल्यासारखेंच होणार, व असें समजूनच—विष-कन्येकरवीं आमचा नाश करण्याच्या बुद्धीनें **राक्षसानें** **पर्वतराजाला** मारविलें, अशी मी कंडी पिकविली, आणि ही गोष्ट लोकांना खरी वाटावी ह्मणून **भागुरायणाकरवीं** **पर्वतराजाचा** पुत्र **मलयकेतु** याला गुप्त रीतीनें—**राक्षसानें** तुझा बाप मारविला, व तुझ्यावरही त्याचा डोळा आहे, अशी दहशत घालून—येथून पळवून लावला.

सांप्रत **राक्षसानें** त्याच्या मनाची खात्री केल्या-**वरून, पर्वतराजाला** मीच मारविलें अशा समजुती-

नें मलयकेतु राक्षसावर पूर्ण विश्वास ठेवून त्याच्या तंत्रानें वागत आहे, असें समजतें. यद्यपि राक्षसानें त्याला आपलासा करून घेतला आहे, व पर्वतराजाला मारण्याच्या संबंधानें आपल्यावरचा अपवाद त्याणें घालविल्यासारखा केला आहे, तथापि मी त्याला आतांच नाहींसा करून टाकीन. राक्षस त्याचें रक्षण करीत आहे, तरी मलयकेतूला मारणें मला फारसें कठीण नाहीं, व मलयकेतु मेला ह्मणजे राक्षस आपोआप निरुत्साह होईल; तथापि आपल्याला तसें कर्तव्य नाहीं. आणि तसें केलें ह्मणजे पर्वतराजाच्या मृत्यूच्या संबंधाचें अपेश मी राक्षसाच्या माथीं मारलें आहे, तें आपोआप नाहींसें होईल. कारण राक्षसासारखा स्वामिभक्त, आपण होऊन मलयकेतूचा—ह्मणजे आपल्या धन्याचा, घात करील ही गोष्ट कोणालाही खरी वाटणार नाहीं. पर्वतराजाचा आणि राक्षसाचा त्यावेळीं विशेष संबंध नव्हता, ह्मणून आह्मीं जी कंडी उठविली ती लोकांना खरी वाटली; पण आतां मलयकेतूच्या संबंधानें तसें होणार नाहीं. त्याला मीच मारविला असें लोक समजतील व त्यावरून पर्वतराजालाही मीच मारवून बळेंच राक्षसाच्या नांवाचा पुकारा केला, असें होईल. तेव्हां तसें करतां उपयोगाचें नाहीं.

राक्षसाला आपल्या कहेंत आणायचा तो दुसऱ्याच रीतीनें आणला पाहिजे. मलयकेतूचें आणि त्याचें भांडण लावून द्यावें, आणि मलयकेतूनें साह्यकर्ते जे बलाढ्य राजपुत्र आहेत, त्यांना त्याच्याच करवीं युक्तीनें मारवून मग मलयकेतूला कैद करावा, ह्मणजे हें कार्य आपोआप होईल.

याविषयीं मी सगळी योजना तर करून ठेवलीच आहे, आपल्या आणि शत्रूच्या पक्षावर कोण कोण अनुरक्त आहेत, कोणकोण नाहींत, हें समजून घेण्याकरितां अनेक देशभाषा जाणणारे, नानाप्रकारचा वेष धारण करणारे, निरनिराळ्या देशांतील लोकांचे आचार विचार जाणणारे व अनेक निमित्तांनीं लोकांत संचार करणारे, असे पुष्कळ हेर मीं जिकडे तिकडे पाठविले आहेत. ह्या कुसुमपुरांतील शत्रुपक्षाकडच्या लोकांच्या वर्तनावर सारखी नजर ठेविली आहे. ज्यांनीं ज्यांनीं चंद्रगुप्ताला साह्य केलें, त्यांना त्यांना, त्यांचे मनोरथ पूर्ण करून, संतुष्ट केलें आहे. भद्रभट इत्यादिकांना आह्मीं मोठमोठ्या देणग्या दिल्या, तरी त्या उगीच दिल्या नसून कांहीं तरी कामगिरीचें निमित्त लावूनच दिल्या आहेत; तेव्हां ते आमच्या हिताविषयीं तत्पर आहेतच. शत्रुपक्षाकडचे लोक कोणत्याही निमित्तानें चंद्रगुप्ताचा घात करतील, ह्मणून त्यांवर नजर ठेवण्याकरितां, परम विश्वासू पुरुष चंद्रगुप्ताच्या जवळ ठेविले आहेत. शत्रूंनीं कांहीं दगा फटका योजला असेल तर ते तो चालूं देणार नाहींत.

माझा सहाध्यायी इंदुशर्मा याला तर पूर्वींच एका मोठ्या कामगिरीवर नेमला आहे. त्यानें नंदाच्या साऱ्या मंत्र्यांना मोहित करून टाकल्यामुळें, नंदाचा नाश करण्याच्या कामीं त्याचा आह्मांस मोठा उपयोग झाला. नंदाच्या दरबारांतले सारे कामदारलोक त्याचे विश्वासू मित्र झाले आहेत. विशेषतः राक्षसाचा त्याच्यावर अधिक विश्वास बसला असल्यामुळें त्यापासून आपलें मोठें

कार्य होणार आहे. यावरून पाहतां एकंदरींत आमच्या कडून कोणतीही गोष्ट गेली आहे, असें कांहीं नाहीं.

हें सारें ठीक आहे; पण चंद्रगुप्त, राजकार्याचा सारा भार आमच्यावर घालून, आपण नेहमीं निष्काळजी व बेपरवा असतो, याचें कारण काय तें समजत नाहीं. नीट विचार करून ह्मणाला, पण याविषयीं विशेष विचार करावयास नको. स्वतः फारसें दुःख कष्ट भोगल्यावांचून जें राज्य मिळतें तेंच सुखकारक होतें. चंद्रगुप्ताला एवढें मोठें राज्य मिळविण्याच्या संबंधानें कांहींच श्रम पडले नाहींत. लढाईची मेहनत करावी लागली, ती त्या दुर्दैवी पर्वतराजानें केली. मसलती करायच्या त्या मीं केल्या, तेव्हां चंद्रगुप्ताला त्या संबंधानें काळजीचें वारें देखील लागलें नाहीं. याप्रमाणें राज्य मिळविण्याच्या संबंधानें त्याला श्रम पडले नाहींत ते नाहींत; पण त्याच्या रक्षणाची तरी त्याला कोठें काळजी आहे! हा मी रात्रंदिवस त्याच्या कार्याविषयीं डोळ्यांत तेल घालून बसलों आहें, व ह्मणूनच तो खुशाल चैनींत राहतो आहे. उघडच आहे, स्वभावतः बलाढ्य असला तरी जसा हत्ती आपल्या पाठीवरून आणलेला चारा आपणच खातो, व यामुळें जसा त्याला संतोष होत नाहीं, तसें स्वतः कष्ट सोसून संपादन केलेल्या राज्याच्या उपभोगानें फारसें सुख होत नाहीं.

चंद्रगुप्ताला उद्देशून ह्मणाला, 'वत्सा चंद्रगुप्ता! तूं खुशाल ऐषआराम भोग. राज्याविषयीं कांहीं काळजी करूं नकोस. जसा अर्जुनाच्या हिताविषयीं भगवान् श्रीकृष्ण झपत होता, तसा मी तुझ्या हिताविषयीं तत्पर आहें.'

याप्रमाणें **चाणक्य** विचार करीत आहे इतक्यांत त्यानें दरबारांतील लोकांचें गुप्तवर्तन समजून घेण्याकरितां **निपुणक** नांवाचा एक हुषार हेर नेमला होता, तो *यमपट दाखविणाऱ्याचें सोंग घेऊन लोकांच्या घरोघर फिरून गुप्तवर्तमान काय होतें, तें समजून घेऊन परत **चाणक्याच्या** दरवाज्यांत आला, आणि लोकांना उद्देशून म्हणाला, 'अहो, सर्व तुम्ही यमराजाच्या पायां पडा. दुसऱ्या देवतांला घेऊन काय करावयाचें आहे? हा यमराज मोठा क्रूर आहे. दुसऱ्याला भजणाऱ्या मनुष्यांच्या शरीरांत कुरकुरणारा जीव हा तेव्हांच काढून घेतो. आणि खरें विचाराल तर, तो आपल्या विरुद्ध कां असेना, पण भक्तिपूर्वक त्याचे पाय धरले तर त्यापासून आपले प्राण वांचतात. याविषयीं दुसरें उदाहरण नको. माझ्याकडेच पहा म्हणजे झालें. हा यम म्हटला म्हणजे साऱ्या लोकांला मारणारा आहे; पण आम्ही त्याच्याच आश्रयानें †प्राणांचें रक्षण करीत आहों.' असें बोलून **चाणक्याच्या** घरांत जाऊन, हा यमपट दाखवून, कांहीं गीतें गावीं असा विचार करून, **निपुणक** त्याच्या दरवाज्याच्या आंत आला.

---

* यमपट ही एक पेटी असते. तींत अनेक पडदे असून प्रत्येकावर निरानिराळ्या देवाचीं वगैरे चित्रें काढलेलीं असतात. मोराच्या पिसांचा एक कुंचा हातांत घेऊन तीं चित्रें दाखवून त्यांचें वर्णन करून लोकांपासून पैसे घेऊन त्यावर निर्वाह करणारे कांहीं लोक असतात. निपुणकानें लोकांला आपली ओळख पटूं नये म्हणून त्या प्रकारचें सोंग घेतलें होतें.

† निपुणकाचें हें सामान्यतः सर्व लोकांला उद्देशून भाषण आहे; तरी यांत श्लेष आहे. त्यानें यमशब्दानें चाणक्य घेतला आहे. आणि खरोखर कुसुमपुरांतले लोक चाणक्याला यमच समजत होते. निपुणकाच्या

तेथें चाणक्याचा एक शिष्य दरवाजा राखीत बसला होता. त्या बिचाऱ्या गरीब मुलाला चाणक्याच्या कारस्थानें काय ठाऊक? 'माझ्या परवानगीवांचून कोणाला आंत सोडूं नकोस,' अशी चाणक्याची त्याला आज्ञा होती ह्मणून तो निपुणकाला ह्मणाला, 'अरे बाबा, आंत येऊं नकोस.'

निपुणक ह्मणाला, 'अहो भटजी, मला तुह्मी नको ह्मणतां, तर हें कोणाचें घर आहे!'

शिष्य ह्मणाला, 'अरे, कोणाचें ह्मणजे काय! आमचे गुरुजी प्रसिद्ध आर्य चाणक्य यांचें हें घर आहे.'

हें ऐकून हंसून निपुणक ह्मणाला, "अहो भटजी, तर मग हें माझ्या *धर्मबंधूचें अर्थात् माझेंच घर आहे, ह्मटलें तरी चालेल. तर मला आंत येऊंद्या. मी तुमच्या गुरुजीला हा यमपट उघडून दाखवून थोडासा धर्माचा उपदेश करीन.'

'धर्मोपदेश करितों,' हे शब्द ऐकून शिष्याला मोठा राग आला. निपुणकाच्या भाषणांतली खुबी त्याला मा-

---

बोलण्याचा हेतु असा कीं, लोकहो! तुम्ही यमाला म्हणजे चाणक्याला शरण जा. दुसऱ्या देवता अर्थात् राक्षस व त्याच्या पक्षाचे लोक यांचा आश्रय करूं नका; आणि तसें कराल तर हा तुमचे प्राण घेईल. चाणक्य मोठा क्रूर आहे, असें कदाचित् तुम्हाला वाटेल, पण एकनिष्ठपणें त्याच्या पक्षाला अनुसराल तर तो तुमचें रक्षण करील, व मीही तुमच्याच सारख्या मंदाच्या पक्षाचा असून सांप्रत त्याच्या पक्षाला अनुसरलों आहें, म्हणून खुशाल चैनींत आहें, असें त्यानें सुचविलें आहे.

*निपुणकानें चाणक्याला 'आपला धर्मबंधु' म्हटलें, यांतही श्लेष आहे. जसा हा यमपट दाखवून आपण दुसऱ्याच्या डोळ्यांत धूळ टाकतों, तसा तुमचा गुरुही साक्षात्कारी निराळें सोंग दाखवून लोकांला फसवीत आहे. यावरून त्याचा आणि आपला धर्म सारखाच आहे, असें त्यानें सुचविलें.

होत नव्हती. तो डोळे लाल करून निपुणकाला ह्मणाला, ‘छत्! मूर्ख कुठला. अरे गाढवा, आमच्या गुरूपेक्षांही तूं मोठा धर्मज्ञ आहेस का!’

निपुणक ह्मणाला, ‘होहो! असे रागाऊं नका. प्रत्येक मनुष्याला सगळेंच कांहीं समजतें, आणि सारेच सर्वज्ञ आहेत, असें नाहीं. कांहीं गोष्टी तुमच्या गुरुजीला ठाऊक असतील, व कांहीं आमच्यासारख्यालाही ठाऊक असतील.’

शिष्य ह्मणाला, ‘अरे मूर्खा, तूं मोठा लबाड आहेस असें वाटतें. आमच्या गुरुजींच्या सर्वज्ञतेवर पांघरूण घालण्याचा हा तुझा प्रयत्न आहे, दुसरें कांहीं नाहीं.’

आपलें बोलणें शिष्य कबूल करीत नाहीं, असें पाहून निपुणक ह्मणाला, ‘बरें, तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणें तुमचे गुरुजी जर सर्वज्ञ आहेत तर ‡चंद्र कोणाला इष्ट वाटत नाहीं हें त्याला माहीत आहे का?’

निपुणकानें काय ह्मटलें, तें शिष्याला मुळींच समजलें नाहीं. तो ह्मणाला, ‘अरे मूर्खा, तूं आपल्या मतें मोठा गूढ ह्मणून प्रश्न घातलास, पण त्यांत कांहींच अर्थ नाहीं. चंद्र

---

‡ निपुणकानें केवळ चंद्र इतकेंच ह्मटलें आहे; पण तेवढ्यावरून चंद्रगुप्ताचें ग्रहण केलें आहे. त्याच्या बोलण्याचा अभिप्राय असा कीं, तुझा गुरुजी जर सर्वज्ञ आहे, तर चंद्रगुप्ताला न चाहणारे लोक कोण कोण आहेत, हें त्याला ठाऊक नाहीं. व हें त्याला ठाऊक असतें तर त्या कामावर तो मला कशाला नेमता? अर्थात् राक्षस प्रतिकूळ आहे वगैरे गोष्टी तुझ्या गुरूला ठाऊक आहेत; पण बाह्यात्कारें चंद्रगुप्तावर अनुराग आहे असें दाखवून त्याच्या नाशाविषयीं प्रयत्न करणारे लोक तुझ्या गुरूला मुळींच माहीत नाहींत, असा अभिप्राय.

कोणाला इष्ट आहे, हें समजलें आणि न समजलें दोन्ही सारखींच. त्यापासून काय व्हायचें आहे?'

हें ऐकून त्या शिष्याच्या भोळेपणाचें **निपुणकाला** हसूं आलें. तो ह्मणाला, 'भटजिबुवा, ह्या गोष्टी तुह्मांला समजायच्या नाहींत. चंद्र कोणाला इष्ट वाटत नाहीं, हें समजून घेतल्यापासून काय होणार, तें तुमचे गुरुजी समजतील. तुह्मांला फार झालें तर इतकेंच समजेल कीं, (सूर्यविकासी) *कमलांना चंद्र इष्ट नाहीं. पण असें पहा कीं, तीं कमलें दिसतांना मोठीं मनोहर दिसतात. तरी त्यांचा स्वभाव मोठा क्रूर आहे. रूपाचा आणि स्वभावाचा मुळींच मेळ नाहीं. कारण चंद्राचें पूर्ण मंडल उदय पावलें असूनही तीं त्याच्या विरुद्ध वागतात.'

शिष्य आणि **निपुणक** यांचा संवाद चालला होता, तेथून **चाणक्य** जवळच होता. त्याला **निपुणकानें** काय सांगितलें, तें सर्व ऐकूं आलें; व त्याच्या बोलण्याचा मतलबही त्याला समजला. पण त्यानें पुष्कळ हेर पाठविले असून **निपुणकानें** वेषांतर केलें होतें, तें इतकें बेमालूम होतें कीं, त्यामुळें त्याची ओळख पटणें फार कठीण होतें. त्यावरून हा अमुकच आहे, असें **चाणक्याच्या** लक्षांत आलें

* कमल हा सामान्य शब्द आहे. त्यांत सूर्यविकासी आणि चंद्रविकासी अशीं दोन प्रकारचीं कमलें आहेत. संस्कृत भाषेंत सूर्यविकाशाला, 'कमलें' व चंद्रविकाशांला 'कुमुदें' अशीं निरनिराळीं नांवें आहेत. **निपुणकानें** कमलशब्दानें नंदाचा उत्कर्ष इच्छिणारे अर्थात् राक्षसाच्या पक्षाचे लोक यांचें ग्रहण करून असें सुचविलें कीं, ते लोक **चंद्रगुप्ताचा** द्वेष करितात. व ते बाह्यात्कारें सौम्य दिसतात तरी त्यांची अंतर्गत स्थिति **चंद्रगुप्ताच्या** विरुद्ध आहे. व असे लोक कोणकोण आहेत, तें आपल्याला ठाऊक आहे.

नाहीं. तरी हा आपल्या हेरांपैकीं कोणीतरी आहे, असें समजून तो काय बोलतो तें ऐकत उभा राहिला.

इकडे निपुणकानें कमलाचें रूपक सांगितलें, तें शिष्याला मुळींच समजलें नाहीं. हा उगीच कांहीं तरी बडबडत आहे, असें समजून तो कंटाळून ह्मणाला, 'हा कुठला गाढव येथें आला आहे कोणास ठाऊक! हा भलतेंच काय बडबडत आहे तें कांहीं समजत नाहीं. याचें बोलणें येथून तेथून सारेंच असंबद्ध!'

यावर निपुणक म्हणाला, 'अहो भटजी, अहो माझ्यावर असे रागाऊं नका, माझें बोलणें असंबद्ध नसून तें सुसंबद्धच होईल.'

शिष्य ह्मणाला, 'अरे, तें सुसंबद्ध झालें तरी काय होणार?'

निपुणक म्हणाला, 'जर हें ऐकून माझ्या बोलण्याचा अर्थ जाणणारा कोणी भेटेल तर काय होईल तें समजेल.'

हे त्याच्या तोंडचे शब्द ऐकून कुसुमपुरांतील दरबारी व इतर लोक चंद्रगुप्तावर अनुरक्त आहेत किंवा नाहींत, हें जाणण्याकरितां पाठविलेला निपुणक तो हाच असें समजून चाणक्य आंतून त्याला ह्मणाला, 'बाबा, खुशाल आंत ये. तुला ऐकणारा आणि समजणारा पाहिजे आहे तो अवश्य येथें भेटेल.'

हें ऐकून निपुणक, 'हा आलों,' असें बोलून एकदम आंत शिरला आणि चाणक्याजवळ जाऊन—आर्यांचा जयजयकार असो! असें बोलून त्याला नमस्कार करून

पुढें उभा राहिला. चाणक्यानें त्याचें स्वागत करून खालीं बसायाला सांगितलें तेव्हां निपुणक भुयीवर बसला.

चाणक्य त्याचें गौरव करून ह्मणाला, 'बाबा, काय खबरबात आणलीस ती सांग. चंद्रगुप्तावर प्रजा अनुरक्त आहे किंवा नाहीं तें सांग पाहूं.'

निपुणक ह्मणाला, 'हो हो, यांत काय संशय? आपण प्रजेचा असंतोष होण्याचीं सर्व कारणें नाहींशीं केल्यामुळें, महाराज चंद्रगुप्तावर प्रजा विशेष अनुरक्त झाली आहे. या शहरांत, माजी प्रधान राक्षस, याच्याशीं ज्यांचें विशेष सख्य असून—त्याणें केलेल्या बहुमानानें आभारी झाल्यामुळें महाराज चंद्रगुप्त यांचा उत्कर्ष न सहन करणारे, असे काय ते तिघेच पुरुष आहेत.'

हें ऐकून रागानें दांत ओंठ चावून चाणक्य ह्मणाला, 'चंद्रगुप्ताचें ऐश्वर्य सहन करीत नाहींत, असें कां ह्मणतोस? आपले प्राण सहन करीत नाहींत असें ह्मण. बरें पण, त्यांचीं नांवें तुला माहीत आहेत?'

निपुणक ह्मणाला, 'ह्मणजे! नांवें समजून घेतल्याशिवाय ते प्रतिकूळ आहेत ह्मणून मी आपल्याला कसें सांगेन!'

चाणक्य ह्मणाला, 'तर सांग पाहूं त्यांचीं नांवें! मृत्यूच्या तोंडांत पडण्याची कोणाला इच्छा झाली आहे, तें एकदां ऐकूं दे.'

निपुणक ह्मणाला, 'ऐकावें महाराज. आपल्या शत्रुपक्षाकडे विशेष पक्षपातानें वागणारा जीवसिद्धि नांवाचा जती हा एक त्या तिघांपैकीं मुख्य आहे. ज्यानें, अमात्य राक्षसानें पाठविलेली विषकन्या पर्वतराजावर

घालून, त्याचा नाश केला, तोच हा **जीवसिद्धि**! हा जती महाराजांची फारच निंदा करतो.'

**निपुणकानें** ज्या जतीचें नांव घेतलें, तो कोण हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. **चाणक्याचा** सहाध्यायी **इंदुशर्मा**—ज्याला त्याणें, प्रधानमंडळीची वंचना करण्याकरितां, मुद्दाम त्या कामावर नेमला होता, तोच हा जती त्यानें **जीवसिद्धि** हें नांव धारण केलें होतें. **राक्षस** व इतर **नंद**पक्षीय लोक यांचा आपल्यावर पूर्ण विश्वास बसावा ह्मणून, तो **चाणक्य** व **चंद्रगुप्त** यांची अतिशय निंदा करीत असून, त्यांच्या विरुद्ध मसलती करण्याविषयीं **नंद**पक्षाला उत्तेजन देऊन तिकडची सारी हकीकत वेळोवेळीं **चाणक्याला** कळवीत होता. **निपुणक** अगदीं गुप्त बातमी काढण्यास गेला होता, तरी **चाणक्या**चें कारस्थानच असें कांहीं विलक्षण होतें कीं, त्यानें जे जे हेर पाठविले होते, त्यांला कोणाची गोष्ट कोणाला माहीत नसावी, असाच बंदोबस्त ठेविला होता. **निपुणक** आणि **इंदुशर्मा** (जीवसिद्धि)हे दोघेही **चाणक्याचे**च हेर होते, तरी त्यांना एकमेकांविषयीं कांहींएक माहिती नव्हती. **जीवसिद्धीनें चाणक्याच्या** व **चंद्रगुप्ताच्या** विरुद्ध जें जें कांहीं भाषण केलें तें ऐकून **निपुणकाला** तो **चाणक्याचा** वैरी आहे, असें वाटल्यावरून त्याणें त्याचें नांव सांगितलें.

**जीवसिद्धि** काय करतो हें **चाणक्याला** माहीतच होतें. **निपुणकानें** त्याची विरुद्धपक्षांत गणना केलेली पाहून **चाणक्य** मनांत ह्मणाला, हा बेटा वेडा आहे. अरे, **जीवसिद्धि** तर आमचाच हेर आहे. बरें असो. ही गोष्ट या **मर्खाला**

सांगून काय करायचें आहे! निपुणकाला म्हणाला, 'बरें, हा एक झाला, आणि दुसरा कोण?'

निपुणक ह्मणाला, 'आर्या, अमात्य राक्षसाचा प्रियमित्र शकटदास नांवाचा कायस्थ, हा एक विरुद्धपक्षाचा मनुष्य आहे.'

शकटदासाचें नांव ऐकून चाणक्याला हंसूं आलें. निपुणकानें त्याला कायस्थ असें म्हटलें, त्याबद्दल चाणक्य मनांत ह्मणाला, ऊंः! त्यांत काय अर्थ आहे ! * कायस्थ ह्मटला ह्मणजे त्याची कांहीं गणना नाहीं. किती झालें तरी तो आपल्या लेखणीच्या जोरावर कायत्या उड्या मारणार. असें आहे, तरी तो आपला शत्रु आहे यांत

---

* सांप्रत उत्तर, मध्य व दक्षिण हिंदुस्थानांत कायस्थ या नांवाचे पुष्कळ लोक आहेत. व कायस्थ हा एक स्वतंत्र वर्गच मानला जात आहे. पण वस्तुत कायस्थशब्द, लेखकीचा धंदा करणाऱ्या मनुष्याचा वाचक आहे. मराठींत आपण ज्याला कारकून म्हणतों त्यालाच पूर्वकालीं कायस्थ म्हणत असत. सांप्रत कायस्थ नावाची एक जात आहे, असें लोक समजतात तरी ते सर्व एक नाहींत. एकाच देशांत राहणाऱ्या कायस्थांत अनेक भेद असून त्यांचे आचारविचार देखील अतिशय भिन्न आहेत. यावरून असें वाटतें कीं, ब्राह्मणादि चारी वर्णांतून ज्यांनीं ज्यांनीं कारकुनांचा धंदा पतकरला, व पिढ्यानपिढ्या तोच धंदा करीत आले ते कायस्थ या नांवानें प्रसिद्ध झाले असून त्यांचे पूर्वापार चालत आलेले आचारविचार तसेच कायम राहिल्यामुळें परस्परांच्या वागणुकींत विशेष भेद दिसून येतो स्कंदपुराणांत कायस्थांची उत्पत्ति सांगितली आहे, व चंद्रसेनवंशी कायस्थ असल्याचें वर्णन केलें आहे. तसेंच वर्णसंकरापासूनही कायस्थांची उत्पत्ति वर्णन केली आहे. तथापि व्यवहारांत त्याचा नीटसा मेळ बसत नाहीं. त्या ग्रंथाला प्रमाण मानलें तर चांद्रसेनी कायस्थ, चित्रगुप्त कायस्थ व संकरज कायस्थ असे तीनच भेद असावे. पण सांप्रत अनेक भेद असल्याचें दिसून येतें.

कांहीं संशय नाहीं. शत्रु सामान्य असला तरी त्याची उपेक्षा करतां कामा नये. अग्नीची लहानशी कीट असली तरी तिला इंधन मिळालें असतां ती तेव्हांच भडका उडवून देते; ह्मणूनच मी त्याच्याविषयीं उदासीन राहिलों नाहीं. त्याचा समाचार घेण्याकरितां सिद्धार्थकाला आपण नेमलाच आहे. निपुणकाला म्हणाला, 'बरें आतां तिसरा कोण तो सांग.'

निपुणक ह्मणाला, 'तिसरा देखील अमात्य राक्षसाचें केवळ हृदयच असा आहे. पुष्पपुरांत राहणारा प्रसिद्ध जवाहिऱ्या ज्याला चंदनदासशेट ह्मणतात, तोच तो होय. राक्षसानें त्याच्या घरीं आपलें कुटुंब ठेवून येथून पलायन केलें.'

हें ऐकून चाणक्य मनांत ह्मणाला, बरें बरें. यावरून चंदनदास हा राक्षसाचा परममित्र असलाच पाहिजे. तसें नसतें तर त्यानें आपलें कुटुंब त्याच्या घरीं कधींही ठेवलें नसतें. ठीक आहे. राक्षसाला खेंचून आणण्याविषयीं हें एक उत्तम साधन आहे. निपुणकाला ह्मणाला, 'अरे पण राक्षसानें त्याच्या घरीं आपलें कुटुंब ठेवलें आहे हें तुला कसें समजलें?'

निपुणक ह्मणाला, 'आर्या, ही आंगठी या संबंधानें आपली खात्री करील.' असें सांगून कंबरेला बांधलेल्या एका लकतराच्या पदराची गांठ सोडून निपुणकानें राक्षसाच्या नांवाची आंगठी चाणक्याच्या हातांत दिली.

राक्षस कुसुमपुरांतून पळून गेला, तेव्हां त्याणें आपलें कुटुंब कोणातरी मित्राच्या घरीं ठेवलें असेल, असें सम-

जून चाणक्यानें त्याविषयीं विशेष शोध केला. व त्या-वरून चंदनदासाच्या घरीं त्याचें कुटुंब आहे, असें चाणक्याला समजलें होतें, तरी खात्री नव्हती. राक्षसाच्या कुटुंबाला त्रास द्यावा, किंवा त्यांचा नाश करावा, असा त्याचा मुळींच इरादा नव्हता. तथापि कोणत्याही उपायांनीं राक्षसाला, नाउमेद व पराधीन करून आपल्या हातांत आणावा, असा त्याचा मुख्य इरादा होता. व त्याविषयीं त्यानें जे उपाय योजून ठेविले होते, त्यांपैकीं, राक्षसाचें कुटुंब आपल्या हवालीं करीत नाहीं, हें निमित्त लावून राक्षसाचा परममित्र चंदनदासशेट याला त्रास द्यावा, हा एक होता.

चंदनदासाच्या घरीं राक्षसाचें कुटुंब आहे, हें पूर्वीच चाणक्याला समजलें होतें; तरी चंदनदास ती गोष्ट कबूल करणार नाहीं, व त्याच्याविषयीं चाणक्याजवळ विशेष कांहीं आधारही नव्हता. चंदनदास हा एक मोठा नामांकित सावकार असून लोकांत त्याचें विशेष वजन होतें. विशेष पुराव्यावांचून त्यावर राक्षसाच्या कुटुंबाच्या संबंधानें सक्ती केली, तर कदाचित् लोक नाराज होतील. व एकंदरींत लोकांना नाराज न करणें हें त्याला विशेष इष्ट होतें, ह्मणून चंदनदासावर त्यानें हावेळपर्यंत सक्ती केली नाहीं. निपुणकानें आंगठी दिली, ती हातांत घेऊन तीवर राक्षसाचें नांव खोदलेलें होतें, तें वाचून हर्षानें ती आंगठी आपल्या बोटांत घालून चाणक्य मनांत ह्मणाला, केवळ ही निर्जीव आंगठीच आमच्या बोटांत आली असें नाहीं, तर हिच्या निमित्तानें राक्षसच आमच्या बोटांत आला असें

ह्मटलें पाहिजे. ही आंगठी आमचीं पुष्कळ कामें करणार आहे. निपुणकाला ह्मणाला, 'बाबा, आंगठी आणलीस हें फार चांगलें केलेंस; पण ती तुझ्या हातीं कशी लागली, तें सविस्तर ऐकण्याची मला फार इच्छा आहे.'

हें ऐकून निपुणक ह्मणाला, 'ऐकावें महाराज. शहरांतील लोकांची हालचाल समजून घेण्याविषयीं मला आपण आज्ञा केली. तेव्हां कोणालाही शंका येऊं नये ह्मणून मी असा भिकाऱ्याचा वेष घेतला, आणि हा यमपट दाखवून भिक्षा मागत मागत घरोघर फिरूं लागलों. फिरतां फिरतां सहज तो जव्हेरी चंदनदासशेट, याच्या घरीं गेलों. तेथें हा यमपट उघडून गीतें गात गात एकएक चित्र दाखवूं लागलों.

त्या शेटजीचे नोकर चाकर व इतर मंडळी चित्रवत् माझ्याकडे पहात उभी राहिली होती. इतक्यांत एक लहानशी खिडकी उघडून तेथून सुमारें पांच वर्षांच्या वयाचा एक गोजिरवाणा मुलगा बालचेष्टा करीत करीत बाहेर येण्याचा प्रयत्न करूं लागला. तों—अरे हा बाहेर गेला! अरे हा बाहेर गेला! असा साशंकपणा सुचविणारा, त्याच खिडकीच्या आंत असलेल्या स्त्रियांचा गलबला झाला. नंतर त्या खिडकीच्या दारांतून अम्मळ बाहेर डोकावून पाहणाऱ्या एका स्त्रीनें त्या मुलाला दटावून आपल्या कोमल बाहुलतेनें आवरून धरिलें. माझा यमपट पाहण्याकरितां बाहेर येण्याविषयीं हट्ट घेणाऱ्या त्या मुलाशीं तिची थोडीशी झटपट झाली. त्या गडबडींत ही आंगठी तिच्या हातांतून खालीं आंगणांत पडली!

उंचावरून पडल्यामुळें जमिनीचा स्पर्श करून उटल खाऊन ती घरंगळत माझ्या पायांजवळ येऊन—भक्तिपूर्वक नमस्कार करायाला आलेल्या कुलवधूसारखी तेथेंच निश्चल झाली. मुलाला आवरण्याच्या गडबडींत त्या स्त्रीला आंगठी पडल्याचें भान राहिलें नाहीं. मीही तत्काल ती पायांखालीं दडवून ठेवली, आणि तेथून निघतेवेळीं हळूच उचलून घेऊन मग नीट पाहिली; तों ती अमात्य **राक्षसाच्या** नांवाची आहे, असें समजून आणली व ती आतां आपल्याला अर्पण केली. मुलगा बाहेर येऊं लागला, त्या संबंधानें जो गलबला झाला, त्यावरून व मुलाला आवरून धरणाऱ्या बाईच्या हातूनच ही आंगठी पडली, त्यावरून तो मुलगा **राक्षसाचाच** असावा, व ती स्त्री त्याची आई असावी असें मी ताडलें.'

हा वृत्तांत ऐकून **चाणक्याला** फार आनंद झाला. तो **निपुणकाला** ह्मणाला, 'शाबास! तूं मोठी कामगिरी केलीस. लवकरच हिच्या योग्य तुला बक्षीस मिळेल. मला काय ऐकायचें होतें, तें ऐकलें. आतां तू येथून जाऊन खुशाल विश्रांति घे.'

हें ऐकून आपल्या आज्ञेप्रमाणें करतों, असें ह्मणून **निपुणक** त्याला नमस्कार करून तेथून निघाला. **राक्षसाच्या** नांवाची आंगठी **चाणक्याच्या** हातांत आली, ती त्याला एक मोठी मंत्रसिद्धिच मिळाल्यासारखें झालें. **राक्षसाच्या** नांवाचा शिक्का ठोकून एक बनावट पत्र करण्याचा त्यानें विचार केला. **राक्षसाचा** प्रियमित्र **चंदनदास** याला छळून **राक्षसाला** वश करून घ्यायचा हा एक

त्याणें उपाय योजलेला होता; पण तो एव्हांशींच अमलांत आणायचा नव्हता. प्रथम, ज्या **मलयकेतूला** बगलेंत मारून त्याच्या बळावर **राक्षसानें चंद्रगुप्तावर** स्वारी करण्याची तयारी केली होती, त्या **मलयकेतूचा** आणि **राक्षसाचा** बेबनाव करून, **मलयकेतूनें** राक्षसाला आपल्यापासून घालवून द्यावा, अशी तजवीज करण्याचें **चाणक्यानें** योजलें होतें.

**मलयकेतूला** विशेष साह्य करण्याविषयीं तयार झालेले पांच म्लेंच्छ जातीचे राजपुत्र होते. ते त्याच्यावर विशेष अनुरक्त असून मोठे बलाढ्य होते, व त्यांच्या संबंधानें **मलयकेतूला** फार आशा होती. केवळ **राक्षसाचा** आणि **मलयकेतूचा** बेबनाव झाल्यानेंच **चाणक्याचें** काम भागत नव्हतें; तर ज्यांच्या बळावर **मलयकेतु** लढाईला तयार झाला होता, त्या पांच राजपुत्रांला मारून **मलयकेतूला** निःशक्त करून, कैद करून आणावयाचा होता. हीं दोनही कार्ये सिद्धीला जाण्याच्या कामीं ती **राक्षसाची** आंगठी त्याला विशेष उपयोगीं पडली, हें पुढें दिसून येईल.

बनावट पत्र तयार करण्याचें योजून त्यानें आपला शिष्य **शार्ङ्गरव** यास दऊन, लेखणी व कागद आणण्यास सांगितलें. **शार्ङ्गरवानें** लिहिण्याचें साहित्य हाजर करतांच, पुढें काय मजकूर लिहायचा तो योजून, **चाणक्य** पत्र लिहावयास लागला. वरती श्रीकार काढून तो आतां ओळ काढणार इतक्यांत **चंद्रगुप्ताची शोणोत्तरा** नांवाची चोपदारीण अकस्मात् तेथें येऊन 'आर्यांना जयजयकार असो'! असें ह्मणाली.

कोणत्याही कामाला आरंभ करतेवेळीं अकस्मात् आपल्या हेतूला अनुकूळ असे शब्द ऐकूं आले, तर तो कार्यसिद्धीचा सूचक एक शुभ *शकुनच आहे असें वाटतें. **चाणक्य** खालीं दृष्टि लावून पत्र लिहीत होता. अकस्मात् जयशब्द कानीं पडल्यावरून त्याला फार हर्ष झाला. बस्स, आपण हा जयशब्द घेतला. असें मनांत बोलून **शोणोत्तरेला** ह्मणाला, 'अग कां आलीस तें सांग.'

**शोणोत्तरा** ह्मणाली, 'महाराज, **चंद्रश्री** ( **चंद्रगुप्त** ) शिरसा नमस्कार करून आपणाला विनंती करीत आहेत कीं, जर आपली आज्ञा होईल तर, परलोकवासी राजा **पर्वतेश्वर** याची उत्तरक्रिया करून त्याच्या देहाचें सार्थक करीन. आणि त्यानें आपल्या अंगावर जे अलंकार वगैरे धारण केले होते ते ब्राह्मणांला दान करीन. यावर जशी आपली आज्ञा होईल तसें.'

**पर्वतराजाला चाणक्यानेंच** मुद्दाम मारविलें असून **राक्षसानें** मारविल्याचा जिकडे तिकडे पुकारा केला होता हें पूर्वी सांगितलेंच आहे तेव्हां कोणत्याही रीतीनें लोकांच्या मनांत आपल्याविषयीं संशय येऊं नये, याबद्दल **चाण-**

* **शकुनशास्त्रांत** अनेकप्रकारचे शकुन वर्णन केले आहेत. त्यांत चांगले अथवा वाईट शब्द कानीं पडणें हा एक शकुन मानला आहे. याला उपश्रुति असें म्हणतात. **नहुषाच्या** भयानें **मानस** सरोवरातील कमळाच्या देंठात लपून बसलेल्या **इंद्राचा** शोध लावण्याच्या कामीं प्रयत्न करणाऱ्या **इंद्राणीला** ह्या उपश्रुतीनें मोठें साह्य केल्याचें **महाभारताचें** उद्योगपर्व यांत वर्णन केलें आहे. व ह्या उपश्रुतीला एक देवी मानली आहे आपण कांहीं काम मनांत योजीत असता अकस्मात् अनुकूळ अथवा प्रतिकूल जे शब्द ऐकूं येतील त्यालाच उपश्रुति ह्मणतात, व तिच्यावरून भावी कार्यसिद्धीचें अनुमान करतात.

**क्याचा** सतत प्रयत्न चालला होता. **चंद्रगुप्त**ही मोठा चतुर असून **चाणक्य** काय काय मसलती करीत आहे तें सर्व जाणत होता व त्याच्या इच्छेप्रमाणें वागण्याविषयीं त्याचा सतत प्रयत्न चालला होता. **पर्वतराजा**ची उत्तर-क्रिया करण्याचें जें निमित्त यावेळीं पुढें आलें आहे, तें तरी लोकांच्या डोळ्यांला पाणी लावण्याकरितांच होतें.

आपल्या मनांत जी गोष्ट कर्तव्य होती तीच **चंद्रगुप्ता**-च्याही मनांत आली, हें पाहून **चाणक्याला** फार आनंद झाला. तो मनांत ह्मणाला, शाबास! **चंद्रगुप्ता** शाबास! यावेळीं तूं जी गोष्ट काढलीस ती जणुं काय माझ्या हृदयाशीं मसलत करूनच काढलीस असें वाटतें. **शो-णोत्तरे**ला ह्मणाला, ‘ अग , माझ्या आज्ञेनें **चंद्रगुप्ताला** असें जाऊन सांग कीं, तुझी विनंती मला मनापासून मान्य झाली, व तूं ही गोष्ट मनांत आणलीस हें फार चांगलें केलेंस. यावरून लौकिकांत कसें वागावें हें तूं चांगलें समजतोस, याचा मला फार संतोष वाटतो. आतां, तूं आपल्या मनांत असेल त्याप्रमाणें **पर्वतराजा**ची यथासांग क्रिया करीव. पण त्या **पर्वतराजा**नें अंगावर धारण केलेले बहुमोल अलंकार द्यायचे, ते अशा तशा ब्राह्मणांला देणें मात्र योग्य नाहीं. चांगल्या विद्वान् व गुणी ब्राह्मणांलाच दिले पाहि-जेत; तेव्हां योग्य ब्राह्मणांची परीक्षा करून मी तुझ्याकडे ज्यांना पाठवीन त्यांना ते दे.

**चाणक्या**चा निरोप ऐकून चोपदारीण **शोणोत्तरा** त्या-ची आज्ञा घेऊन परत **चंद्रगुप्ता**कडे गेली.

इकडे **चाणक्य** आपला शिष्य **शार्ङ्गरव** याला हाक

मारून ह्मणाला, 'अरे, **विश्वावसु**, **प्रमिति** आणि **ब्रह्मदत्त** या नांवाच्या तिघां बंधूंना माझ्या आज्ञेनें असा निरोप सांग कीं, तुह्मी राजा **चंद्रगुप्त** याच्या भेटीला जा. तो तुम्हांला बहुमोल एकएक दागिना देईल. ते दागिने घेऊन परत मला भेटून मग घरीं जावें.'

**चाणक्या**नें ब्राह्मणांची निवड आपण केली याचें कारण फार निराळें होतें. हे जे तीन दागिने **चंद्रगुप्ता**कडून त्या ब्राह्मणांला मिळणार आहेत तेच **राक्षसा**ला वश करून घेण्याला मुख्य साधन होणार आहेत. व हेच दागिने, ज्या **मलयकेतू**चा आश्रय करून **राक्षस** राहिला होता त्याच्याशीं त्याचें पुरतें वैर होण्यास कारणीभूत होणार आहेत! असो.

**चाणक्य** पत्राचा मसुदा करीत होता हें वर सांगितलेंच आहे. त्यांतला थोडासा भाग लिहून तो आपल्याशींच ह्मणाला, होहो! हें जें मीं आतां लिहिलें आहे, हें त्या पत्राचें उत्तरार्ध झालें; पण त्याचा पहिला भाग कसा लिहावा हें कांहीं सुचत नाहीं. कांहीं वेळ विचार करून ह्मणाला, बरोबर, आतां माझ्या लक्षांत आलें. आमच्या हेरांनीं **मलयकेतू**च्या सैन्यांत पांच राजपुत्र मुख्य असून ते **राक्षसा**चे परम मित्र आहेत असें कळविलें आहे. **कौलूत** देशाचा राजा **चित्रवर्मा**, तसाच **मलय** देशाचा राजा **सिंहनाद**, **काश्मीर** देशाचा राजा **पुष्कराक्ष**, शत्रूचा बडेजाव नाहींसा करणारा **सिंध**देशचा राजा **सिंधुसेन**, ज्याचे स्वार बहुत आहेत असा **पारसीक** देशाचा राजा **मेघ** हा पांचवा, असे एकंदर हे पांच राजे आहेत. त्या पांचांचींही नांवें लिहितों. खरोखर हे बिचारे पांचही, या

माझ्या पत्रांत त्यांचीं नांवें आलीं कीं, प्रत्यक्ष मृत्यूच्याच मुखांत पडले असें ह्मटलें पाहिजे. मग कदाचित् त्यांचें आयुष्य बाकी असलें तर **चित्रगुप्तानें** त्यांचीं नांवें पुसून टाकलीं तर टाकावीं, वस्तुतः दुसरा कांहीं मार्ग नाहीं!

कांहीं वेळ विचार करून ह्मणाला, मला बरी आठवण झाली. यांचीं नावें लिहितां उपयोगीं नाहीं. हा पत्राचा मसुदा आधीं मोघमच असूं द्यावा. कारण, यांत नांवें लिहिलीं तर, याची नक्कल **शकटदासाच्या** हातून करवून घ्यावयाची आहे, तें काम सिद्धीला जाणार नाहीं. त्याला कदाचित् संशय येईल. याकरितां मोघमच असलेलें बरें. असा विचार करून **चाणक्यानें**, कित्येक मोठमोठ्या पुरुषांचा ज्याच्या योगानें घात होणार, असें तें भयंकर पत्र पुरें केलें आणि तो **शार्ङ्गरवाला** ह्मणाला, '**शार्ङ्गरवा**, बाबा, वैदिक ब्राह्मणांचें अक्षर बहुतकरून चांगलें नसतें. किती जरी त्यांनीं रेखून लिहिलें तरी अक्षर स्पष्ट येत नाहीं. तेव्हां माझ्या आज्ञेनें **सिद्धार्थकाला** जाऊन सांग कीं, हा मसुदा घेऊन **शकटदासा**जवळ जा, आणि त्याच्या कडून याची चांगली प्रत करवून माझ्याकडे घेऊन ये. आणि त्याला ह्मणावें, हें पत्र **चाणक्यानें** लिहविलें आहे, असें त्या **शकटदासाला** कळवूं नको.'

**चाणक्याची** आज्ञा होतांच **शार्ङ्गरव** तो मसुदा घेऊन **सिद्धार्थकाकडे** गेला. इकडे **चाणक्य** आपल्याशींच ह्मणाला, वाहवा! आतां आमचें काम फत्ते झालें! ह्या मसलतीनें **मलयकेतूला** जिंकलाच, यांत कांहीं संशय नाहीं.

शार्ङ्गरवानें तो मसुदा **सिद्धार्थकाजवळ** देऊन त्याला **चाणक्याचा** निरोप सांगितला. या गोष्टीला चार सहा घटका झाल्या नाहींत तेंच, **शकटदासाकडून** त्या पत्राची नक्कल करवून **सिद्धार्थक** तें घेऊन **चाणक्याजवळ** येऊन ह्मणाला, 'महाराज, हा **शकटदासाच्या** हातचा लेख आहे. पाहून घ्यावा.'

**चाणक्यानें** तें पत्र हातांत घेऊन पाहिलें. **शकटदासाचें** अक्षर फारच चांगलें होतें, तें पाहून **चाणक्याला** संतोष झाला. पत्र वाचून पाहून तो **सिद्धार्थकाला** ह्मणाला, 'शाबास! चांगलें काम केलेंस; आतां ही आंगठी घे आणि या पत्रावर मोहोर कर.' असें सांगून **राक्षसाच्या** नांवाची जी आंगठी **निपुणकानें** त्याच्याजवळ आणून दिली होती ती त्याणें **सिद्धार्थकाजवळ** दिली.

याप्रमाणें **चाणक्याची** आज्ञा होतांच **सिद्धार्थकानें** तें पत्र मोहोरबंद करून त्याच्या हातांत देऊन ह्मणाला, 'दुसरी कांहीं आज्ञा असेल तर सांगा.'

**चाणक्य** ह्मणाला, 'अरे, अत्यंत विश्वासु मनुष्यानें करण्याला योग्य, असें एक काम तुला सांगावयाचें आहे.'

हें ऐकून **सिद्धार्थक** आनंदानें म्हणाला, 'महाराज, असें होईल तर तो मजवर मोठा अनुग्रह असें मी समजेन. ह्या दासानें काय सेवा केली पाहिजे तिची आज्ञा व्हावी महाराज.'

**चाणक्य** म्हणाला, 'दुसरें कांहीं नाहीं. आधीं अपराध्याला सुळीं चढविण्याच्या जागीं जा, आणि तेथें सुळावर चढविण्याच्या कामावर नेमलेल्या मांगांला डोळ्यां-

चा इषारा समजून देऊन, त्यांला कांहीं संकेत देऊन ठेव. तो असा कीं, समय येतांच त्यांनीं त्याप्रमाणें वागावें. या पत्राची नक्कल करणारा **शकटदास**, याला मी सुळावर चढविण्याचा हुकुम केला आहे. त्याप्रमाणें आमचे शिपाई त्याला त्या ठिकाणीं घेऊन येतील. आणि त्याला सुळावर चढविण्याची सर्व तयारी होऊन—आतां सुळावर चढविणार, अशा समयीं तूं तेथें जाऊन मांगांला दरडावून भिवीव आणि एकाएकीं भ्याल्यासारखें होऊन तेथून पळून जाण्याचा त्यांला इषारा कर.

ते पळून गेले ह्मणजे **शकटदासा**ला दोन गोष्टी सांगून युक्तीनें **राक्षसा**जवळ तुला आपण पोंहचवितों असें सांगून त्याला तिकडे घेऊन जा. **शकटदास** हा **राक्षसा**चा परममित्र आहे. तूं त्याला प्राणसंकटांतून वांचवून आपल्याला भेटविलास याबद्दल **राक्षस** मोठा उपकारी होईल. तेव्हां त्याच्याकडून कांहींतरी बक्षीस घे, आणि त्याच्याच जवळ कांहीं दिवस चाकरीला रहा. याप्रमाणें व्यवस्था झाली ह्मणजे तुला तेथील सर्व हकीकत समजेल. **राक्षस मलयकेतू**ची उठावणी करून मोठें सैन्य घेऊन आमच्यावर स्वारी करणार आहे. त्या स्वारींत तूंही त्याच्याबरोबर ऐस. त्याचें सैन्य आमच्या शहराच्या जवळ येऊन पोंचलें, ह्मणजे पुढें असें कर. असें बोलून **चाणक्यानें** त्याच्या कानांत कांहीं गोष्ट सांगितली.

याप्रमाणें **चाणक्यानें** त्याला काय सांगावयाचें तें सांगितलें तेव्हां **सिद्धार्थक** हात जोडून—आपल्या आज्ञे-

प्रमाणें सर्व करितों,' असें बोलून त्याची आज्ञा घेऊन तो तेथून निघून गेला.

इकडे **चाणक्य शार्ङ्गरवाला** हाक मारून ह्मणाला, 'अरे, **कालपाशिक** आणि **दंडपाशिक** या दोघां जमादारांना असें सांग कीं, महाराज **चंद्रगुप्त** यांनीं तुम्हांला अशी आज्ञा केली आहे कीं, **जीवसिद्धि** नांवाचा क्षपणक येथें राहतो तो तुम्हांला माहितच असेल. **राक्षसाच्या** सांगण्यावरून त्यानें विषकन्येकरवीं **पर्वतराजाला** मारलें. तर हा जो त्यानें मोठा अपराध केला, त्या अपराधाबद्दल सरकारांतून त्याला देहांत शिक्षा झाली आहे. तर, हाच त्याचा अपराध सर्व शहरभर लोकांना जाहीर करून त्याचे पांच पाट काढून त्याला शहरांतून त्वरित बाहेर घालवून द्यावा.'

याप्रमाणें आज्ञा होतांच **शार्ङ्गरव**—'आज्ञेप्रमाणें करितों' असें सांगून जाऊं लागला, इतक्यांत त्याला पुनः हाक मारून **चाणक्य** ह्मणाला, 'वत्सा **शार्ङ्गरवा**, अंमळ उभा रहा. अरे, त्याला आणखी असें सांग कीं, दुसरा एक अपराधी **शकटदास** नांवाचा कायस्थ, हा **राक्षसाचा** पक्षपाती असून त्याच्या सांगण्यावरून तो नेहमीं आमचा द्वेष करितो व तो केव्हां घात करील याचा कांहीं नेम नाहीं. तर त्यालाही शिक्षा केली पाहिजे. त्याचा हाच अपराध सर्व शहरभर जाहीर करून त्याला सुळावर चढवावा, असें सांग; आणि त्याच्या बायकापोरांला बंदिशाळेंत ठेवावें, असा हुकूम झाला आहे, असेंही त्याला सांग.'

याप्रमाणें **चाणक्यानें** आपली मसलत सिद्ध करून **शार्ङ्गरवाला** तिकडे पाठविलें. त्याची मसलत अर्धीकच्ची

नव्हती, व ती कधीं फसेल, याचा त्याला संशय देखी नव्हता; पण इतकेंही करून राक्षस हातीं येईल नाहीं याची त्याला मोठी काळजीच होती. तो आपल्या ठिकाणीं चिंता करीत असून मनांत ह्मणाला, 'मी इतका हा सर्व प्रयत्न केला आहे, पण हा सफल होऊन **राक्षस** माझ्या हातीं येईल काय?'

**सिद्धार्थक चाणक्याची** आज्ञा घेऊन पुढची तयारी करण्यास गेला होता. नुकतेंच **शकटदासाच्या** हातून ज्या पत्राची नक्कल करवून आणविली होती, तें **सिद्धार्थ-काजवळच** द्यावयाचें होतें, ह्मणून तो जाण्याची तयारी करून परत **चाणक्याकडे** आला, व **चाणक्य, राक्षस** माझ्या हातीं येईल काय, असें आपल्या मनांत ह्मणत आहे तों, **सिद्धार्थक** अकस्मात् येऊन ह्मणाला, 'महाराज, घेतला.'

आपल्या विचाराला अनुकूल असा अकस्मात् निघालेला शब्द ऐकून **चाणक्य** आनंदित होऊन मनांत ह्मणाला, वाहवा! खरोखर या शब्दावरून **राक्षसाला** मी हातांत घेतला असेंच ह्मटलें पाहिजे!

**सिद्धार्थकाला** म्हणाला, 'अरे, तूं घेतला ह्मणतोस तो कोण?'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'आपला निरोप मीं समजून घेतला. तर आतां मी जातों, मला आज्ञा असावी.'

हें ऐकून **चाणक्यानें** मोहोर केलेला लखोटा त्याच्या हातांत देऊन, 'जा तुझी कार्यसिद्धि होवो!' असें ह्मणून त्याला निरोप दिला. लखोटा देते वेळीं पुढें त्याचें काय करावयाचें तें उघड सांगितलें नव्हतें; तरी त्याच्या कानांत

जी कांहीं गोष्ट सांगितली होती ती त्याच्याच संबंधाची होती. ह्मणून **सिद्धार्थक** आणखी कांहीं न बोलतां मुकाट्यानें **चाणक्याला** नमस्कार करून निघून गेला.

**कालपाशिक** आणि **दांडपाशिक** यांना निरोप सांगण्याकरितां **शार्ङ्गरव** गेला होता, तो इतक्यांत परत येऊन **चाणक्याला** ह्मणाला, 'गुरुमहाराज, आपली आज्ञा त्या दोघांनाही कळविली. त्यांनीं, ' महाराज, **चंद्रगुप्ताच्या** हुकुमाप्रमाणें आतांच करितों, असें सांगितलें आहे.'

हें ऐकून **चाणक्य** ह्मणाला, 'फार चांगलें. आतां तूं आणखी एक काम कर. ह्या आपल्या शहरांत **चंदनदास** नांवाचा प्रसिद्ध जवाहिऱ्या आहे, तो तुला माहीतच असेल. मला यावेळीं त्याची भेट घ्यावयाची आहे, तर त्याला लवकर बोलावून घेऊन ये.'

याप्रमाणें गुरुजींची आज्ञा होतांच **शार्ङ्गरव चंदनदासाच्या** घरीं जाऊन त्याला घेऊन आला. **चंदनदास** हा मोठा प्रतिष्ठित सावकार होता, व **नंदाचा** मुख्य प्रधान **राक्षस**, याच्याशीं त्याची विशेष मैत्री असल्याकारणानें त्याचें पूर्वीच्या दरबारांत मोठें वजन होतें. वस्तुतः त्याला असें बोलावणें पाठविणें योग्य नसून त्यानें त्याला मान्यही दिला नसता; पण बिचारा करतो काय! **चाणक्याचा** असा कांहीं दरारा बसला होता कीं, त्याचा हुकूम अमान्य करण्याची तेथें कोणाचीच छाती नव्हती. तेव्हां त्या गरीब **चंदनदासाची** कथा काय!

**शार्ङ्गरवासहवर्तमान** तो जव्हेरी **चाणक्याच्या** घराजवळ येऊन पोंचला. **चाणक्यानें** बोलाविलें आहे, हें ऐकू-

नच त्याच्या छातींत धडकी बसली होती. तो मनांत ह्मणाला, ह्या निर्दय **चाणक्याचें** नांव ऐकलें असतां निरपराधी मनुष्याला देखील मोठी शंका उत्पन्न होते; मग मी तर बोलूनचालून अपराधीच आहें. आतां काय होईल कोणास ठाऊक! एकंदरींत परिणाम चांगला होईल असें वाटत नाहीं. ही पुढची गोष्ट मनांत आणूनच मी **धनसेनादि** आपल्या घरच्या मंडळीला सांगून आलों आहें. मला आपल्या घरीं बसवून घेऊन कदाचित् माझ्या पश्चात् तो आमच्या घराचा झाडा घेईल तर नीट बंदोबस्त ठेवा आणि **राक्षसाचें** कुटुंब आपल्या येथें आहे, तें त्यांच्या हातीं न लागे असें करा, असें मीं त्यांला सांगितलें आहे, कोणत्याही रीतीनें **राक्षसाचें** कुटुंब त्यांच्या हातीं न मिळालें ह्मणजे झालें. माझें तो काय करणार असेल तें खुशाल करो! त्याविषयीं मी मुळींच पर्वा करीत नाहीं.

याप्रमाणें सचिंत झालेला **चंदनदास** हळुहळू **चाणक्याच्या** घराला येऊन पोंचला, व **शार्ङ्गरवानें** त्याला **चाणक्याला** भेटविला. तेव्हां **चंदनदासानें** मोठ्या नम्रतेनें, 'आर्याचा जयजयकार असो!' असें ह्मटलें.

**चंदनदास** आपल्या जवळ आला आहे हें **चाणक्यानें** पाहिलें होतें, तरी मुद्दाम एकीकडे दृष्टि लावून तो आपल्या मनांत कांहीं गहन विचार करीत होता. त्या जव्हाहिऱ्यानें नमस्कार केला, तेव्हां त्याच्याकडे पाहून—'यावें शेटजी, या, हें येथें आसन आहे यावर बसा,' असें ह्मणाला.

हें ऐकून **चंदनदास** नमस्कार करून ह्मणाला, 'नको, नको, आसन कशाला पाहिजे? मनांत अपमान करावया-

ची इच्छा असून बाह्यात्कारीं पुष्कळ आदरसत्कार केला, तर त्यापासून कांहीं संतोष होत नाहीं, ही गोष्ट आपल्याला विदित नसेल असें नाहीं. मी आपला येथें जमिनीवरच बसतों.'

चाणक्य म्हणाला, 'नाहीं नाहीं, तसें कसें होईल? तुमचा असा सत्कार करावयाचा, हें आह्मीं आधींच योजून ठेविलें आहे. तर ह्या आसनावरच तुह्मी बसलें पाहिजे.'

चाणक्यासारखा क्रूर, आणि तो आपला एवढा सत्कार करीत आहे, तेव्हां यांत कांहीं तरी हेतु असला पाहिजे, असें चंदनदासाच्या मनांत आलें. तथापि त्याच्या म्हणण्याप्रमाणें केलें पाहिजे म्हणून तो आसनावर बसला.

परस्परांचा कुशलसमाचार विचारणें झाल्यावर चाणक्य म्हणाला, 'शेटजी, आतांशा तुमचा व्यापारधंदा बरोबर चालला आहे ना? व्यापारांत चांगला नफा होत आहे कीं नाहीं?'

चाणक्याकडून इतकें बहुमानाचें व अगत्याचें भाषण कधीं कोणाच्या कानीं पडेल असें मुळींच व्हायचें नाहीं, असें असून आज त्यानें इतकी साखर पेरली आहे, तेव्हां कांहीं तरी आपल्यावर अरिष्ट येणार, अशी चंदनदासाला शंका आली. तो ह्मणाला, 'आपल्या कृपेनें आमचा व्यापार यथास्थित चालला आहे.'

चाणक्य ह्मणाला, 'बरें पण, शेटजी, चंद्रगुप्ताच्या कारकिर्दीत कांहीं अन्याय घडत असून, तीमुळें पूर्वीच्या राजांच्या कारकिर्दीची लोकांना आठवण तर होत नाहींना?'

**चाणक्या**चा हा प्रश्न मोठा भयंकर होता. कारण, **चंदनदास** हा **चंद्रगुप्ता**च्या विरुद्ध पक्षाचा असून, पूर्वींचे राजे **नंद** यांचा पूर्ण पक्षपाती होता. तो वरचेवर **चंद्रगुप्ताच्या** कारकिर्दीला दोष देऊन **नंदाच्या** कारकिर्दीची तारीफ करीत असल्याचें **चाणक्याच्या** कानावर आलें होतें; ह्मणून त्यानें मुद्दाम त्याला हा प्रश्न केला. तेव्हां **चाणक्या**चा हेतु जाणून, **चंदनदास** घाबरल्यासारखा होऊन, कानावर हात ठेवून ह्मणाला, 'शिवशिव! तसें कोण ह्मणेल? शरदृतूंतल्या रात्रीं उदय पावलेल्या पूर्णचंद्राप्रमाणें आनंद देणाऱ्या महाराज **चंद्रगुप्ता**ला पाहून सर्व प्रजा अधिकच आनंदित होतात.'

बिचारा **चंदनदास** चतुर होता, तरी तें त्याचें बनियाशाही शहाणपण! कारकुनी कावा त्याला मुळींच माहीत नव्हता. त्यानें **चंद्रगुप्ता**च्या कारकिर्दीची जी तारीफ केली, ती केवळ **चाणक्याच्या** संतोषाकरितांच. अंतर्गत हेतु निराळाच होता. पण **चाणक्यानें** तेंच त्याचें वाक्य जमेस धरलें. तो ह्मणाला, 'शेटजी, तुमच्या ह्मणण्याप्रमाणें जर सर्व प्रजा **चंद्रगुप्ता**वर प्रीति करीत आहेत, तर त्या प्रीतीचा राजाला कांहींतरी फायदा होणें अवश्य आहे कीं नाहीं?'

**चंदनदासा**ला याचें उत्तर देणें कठीण पडलें; पण त्या काळाजवळ नाहीं होय कांहींच म्हणतां येत नाहीं, म्हणून तो म्हणाला, 'महाराज, आज्ञा करा. ह्या लोकांपासून काय व किती आपण इच्छितां तें सांगा. जेवढें पाहिजे तेवढें मिळण्यास कांहीं हरकत नाहीं.'

नंदराजाच्या कारकिर्दीत सावकार लोकांकडून वरचेवर मोठमोठाल्या रकमा घेण्याची चाल होती. तेव्हां चाणक्यानें प्रीतीचा फायदा मागितला तो कदाचित् द्रव्यरूपाचा असेल, असें चंदनदासाच्या मनांत आलें होतें. तो त्याचा हेतु समजून, चाणक्य हांसून ह्मणाला, 'शेटजी, हें चंद्रगुप्ताचें राज्य आहे, नंदाचें नव्हे. याची तुम्हांला चांगली आठवण आहेना! नंद द्रव्याचे लोभी होते; म्हणून द्रव्य दिलें ह्मणजे त्यांची बहाल मर्जी होत असे; पण सांप्रतच्या कारकिर्दीत त्याचा कांहींच उपयोग नाहीं. सांप्रतचा तुमचा राजा चंद्रगुप्त, याला तुम्ही सुखासमाधानानें व संतोषानें राहिलां ह्मणजे झालें. तुम्हांला कोणत्याही प्रकारचे क्लेश न व्हावे एवढीच त्याची इच्छा आहे. त्याला द्रव्याची अपेक्षा नाहीं.'

हें ऐकून चंदनदासाला मोठा आनंद झाला. आपल्या वर कांहीं तरी घाला येणार, असें जें त्याच्या मनांत आलें होतें, तें चाणक्याच्या या बोलण्यानें नाहींसें झालें. तो ह्मणाला, 'असें असेल तर आह्मां रयत लोकांवर सरकारचा मोठा अनुग्रहच झाला असें ह्मटलें पाहिजे.'

चाणक्य ह्मणाला, 'शेटजी, तुह्मांला क्लेश होऊं नयेत असें जें मीं म्हटलें, त्याविषयीं तुम्हीं कांहीं प्रश्न केला नाहीं. प्रजाजनांला क्लेश न होण्याचा मार्ग कोणता, हें तुम्ही मला विचारावयाचें होतें.'

चंदनदास ह्मणाला, 'तर मग काय ती आज्ञा करा.'

चाणक्य ह्मणाला, 'थोडक्यांतच सांगतों. लोकांनीं राजाच्या विरुद्ध वागूं नये ह्मणजे झालें. राजाला प्रजेच्या प्रीतीचा बदला पाहिजे तो हाच.'

**चंदनदास** ह्मणाला, 'महाराज, असें काय ह्मणतां? राजाच्या विरुद्ध वागणारा असा कोण दुष्ट मनुष्य आपल्या लक्षांत येतो?'

**चाणक्य** ह्मणाला. 'दुसरे तिसरे कशाला? त्यांपैकीं पहिले तुह्मीच एक आहां, असें ह्मटलें तरी चालेल.'

हें ऐकून **चंदनदास** घामाघूम होऊन त्यानें कानांवर हात ठेविले. तो ह्मणाला, 'शिवशिव ! या गोष्टीचा संभव देखील नाहीं. गवताचा अग्नीबरोबर विरोध तो कसला !

**चाणक्य** ह्मणाला, 'होहो, नाहीं कसा? तूं कसा विरोध करतोस तें सांगतों. **राक्षस** हा राजाचा अपराधी आहे हें तुला ठाऊक आहेना ? असें असून तूं अद्यापि त्याच्या कुटुंबाला आपल्या घरीं बाळगलें आहेस, तेव्हां तूं विरोधी नव्हेस तर कोण? '

**चंदनदास** घाबरा होऊन ह्मणाला, 'महाराज, हें तुह्मांला कोणीं अजाणत्या मनुष्यानें अगदीं खोटें वर्तमान सांगितलें असेल.'

**चाणक्य** ह्मणाला, 'शेटजी, याविषयीं शंका घेऊं नका. हा संप्रदायच आहे. राज्यक्रांति झाली ह्मणजे पहिल्या राजाचे आप्तसंबंधी वगैरे लोक—त्यांच्या मनांत नसलें तरी—आपल्या स्नेह्यांच्या येथें आपलीं मुलेंमाणसें ठेवून, देशांतराला जातात ही नेहमींचीच रीत आहे. आणि अशा गोष्टी झाल्या ह्मणजे त्यापासून केव्हां केव्हां मोठे अनर्थ होतात.'

**चंदनदास** ह्मणाला, 'आपण ह्मणतां तसें करीत असतील; पण तें मला ठाऊक नाहीं. अमात्य **राक्षसाचें**

कुटुंब त्यावेळीं (राज्यक्रांतीच्या वेळीं) आमच्या येथें होतें;—'

**चाणक्य** ह्मणाला, 'तुमच्या बोलण्यांत कांहीं ताळ नाहीं. आधीं तुह्मीं ती गोष्ट खोटी म्हणालां, आणि आतां म्हणतां कीं, **राक्षसाचें** कुटुंब आमच्या येथें होतें तेव्हां ह्या दोन्ही वाक्यांचा परस्पर विरोध येत नाहीं काय?'

**चंदनदास** म्हणाला, 'एवढेंच कायतें. माझ्या बोलण्यांत कपट आहे असें आपणांला वाटतें ना?'

हें ऐकून **चाणक्य** ह्मणाला, '**चंद्रगुप्त** राजा असतां कपटाचें नांव देखील घेऊं नका. मुकाट्यानें **राक्षसाचें** कुटुंब आमचे हवालीं करा आणि आपण निष्कपटी व्हा कसे!'

**चंदनदास** पुन्हा मोठ्या नम्रतेनें ह्मणाला, 'महाराज, अशी काय आज्ञा करतां बरें! **राक्षसाचें** कुटुंब आमचे घरीं होतें; पण—'

**चाणक्य** ह्मणाला, 'बरें, तसें कां होईना? तुमच्या घरीं होतें, तर तें सांप्रत कोठें गेलें?'

**चंदनदास** ह्मणाला, 'मला काय ठाऊक?'

हें ऐकून **चाणक्य** हंसून म्हणाला, 'हं हं, तुह्मांला ठाऊक नाहीं काय? तें कसें ठाऊक नसेल बरें? शेटजी, नीट विचार करा. भय तर तुमच्या अगदीं मस्तकावर येऊन बसलें आहे, आणि अशा उडवाउडवीनें त्यापासून तुमची सुटका होईल ही गोष्ट मनांत देखील आणूं नका.'

हें ऐकून **चंदनदास** मनांत ह्मणाला 'मस्तकावर मेघां-

चा कडकडाट होतो आहे, आणि प्रिय मनुष्य* तर दूरच राहिलें, तेव्हां हें काय संकट प्राप्त झालें ! विषाचा परिहार करणाऱ्या औषधि राहिल्या दूर हिमाचलावर, आणि सर्प† येऊन बसला आहे डोक्यावर, अशा प्रकारची यावेळीं माझी अवस्था झाली आहे.'

चाणक्य पुन्हा डोळे वटारून ह्मणाला, 'आणखी दुसरें असें आहे कीं, विष्णुगुप्तानें (आपण) जसा नंदाचा उच्छेद केला, तसाच राक्षस चंद्रगुप्ताचा उच्छेद करील असें समजूं नकोस हं. दुसरें असें पहा, मोठे पराक्रमी, तसेच नीतिकुशल असे वक्रनासादि प्रधान यत्न करीत असून राजा नंद जिवंत असतांही, जी राज्यलक्ष्मी त्यांच्यानें स्थिर करवली नाहीं, व जिचे तुकडे तुकडे झाले, ती सर्व आज एकवटून चंद्रिकेसारखी सर्व जगाला प्रकाश करणारी चंद्रगुप्तराजापासून निराळी करण्याला कोण समर्थ होणार आहे ? शेटजी, फार काय सांगावें ! हत्तीच्या गंडस्थलाचा आस्वाद घेतल्यामुळें संध्याकाळच्या चंद्राच्या कांतीसारखी आरक्त दिसणारी, व सहज जांभई देत असतां उघडलेल्या मुखांतून बाहेर स्फुरण पावणारी, अशी सिं-

* हें वाक्य अंमळ गूढ आहे. प्रियविरहित असलेल्या स्त्रीला मेघगर्जना फारच असह्य होऊन तिला आपल्यावर हें एक मोठें अरिष्टच कोसळलें, असें वाटतें. त्या अरिष्टाचा परिहार प्रियजनाच्या दर्शनावांचून होत नाहीं. प्रकृतस्थळीं चंदनदास हाच कोणी एक विरहिणी स्त्री, चाणक्याची आज्ञा ही मेघगर्जना व राक्षस हा प्रियजन असें घ्यावें. चाणक्याच्या आज्ञारूप मेघगर्जनेपासून ओढवणारें अरिष्ट राक्षसरूपी प्रियजनाच्या दर्शनानें निवृत्त झालें असतें; पण तो दूर राहिल्यामुळें निरुपाय झाला, असा अभिप्राय.

† या वाक्यांतही औषधि ह्मणजे राक्षस व सर्प ह्मणजे चाणक्य असें

हाची दाढ उपटून काढण्याचा प्रयत्न करण्याला यावेळीं कोणरे बाबा तयार झाला आहे!'

**चंदनदास** हाही, जुनापुराणा व अनेक राजकीय घालमेली पाहिलेला, मनुष्य होता. **चाणक्यानें** मोठ्या ताठ्याचें भाषण केलें तें त्याला सहन झालें नाहीं. तो मनांत ह्मणाला, याची ही बडबड अगदीं असह्य आहे; पण एका अर्थी पाहिलें तर, दुर्दैवानें, हा ह्मणतो त्याप्रमाणें, गोष्टी झाल्या आहेत खऱ्या. तेव्हां याची ही गर्जना यावेळीं आपल्याला ऐकून घेतली पाहिजे.

**चंदनदासाशीं चाणक्याचें** याप्रमाणें बोलणें चाललें आहे तोंच, **कालपाशिक** आणि **दंडपाशिक** यांनीं, **जीवसिद्धि** नांवाच्या क्षपणकाला **चाणक्याच्या** आज्ञेप्रमाणें मुसक्या बांधून शहरभर फिरविण्यास बाहेर काढलें. **जीवसिद्धि** हा कोण होता, हें वाचकांस ठाऊक असेलच. हा **चाणक्याचा** परम मित्र **इंदुशर्मा** नांवाचा जो ब्राह्मण होता, तोच होय. **चाणक्याच्या** सांगण्यावरून तो मुद्दाम **राक्षसाच्या** पक्षाला अनुसरून त्याच्या तर्फेनें लोकांची उठावणी करण्याचा प्रयत्न करीत होता. पण हें सर्व त्याचें कृत्य बाह्यात्कारी होतें. **चंद्रगुप्ताच्या** व **चाणक्याच्या** विरुद्ध मसलती केल्यानें **राक्षसाच्या** पक्षाची मंडळी त्याच्यावर अधिक विश्वास ठेवीत होती, व त्या निमित्तानें त्याला अंतर्गत भेद कळून येत असत; व ती सर्व हकीकत तो वरचेवर **चाणक्याला** कळवीत असे. सांप्रत **चाणक्यानें** त्याला शहरांतून हाकून देण्याचा हुकूम दिला, त्यांत तरी विशेष प्रकारचा कांहीं मतलब आहे, व तो पुढें योग्यवेळीं व्यक्त होईल.

जीवसिद्धि हा विशेष लोकप्रिय झाला असल्याकारणानें, त्याच्या मुसक्या बांधून त्याला शहरांतून हाकून देत आहेत हें पाहून, जिकडे तिकडे मोठी गडबड उडाली. शेंकडो मनुष्य त्याच्याबरोबर आरडत ओरडत निघाले. तो गलबला ऐकून चाणक्य घाबरल्यासारखा होऊन, त्यानें शार्ङ्गरवाला, हें काय आहे तें, पाहून ये असें सांगितलें. शार्ङ्गरव बाहेर जाऊन पुनः आंत येऊन ह्मणाला, 'गुरुमहाराज, चंद्रगुप्ताच्या आज्ञेनें राजद्रोह करणारा क्षपणक जीवसिद्धि याचे पांच पाट काढून त्याला शहरांतुन हाकून देत आहेत; दुसरें कांहीं नाहीं.'

चाणक्याला सर्व माहीतच होतें, पण चंदनदासाला दहशत बसण्याकरितां जणुं काय आपल्याला त्यांतील कांहींच माहीत नाहीं असें दाखवून तो ह्मणाला, 'अरेरे! क्षपणका, तुझी आणि अशी अवस्था व्हावी काय? बरें बरें, राजद्रोहाचें फळ कसें असतें त्याचा तुला चांगला अनुभव येऊं दे.' इकडे चंदनदासाला ह्मणाला, 'अहो शेटजी, पाहिलेंतना? हा राजा चंद्रगुप्त असा मोठा कठोर आहे. त्याचा अपराध करणारे जे कोणी असतील त्यांना तो अशी जबर शिक्षा करतो. मी तुमच्या हिताची गोष्ट सांगतों. मित्राचें सांगणें अवश्य ऐका, आणि मुकाट्यानें राक्षसाचें कुटुंब माझ्या हवालीं करा. असें केलेंत ह्मणजे चिरकालपर्यंत तुमच्यावर राजाची मेहरबानी होऊन सुखाचा अनुभव घ्याल.'

चंदनदास हा मोठा दृढनिश्चयी मनुष्य होता, व राक्षसाशीं त्याची विशेष मैत्री होती. चाणक्यानें त्याला अशी दहशत घातली तरी तो मुळींच घाबरला नाहीं

तो ह्मणाला, 'राक्षसाचें कुटुंब माझ्या घरीं मुळींच नाहीं; तें मी देऊं कोठून!'

**जीवसिद्धि** हा **राक्षसाच्या** पक्षाचा आहे, असें **चंदनदास** समजत होता. तेव्हां त्याची शहरांतून धिंड काढून त्याला हाकलून दिलें हें पाहून **चंदनदासाला** खेद होऊन, त्याच्यावर दहशत बसेल असें **चाणक्याला** वाटलें होतें, ह्मणूनच त्यानें अशी कांहीं योजना करून ठेविली होती कीं, आपण **चंदनदासाशीं** अशा गोष्टी करीत असतां **जीवसिद्धीला** हांकलून दिल्याचें वर्तमान त्याला समजावें. तथापि त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं.

**जीवसिद्धीची** धिंड निघाली, इतक्यांत **शकटदासाविषयीं** जो **चाणक्यानें** हुकूम केला होता, तो अमलांत आणण्याची तयारी झाली. **शकटदास** हा त्या दरबारांतला **नंदाच्या** वेळचा मुख्य चिटणीस होता. अर्थात् तो मोठा कामदार असल्यामुळें पुष्कळ लोकांशीं त्याचा स्नेहसंबंध होता. **चाणक्याच्या** हुकुमावरून **कालपाशिक** आणि **दंडपाशिक** या दोघांनीं त्याच्या मुसक्या बांधून, सुळावर देण्याच्या ठिकाणाकडे ते त्याला घेऊन जाऊं लागले. यामुळें त्याच्या बरोबरही पुष्कळ लोकांचा घोळका निघाला. पुनः गलबल झालेली ऐकून **चाणक्यानें**, हें काय आहे तें पाहून येण्याविषयीं सांगितल्यावरून **शार्ङ्गरव** बाहेर जाऊन पुन्हा आंत येऊन ह्मणाला, 'गुरुमहाराज, राजद्रोह करणारा तो **शकटदास** नांवाचा कायस्थ, त्याला सुळावर चढविण्याकरितां नेत आहेत. त्याचा हा गलबला आहे.'

**चाणक्य** ह्मणाला, 'असें काय! ठीक आहे. आपल्या वाईट कर्माचें फळ त्याला चांगलें अनुभवूं दे.' पुनः **चंदनदासाला** ह्मणाला, 'शेटजी, हा राजा **चंद्रगुप्त** आपला अपराध करणाऱ्याच्या संबंधानें किती कडक आहे हें तुह्मांला समजलें ना? तुह्मी **राक्षसाच्या** कुटुंबाला छपवून ठेविलें ही गोष्ट तो कधींही सहन करणार नाहीं, तेव्हां दुसऱ्याची बायको देऊन आपल्या बायकोचें रक्षण करा व प्राणही वांचवा.'

**चंदनदास** ह्मणाला, 'महाराज, मला काय आपण भय दाखवितां? **राक्षसाचें** कुटुंब माझ्या घरीं असेल तर मी देऊं, का नसलें तरी देखील दिलें पाहिजे? राजा उग्र शासन करणार, तो अपराध्याला करील, कीं निरपराध्याला करील?'

**चाणक्य** ह्मणाला, '**चंदनदासा,** अद्याप विचार कर. तूं ह्मणतोस त्याप्रमाणें खरोखरच तुझा निश्चय आहे?'

**चंदनदास** ह्मणाला, 'होहो, खरेंच. माझा हा पक्का निश्चय आहे.'

**चाणक्याला**, युक्तिप्रयुक्तीनें **राक्षसाचें** कुटुंब **चंदनदास** आपल्या हस्तगत करतो किंवा नाहीं, हें पहावयाचें होतें. त्याला मारावें किंवा दुसरें कांहीं करावें, असा त्याचा मुळींच इरादा नव्हता. तथापि बाह्यात्कारें त्यानें जें भाषण केलें, त्यावरून **चंदनदासावर** कांहींतरी भयंकर प्रसंग येणार, हें अगदीं उघड दिसत होतें. असें असूनही **चंदनदासानें** दृढ निश्चय दाखविला हें पाहून **चाणक्याला** मनापासून फार आनंद झाला. तो मनांत ह्मणाला, बास

चंदनदासा, तुझी धन्य आहे! दुसऱ्याची वस्तु (बायको) समर्पण केली असतां, तीपासून सहज मोठा लाभ होणार, व ती न समर्पण केल्यास प्राणांतिक संकट येणार, अशा प्रसंगीं ती वस्तु न देतां, आपले प्राण संकटांत पडले तरी चिंता नाहीं, असें ह्मणणारा एका *शिबिराजावांचून दुसरा कोण आहे? चंदनदासाला ह्मणाला, 'शेटजी, पुनः विचार करा. हा तुमचा निश्चयच आहे?'

चंदनदास ह्मणाला, 'होहो, वरचेवर काय सांगावें?'

हें ऐकून डोळे लाल करून चाणक्य म्हणाला, 'दुष्ट वाणगटा, थांब, राजाचा राग कसा असतो याचा अनुभव घे.'

चंदनदास म्हणाला, 'होहो, त्याविषयीं मी तयारच आहें. तुमच्या अधिकारांत जेवढी कांहीं शिक्षा द्यावयाची असेल तेवढी खुशाल द्या.'

हें ऐकून चाणक्य शार्ङ्गरवाला हांक मारून म्हणाला, 'अरे, माझ्या आज्ञेनें कालपाशिक आणि दंडपाशिक

---

* उशीनर नांवाच्या देशांत शिबिनामक प्रसिद्ध राजा होता. तो मोठा उदार व दयाळू आहे अशी चहूंकडे विशेष प्रसिद्धि होती. एके दिवशीं त्याची परीक्षा पाहण्याकरितां कवडा आणि ससाणा यांचीं रूपें धारण करून अनुक्रमें अग्नि व इंद्र त्याच्याजवळ प्राप्त झाले. कवडा हें ससाण्याचें भक्ष्य असल्यामुळें तो त्याच्यावर झडप घालण्यास तयार झाला असून कवडा भयभीत होऊन शिबिराजाच्या मांडीवर येऊन बसला. ससाण्यानें तें आपलें भक्ष्य देण्याविषयीं राजाची पुष्कळ प्रार्थना केली, पण राजानें तें दिलें नाहीं. शेवटीं त्या कवड्याबद्दल पाहिजे तें देण्यास तयार झाला असतांही ससाण्यानें तें कबूल केलें नाहीं, व कवड्याच्या भारंभार आपल्या अंगाचें मांस देशील तर आपण राजी होईन, असें सांगितल्यावरून राजानें आपलें मांस काढून दिलें! त्याचें तें सत्त्व पाहून इंद्र व अग्नि फार संतुष्ट होऊन त्याला वरदान देते झाले, अशी कथा महाभारत आदिपर्वांत सांगितली आहे.

यांना सांग कीं, ह्या दुष्ट वाण्याला लवकर योग्य शिक्षा द्या. अथवा, इतक्यांत कशाला? तूर्त असूं दे. **दुर्गपालक** आणि **विजयपालक** यांना सांग कीं, याचें सारें घरदार लुटून पोराबाळांसहवर्तमान याला सक्त कैदेंत ठेवा. मी **चंद्रगुप्ता**ला याच्या संबंधानें काय सांगावयाचें तें सांगेन. आणि मग तोच ह्याला प्राणांतिक शिक्षा देण्याविषयीं हुकूम करील.'

गुरुजींची आज्ञा ऐकून **शार्ङ्गरव चंदनदासाला** ह्मणाला, 'शेटजी, चला. असे इकडून या.'

हें ऐकून **चंदनदास** तत्काळ उठला, आणि **चाणक्या**ला येतों म्हणून सांगून, **शार्ङ्गरवाबरोबर** निघाला. यावेळीं त्याचा सर्वस्वीं नाश होण्याचा प्रसंग आला होता, तरी त्याला त्याबद्दल फारसें वाईट वाटलें नाहीं. आपल्या स्वतःच्या अन्यायाबद्दल आपल्याला शिक्षा झालेली नसून मित्राच्या कार्याकरितां झाली आहे, याबद्दल त्याला एके प्रकारें समाधानच वाटलें.

**चंदनदास** निघून गेल्यावर **चाणक्य** आनंदित होऊन आपल्याशींच ह्मणाला, होहो, आतां मात्र खरोखरच **राक्षस** माझ्या हातीं आला. कारण, हा **चंदनदास** त्याचा अत्यंत प्रियमित्र आहे. **राक्षसा**करितां त्याच्या आपत्कालीं जसा हा प्राणत्याग करण्याविषयीं तयार झाला आहे, तसाच त्याचे प्राण गेले असें समजून, **राक्षसा**लाही आपण जिवंत रहावें असें वाटणार नाहीं.

**शकटदासाला** सुळावर चढविण्याविषयीं हुकूम झाला असून **सिद्धार्थका**ला आंतून काय सूचना झाली होती तें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें सर्व तयारी करून **सिद्धार्थ**-

**कानें शकटदासाला** तेथून पळवून नेलें, यामुळें बरीच गडबड उडाली. **शार्ङ्गरवानें** हें वर्तमान **चाणक्याला** सांगितलें, तेव्हां **चाणक्य** मनांत म्हणाला, शाबास **सिद्धार्थका**, मी योजलेल्या कामाला आज तूं आरंभ केलास.

**शकटदासाला** पळवून नेऊन **राक्षसाकडे** पोंहचवावा असें **चाणक्यानें सिद्धार्थकाला** सांगितलेंच होतें; पण ही गोष्ट त्याला प्रसिद्ध करावयाची नव्हती. बाह्यात्कारें त्याचा हुकूम निराळ्याच प्रकारचा होता. त्याप्रमाणें **शार्ङ्गरवानें**, **शकटदासाला सिद्धार्थकानें** पळवून नेलें, हें वर्तमान सांगतांच तो आपल्याला राग आल्यासारखें दाखवून ह्मणाला, 'एकूण आमच्या हातावर तुरी देऊन **शकटदास** पळालाना! ते **कालपाशिक** आणि **दंडपाशिक** यांच्या सुस्तीमुळें असें झालें असावें. बरें, वत्सा **शार्ङ्गरवा**, लवकर जाऊन त्या **भागुरायणाला** सांग कीं, तूं होईल त्या रीतीनें **शकटदासाला** पकडून आणण्याची तजवीज कर.'

हें ऐकून **शार्ङ्गरव भागुरायणाला चाणक्याचा** हुकूम कळवावयास गेला, तों **भागुरायणही** पळून गेल्याचें त्याला समजलें. तेव्हां दुःखित होऊन परत येऊन त्यानें तें वर्तमान **चाणक्याला** कळविलें.

**भागुरायण** पळाला, तो देखील **चाणक्याच्या** सांगण्यावरूनच. **शार्ङ्गरवानें** तो गेला हें वर्तमान सांगतांच, **चाणक्य** मनांत ह्मणाला, जाऊं दे, खुशाल जाऊन कार्यसिद्धि करून येऊं दे. बाह्यात्कारें राग आल्यासारखें दाखवून **शार्ङ्गरवाला** ह्मणाला, 'वत्सा **शार्ङ्गरवा**, पहातोस काय ! माझ्या आज्ञेनें **भद्रभट**, **पुरुषदत्त**, **डिंगरात**, **बलगुप्त**, **राजसेन**, **रोहिताक्ष** आणि **विजयवर्मा** यांना सांग कीं,

लवकर पाठलाग करून त्या दुष्ट **भागुरायणाला** पकडून माझ्या समोर घेऊन या.'

बिचाऱ्या भोळ्या **शार्ङ्गरवाला** ह्या कारस्थानी गुरुजींचें कृत्य काय माहीत! तो त्याची आज्ञा होतांच **भद्रभट** इत्यादिकांना त्याचा हुकूम सांगण्यास गेला, आणि शोध करून पहातो तों तेही गेले असें समजलें. तेव्हां घाबरा होऊन परत गुरुजीजवळ येऊन ह्मणाला, 'छे! सारेंच विपरीत झालें आहे. आपण सांगितलेले ते **भद्रभट** इत्यादिकही आज पहाटेसच पळून गेले!'

हें ऐकून **चाणक्याला** मनापासून आनंद झाला. तो मनांत ह्मणाला, जाऊंदेत. त्यांचा मार्ग त्यांना सुखकर होवो! **शार्ङ्गरवाला** म्हणाला, 'वत्सा, एकूण ते सारे पळून गेलेना? जाऊंदेत बेटे. त्यांच्याबद्दल विषाद बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. असें पहा, जे मनांत कांहीं हेतु धरून गेले असतील ते खुशाल जावोत. आतां जे बाकी राहिले असतील तेही जाण्याविषयीं कडेकोट तयारी करणार तर करोत बापडे. शेंकडों शूर सरदारांपेक्षांही अधिक बळकट व **नंदा**चा उच्छेद केल्यानें जिचा महिमा सर्व लोकांला विदित झाला आहे, अशी माझी बुद्धि गेली नाहीं ह्मणजे बस्स आहे! दुसऱ्या कोणाचीही मला जरूर नाहीं.'

आसनावरून उठून आकाशाकडे दृष्टि लावून ह्मणाला, 'त्या दुष्ट **भद्रभट** इत्यादिकांना मी आतां परत आणवितों.' मनांत ह्मणाला, दुरात्म्या **राक्षसा**! आतां कोठें जाशील बरें! लवकरच—आपल्या इच्छेप्रमाणें संचार करणारा, व ज्याची दान (मद) शक्ति मोठी उज्ज्वल आहे, असा मदोन्मत्त होऊन स्वैर फिरणाऱ्या जंगली हत्तीप्रमाणें, उ-

न्मत्त झालेला जो तूं त्या तुला आपल्या बुद्धीच्या योगानें मीं जखडून टाकून **चंद्रगुप्ता**करितां मी तुझ्या पायांला फांस लावीन यांत कांहीं संशय नाहीं.

**चाणक्यानें**, ज्या **मलयकेतू**चा **राक्षसानें** आश्रय केला होता, त्याचें सर्व सैन्य नाहींसें करून, **राक्षसाला** अगदीं गोगलगाईसारखा करून आपलें म्हणणें त्याच्याकडून कबूल करवावें, असा विचार केला होता. या कामीं आपले विश्वासू मनुष्य **मलयकेतु** व **राक्षस** यांच्याजवळ त्याला ठेवावयाचे होते. **कुसुमपुरांत** राहणाऱ्या आपल्या पक्षाच्या लोकांवर **राक्षस** बहुतकरून विश्वास ठेवण्यास संशय घेणार नाहीं, ह्मणून त्यानें ही मुद्दाम मसलत केली होती. वर सांगितलेल्या मंडळींत **शकटदास** मात्र **चाणक्या**चा मनापासून द्वेष करणारा होता. बाकी, **सिद्धार्थक**, **जीवसिद्धि**, **भागुरायण**, **भद्रभट** इत्यादि मंडळी **चाणक्याची** पूर्ण पक्षपाती असून, ते त्याच्या कामाकरितांच झटत होते. तरी बाह्यात्कारें **चंद्रगुप्ताच्या** विरुद्ध बडबड करावयाची व त्याच्या विरुद्ध नेहमीं कांहीं मसलती करावयाच्या, असा त्यांनीं क्रम चालविला होता. यामुळें अर्थात् ते **राक्षसाच्या** पक्षाचे आहेत असें जिकडे तिकडे प्रसिद्ध झालें होतें.

**राक्षसाच्या** पक्षाचे जे कोणी असतील त्यांना आतां **कुसुमपुरांत** राहणें हें मोठें धोक्याचें आहे असें, **शकटदासा**ला सुळावर देण्याचा हुकूम दिला यावरून, सर्व लोकांस माहीत झालें. व हेंच निमित्त करून, आह्मांस रक्षण करणारा तिकडे कोणी नाहीं असें सांगायाला लावून **भद्रभटादिकांना** **चाणक्यानें** पळवून लावलें. तेव्हां अर्थात् ते **राक्षसाच्या** विश्वासाला पात्र झाले! हा प्रकार पुढें येईलच.

# भाग दुसरा.

कुसुमपुरांत काय काय मसलती चालल्या आहेत तें समजून घेण्याकरितां राक्षसानें विराधगुप्त नांवाचा एक आपला विश्वासू हेर तिकडे पाठविला होता. तो कुसुमपुरांत जाऊन तिकडील हकीकत समजून घेऊन परत राक्षसाकडे आला. आपली कोणाला ओळख पटूं नये, ह्मणून त्यानें गारुड्याचा वेष घेतला होता. दोहोंकडे दोन वेळूचे करंडे शिक्यांत घालून ती कावड त्यानें आपल्या खांद्यावर घेतली होती. सर्वांगाला राख लावली असून कंबरेला कांचा गुंडाळला होता, व डोक्याला एक भगवी चिंधी बांधली होती. हातांत पुंगी व हाडें घेतलीं होतीं. या प्रकारचा सर्प खेळवून पोट भरणाऱ्यांचा वेष घेऊन तो फिरत फिरत राक्षसाच्या घराजवळ आला. तो आपल्याशींच ह्मणाला, जे तंत्राची युक्ति जाणून यथास्थित मंडल लिहितात, व जे आपला मंत्र गुप्त राखतात, ते सर्पराजाची सेवा योग्य प्रकारें करूं *जाणतात.

विराधगुप्त राक्षसाच्या घराजवळ येत आहे इतक्यांत त्याला वाटेंत एक गृहस्थ भेटला. त्याला याचा विचित्र वेष पाहून मोठें कौतुक वाटल्यावरून, तूं कोण ह्मणून त्यानें त्याला विचारलें.

विराधगुप्त ह्मणाला, 'भल्या गृहस्था, मी सर्प खेळविणारा गारुडी आहें. माझें नांव जीर्णविष.' कसलेंही जलाल

*या वाक्यातील तंत्र, मंडल आणि मंत्र या शब्दांत श्लेष आहे. विराधगुप्तानें साप खेळविणाऱ्याचें सोंग घेतलें होतें त्याला अनुसरून अर्थ करावयाचा तो वर दिलाच आहे. पण हेंच वाक्य राजाकडेही लागतें. • तंत्र म्हणजे राजाचे कामदार वगैरे लोक, मंडल म्हणजे राज्य, मंत्र म्हणजे मसलत हिचें योग्य रक्षण झालें असतां राजाचें रक्षण होतें, असा अभिप्राय.

विष असलें तरी त्याचा वेग मी जिरवितों, ह्मणून लोकांनीं माझें हें नांव ठेविलें आहे.'

तो गृहस्थ ह्मणाला, 'माझीही सर्पाशीं खेळण्याची इच्छा आहे.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'तर मग तुह्मी येथें कोणता धंदा करीत असतां?'

गृहस्थ ह्मणाला, 'मी राजदरबारांत चाकरी करीत असतों.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'तर मग तुह्मी सर्पाशीं खेळतच आहां!'

गृहस्थ ह्मणाला, 'तें कसें!'

**विराधगुप्त** म्हणाला, 'अहो, असें सांगतात कीं, विषारी मणि, मंत्र, औषधि इत्यादिकांत कुशल असणारा, सर्पांना खेळविणारा, उन्मत्त हत्तीवर बसणारा, राजदरबारांत सेवा करणारा, आणि लढाईंत आपल्याला जय मिळाला म्हणून बेफाम वागणारा; हे कधींना कधीं तरी नाश पावल्यावांचून रहात नाहींत.'

तो गृहस्थ ह्मणाला, 'बरें, पण तुझ्या या पेटाऱ्यांत काय काय जिनसा आहेत!'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'माझें पोट भरण्याचें साधन सर्प, तसेंच कांहीं विषापहारी औषधें, हीं यांत भरलीं आहेत. दुसरें कांहीं नाहीं.'

गृहस्थ ह्मणाला, 'तर मग तीं पहावीं अशी माझी इच्छा आहे.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'तें खरें; पण तीं दाखविण्यासारखी ही जागा नाहीं, हा जवळच मोठा वाडा दिसतो आहे, तेथें चला ह्मणजे दाखवितों.'

गृहस्थ ह्मणाला, 'अरे बापरे! तें घर कोणाचें तें समजलास का? तें अमात्य **राक्षसाचें** घर. तेथें आमच्या सारख्याचा प्रवेश देखील होणें कठीण.'

हे ऐकून **विराधगुप्त** ह्मणाला, 'तर मग तुह्मी आपले आल्या वाटेनें खुशाल जा. मी घरोघर भिक्षा मागणारा असल्यामुळें मला ह्या वाड्यांत जाण्याला कांहीं अटकाव होणार नाहीं.'

**विराधगुप्ताचें** हें वाक्य ऐकून तो गृहस्थ तडक पुढें चालता झाला. इकडे **विराधगुप्तही** तोंडानें कांहीं म्हणत ह्मणत, **राक्षसाच्या** वाड्याच्या दरवाज्यांत आला, आणि मनांत म्हणाला, पुढें काय होईल कोणास ठाऊक! **चंद्रगुप्त** आर्य **चाणक्याच्या** मसलतीनें वागतो आहे हें पाहून मला आमचे प्रधान **राक्षस** यांचा प्रयत्न अगदीं व्यर्थ आहे असें वाटतें. आणि इकडे **राक्षसाच्या** सल्लामसलतीनें वागणाऱ्या **मलयकेतू**कडे पाहिलें ह्मणजे, **चंद्रगुप्त** सार्वभौम पदवीपासून चळला असेंच वाटतें. यामुळें एकंदरींत कांहीं निश्चय करितां येत नाहीं. **चाणक्याची** बुद्धि हीच कोणी एक दोरी तिनें जिचें अंग घट्ट बांधलें आहे अशी, मौर्य राजा **चंद्रगुप्त**, याची लक्ष्मी एक वेळ स्थिर आहे असें वाटतें. पण पुनः उपायरूपी हातांनीं **राक्षसानें** तिला ओढून घेतलें आहे असेंही वाटतें. एकंदरींत ह्या दोघां बुद्धिशाली उत्तम प्रधानांचा विरोध पडल्यामुळें **नंदाची** कुलपरंपरा गत राज्यलक्ष्मी संशयांत पडली आहे यांत कांहीं संशय नाहीं. कारण, परस्परांचा विरोध करणारे हे **राक्षस** आणि **चाणक्यरूपी** दोघे मदोन्मत्त जंगली हत्ती लढत असून, या दोघांच्या मध्यें भयभीत झालेल्या हत्तिणीसारखी ती राजलक्ष्मी खिन्न होत आहे. असो. ते

दोघेही समर्थच आहेत. कोणाची सरशी होईल तें पुढें दृष्टीस पडेलच. आपण आपला धनी **राक्षस** याची भेट घेऊन त्यानें सांगितलेल्या कामाचें काय झालें तें त्याला कळवावें म्हणजे झालें. असा विचार करून **विराधगुप्त** आंत आला.

यावेळीं **राक्षस** एका मऊ हजाम्यावर चिंताक्रांत होऊन बसला होता. त्याच्याजवळ एक हुजऱ्या मात्र उभा होता. **राक्षसाला** किती दुःखें प्राप्त झालीं होतीं, व चिंतेनें त्याचें अंतःकरण किती व्यग्र झालें होतें, याचें वर्णन देखील करतां येत नाहीं. तो आपले यजमान **नंद** यांचें स्मरण करून डोळ्यांत अश्रु आणून ह्मणाला, हाय हाय! यापरतें आणखी दुःख तें कोणतें ! न्याय, पराक्रम, उत्तम गुण यांच्या योगानें शत्रूचा समूळ उच्छेद करून सर्वांला अजिंक्य झालेले **यादव** जसे आपल्या कृतीनें नाश पावले, तसें **नंदाचें** एवढें मोठें कुल निर्दय दैवानें नाहींसें करून टाकल्यामुळें रात्रंदिवस चिंता आणि शोक यांनीं व्याकुळ होऊन मी आपल्या धन्याच्या शत्रूचा सूड उगविण्याचा प्रयत्न करीत आहें. परंतु त्याचा काय उपयोग! त्यांच्यापैकीं कोणी तरी जिवंत असता, तर माझ्या या कृत्याचें सार्थक झालें असतें. सांप्रत, भिंत नसतां चित्रें काढण्याचा प्रयत्न करावा, त्याप्रमाणें हें माझें कृत्य आहे. सांप्रत मी आपल्या यजमानांवांचून अगदीं परकी अशा ह्या **मलयकेतूची** चाकरी पतकरली आहे. ती पहिल्या स्वामीवरची माझी भक्ति कमी झाली म्हणून, किंवा आपली चैन यथेच्छ चालावी ह्मणून, अथवा प्राण जातील या भयानें, किंवा आपली प्रतिष्ठा वाढावी ह्मणून, पतकरली आहे, असें

नाहीं; तर, माझा मुख्य हेतु असा आहे कीं, शत्रूचा वध करून, परलोकांत असणाऱ्या आपल्या **नंद**महाराजांच्या आत्म्याला हें वर्तमान ऐकून संतोष व्हावा!

आकाशाकडे पाहून डोळ्यांत अश्रु आणून पुनः ह्मणाला, 'भगवति, कमलालये लक्ष्मि, खरोखर तुला गुणांची म्हणून पारखच नाहीं असें वाटतें; कारण, तुला नेहमीं आनंद देणारा असा महाराज **नंद**, याला सोडून, त्याचा शत्रु मौर्य **चंद्रगुप्त**, याचा काय ह्मणून तूं आश्रय केलास तें सांग बरें? मदोन्मत्त हत्ती मरण पावला असतां त्याच्या गंडस्थलांतून वाहणारी मदाची धारा जशी तेथल्या तेथेंच नाहींशी होते, तशी तूं **नंदा**बरोबर कां नाहींशी झाली नाहींस?'

'खरोखर तूं अकुलीन आहेस असें वाटतें. कारण, ज्यांचीं कुलें विशेष प्रसिद्ध आहेत असे ह्या पृथ्वीवरील सर्व राजे काय जळून नाहींसे झाले, म्हणून तूं ह्या नीच कुळांतल्या **चंद्रगुप्ता**ला वरलेंस! अथवा तुझ्याकडे तरी काय दोष आहे! मोहोळाच्या फुलासारखी अत्यंत चपल अशी नागरिक स्त्रियांची बुद्धि, पुरुषाचे गुणावगुण पहाण्याचे कामीं अगदीं चळल्यासारखी होते. तेव्हां तुझीही तशीच अवस्था झाली असेल!'

अंमळ राग आल्यासारखें करून म्हणाला, 'दांडगे लक्ष्मि, आतां तुझी मी खोड मोडतों. तूं त्या दुष्ट **चंद्रगुप्ता**चा आश्रय केला आहेस, नाहीं? त्यालाच मी नाहींसा करतों, ह्मणजे तूं निराश्रित कोठें राहशील ती पाहूंया.'

पुनः कांहीं विचार करून ह्मणाला, माझा प्रियमित्र **चंदनदास** याच्या घरीं मी आपलें कुटुंब ठेवून आलों हें फार

योग्य केलें. कारण, **कुसुमपुर** शत्रूपासून सोडवून घेण्याच्या कामीं **राक्षस** उदासीन झाला नाहीं, असें त्यावरून लोक अनुमान करतील. माझीं बायकापोरेंच तेथें आहेत तेव्हां मला तिकडचें अगत्य आहे हें सहजच उघड होतें.

आणि यावरून तेथें आमच्या पक्षाचे जे लोक आहेत ते आपला उद्योग मंद पडूं देणार नाहींत. **चंद्रगुप्ताचा** घात करण्याविषयीं जे विषारी भयंकर उपचार करणारे लोक तेथें ठेवले आहेत, व शत्रूचीं कृत्यें हाणून पाडण्याचें ज्यांना काम सांगितलें आहे, त्यांत **शकटदास** हा मुख्य आहे. त्याच्याकडे पुष्कळ द्रव्य दिलें असून, तो नेहमीं माझ्या इच्छेप्रमाणें उद्योग करीत आहे. तसेंच घरोघरीं शत्रूकडील बातमी समजण्याकरितां व त्यांच्या गुप्त मसलतीं फोडण्याकरितां **जीवसिद्धि** इत्यादि मित्र तेथें ठेविले आहेत. तेव्हां एकंदरींत कार्यसिद्धि होण्याविषयीं फारसा संशय आहे असें नाहीं. आपले पुत्र, तसेच सेवक, आप्त, इष्टमित्र, यांसहवर्तमान आमचे महाराज **नंद**, यांनीं ज्याला, वाघाच्या छाव्याला घरांत पोसावा त्याप्रमाणें पोसून, लहानाचा थोर केला, व शेवटीं ज्यानें आपल्या त्या दयाळू पोशिंद्याचा नाश केला, त्या **चंद्रगुप्ताच्या** वर्मावर बुद्धिरूप बाणानें प्रहार करून मी त्याचा शेवट करीन. पण जर दैव मला प्रतिकूळ न होईल तरच ही गोष्ट घडणार आहे. कारण, तें प्रतिकूळ झालें तर पुष्कळ प्रयत्न करून देखील कांहीं उपयोग नाहीं !

**राक्षस** याप्रमाणें आपल्याशींच विचार करीत बसला आहे इतक्यांत, **मलयकेतूकडून जाजली** नांवाचा म्हातारा चोपदार कांहीं दागिने घेऊन त्याच्या भेटीस आला.

तो आपल्याशींच ह्मणाला, जरा (म्हातारपण) हीच कोणी एक **चाणक्याची** मसलत, हिनें **नंदराजाप्रमाणें** माझें तारुण्य नाहींसें करून, जशी **कुसुमपुरांत चंद्रगुप्ताची** स्थापना केली, तशी विषयाची इच्छा दूर करून, सांप्रत माझ्या शरीरांत धर्माची स्थापना केली आहे. सध्या **मलयकेतूचा** आश्रय करून—दिवसें दिवस ज्याचें ऐश्वर्य वाढत आहे, अशा **चंद्रगुप्ताला** जिंकण्याविषयीं **राक्षस** प्रयत्न करीत आहे; पण जिंकण्यास जसा समर्थ होत नाहीं, तसा कुलपरंपरेनें प्राप्त झालेली ही राजसेवा हिच्या संबंधीं जो माझा लोभ, तो धर्माला जिंकण्याविषयीं इच्छा करतो, पण तसें करण्याला समर्थ मात्र होत नाहीं! **राक्षसाच्या** जवळ येऊन म्हणाला, 'अमात्यांचें कुशल असो!'

**जाजली** हा वयोवृद्ध असून त्याची योग्यताही मोठी होती; यामुळें **राक्षस** त्याला विशेष मान देत होता. तो त्याला नमस्कार करून तत्काल उठून उभा राहिला, आणि आपल्या **प्रियंवदक** नांवाच्या हुजऱ्याला त्यानें आसन आणावयास सांगितलें. तें त्यानें आणून दिल्यावर दोघेही आपापल्या आसनावर बसले.

नंतर **जाजली** ह्मणाला, 'कुमार **मलयकेतु** याची आपल्याला एक विनंती आहे. त्याचें ह्मणणें असें आहे कीं, अलीकडे फार दिवस आपण कांहीं अलंकार वगैरे मुळींच धारण करीत नाहीं, हें पाहून मला फार वाईट वाटतें. आतां हें खरें आहे कीं, आपल्याला आपले पूर्वीचे यजमान, महाराज **नंद**, यांच्या गुणांचा एकाएकीं विसर पडावयाचा नाहीं, व त्यामुळें आपलें मन उदास राहील.

तथापि माझ्या विनंतीला आपण मान द्यावा अशी माझी प्रार्थना आहे.'

असें बोलून जाजलीनें कांहीं दागिने आणिले होते, ते राक्षसाच्या पुढें ठेविले, आणि हात जोडून ह्मणाला, 'कुमार मलयकेतूनें हे दागिने दिले आहेत, यांचा स्वीकार करण्याचा अनुग्रह करावा.'

त्यावर राक्षस म्हणाला, 'आर्या जाजले, माझ्या सांगण्यावरून कुमाराला अशी विनंती कर कीं, तुझ्या गुणांनीं आमचें मन आपल्याकडे ओढून घेतल्यामुळें आम्हांस आमच्या पहिल्या धन्याच्या गुणांचें अगदीं विस्मरण झालें. मी अलंकार धारण केले असते; पण ज्यांनीं अद्याप आपला पराक्रम दाखविला नाहीं, व शत्रूनें केलेल्या अपमानाचा कलंक ज्यांच्यावरून अद्याप गेला नाहीं, अशा या माझ्या अवयवांना अलंकार घालावे, असें मला वाटत नाहीं; जोंपर्यंत शत्रूचें सर्व सैन्य मारून, त्याला अगदीं पादाक्रांत करून कुसुमपुरांतल्या सुगांग नांवाच्या चौकांतल्या सुवर्णमय सिंहासनावर तुला बसविलें नाहीं, तोंपर्यंत हे अलंकार धारण करण्यांत काय अर्थ आहे ! '

हें ऐकून जाजलि म्हणाला, 'प्रधानजी, आपल्यासारखे कार्यकर्ते असल्यावर मलयकेतूला तें सिंहासन मिळणें फारसें कठीण नाहीं! ईश्वरकृपेनें त्या सर्व गोष्टी होतीलच. तर सांप्रत मलयकेतूची एवढी प्रार्थना मान्य करून आपण हे अलंकार धारण करावेत.'

हें ऐकून राक्षस ह्मणाला, 'आर्य जाजले, कुमार मलयकेतूप्रमाणें तुह्मीही सांगणें मला मोडतां येत नाहीं, ह्मणून मलयकेतूच्या ह्मणण्याप्रमाणें करतों.' असें बोलून

**राक्षसानें** ते अलंकार आपल्या अंगावर घातले.

ज्या कामाकरितां आपण आलों होतों तें काम झालें असें पाहून, **जाजलीनें राक्षसाचा** निरोप घेतला. तो बाहेर निघून गेल्यावर **राक्षस**, आपला दुजऱ्या **प्रियंवदक**, याला ह्मणाला, 'अरे, बाहेर कोणी आमच्या भेटीची इच्छा करून बसला आहे असें वाटतें. तर तो कोण आहे तें पहा.'

त्याची आज्ञा होतांच **प्रियंवदक** बाहेर आला, आणि चौकांत **विराधगुप्त** बसला होता, त्याला ह्मणाला, 'बाबा, तूं कोण आहेस ! आणि कशाकरितां आलास?'

हें ऐकून **विराधगुप्त** ह्मणाला, 'दादा, मी सर्प खेळविणारा गारुडी आहें. माझें नांव **जीर्णविष**. दिवाणजींच्या पुढें सर्पाचा खेळ करावा अशी माझी इच्छा आहे.'

**प्रियंवदक** म्हणाला, 'अंमळ थांब तर मी यजमानांला विचारून येतों,' असें सांगून त्यानें **राक्षसाला** त्याची इच्छा कळविली.

याच वेळीं **राक्षसाचा** डावा डोळा लवूं लागला, तें पाहून तो मनांत म्हणाला, काय आहे कोणास ठाऊक! माझा हा डावा डोळा लवतो आहे आणि याच वेळीं सर्पाचें दर्शन होणार, तेव्हां एकंदरींत कांहीं चांगलेंसें वाटत नाहीं. **प्रियंवदकाला** म्हणाला, 'अरे, त्या गारुड्याला सांग कीं, आह्मांला सापांच्या खेळांत कांहीं विशेष मौज वाटत नाहीं. त्याला कांहीं तरी देऊन खुष करून घालीव ह्मणजे झालें.'

**राक्षसाच्या** हुकुमाप्रमाणें **प्रियंवदक** बाहेर येऊन त्या गारुड्याला कांहीं देऊन ह्मणाला, 'दिवाणजींची भेट घेऊन तुला जें कांहीं मिळायचें होतें तें हें दिलें आहे. आतां उगीच सर्प खेळविण्याची मेहनत तरी कशाला करतोस!

दिवाणसाहेबांला यावेळीं कांहीं काम आहे. सापाच्या खेळाची त्यांना कांहीं विशेष मौज वाटत नाहीं. तर तूं आपला जा.'

हें ऐकून **विराधगुप्त** काकुळतीस येऊन **प्रियंवदकाला** ह्मणाला, 'दादा, माझ्याकरितां पुनः एकदां दिवाणजींना विनंती करा. त्यांना सांगा, मी केवळ साप खेळवूनच पोट भरणारा आहें असें नाहीं. मी प्राकृत भाषेंत उत्तम कविता करणारा आहें. तथापि त्यांच्या मनांत दर्शनाचा लाभ द्यावयाचा नसेलच, तर माझें एवढें हें पत्र तरी वाचून पहावें, अशी विनंती करा.' असें बोलून **विराधगुप्तानें** कागदावर एक आर्या लिहून **प्रियंवदकाच्या** हातांत दिली.

**प्रियंवदक** हा भला माणूस होता. श्रीमंतांच्या येथील चाकर उद्धट असतात, तसा त्याचा स्वभाव नव्हता. तो इतका काकुळतीस येऊन सांगतो आहे तर आपलें काय गेलें, असा विचार करून त्यानें तें पत्र **राक्षसाच्या** हातीं आणून दिलें, व त्याचें काय ह्मणणें होतें तेंही सांगितलें.

**राक्षसानें** तें पत्र घेऊन आर्या वाचली तींत—'आपल्या चातुर्यानें कुसुमांतला सर्व रस प्राशन करून भ्रमर जें कांहीं बोलतो तें ऐकिलें असतां त्यापासून दुसऱ्याचें मोठें कार्य होतें,' असें लिहिलें होतें.

**राक्षसाला** ती आर्या वाचतांच पूर्वीच्या गोष्टीचें स्मरण झालें. तो मनांत ह्मणाला, ओहो ! **कुसुमपुरांतला** सर्व वृत्तांत जाणणारा असा मी तुमचा हेर आहें, असें ह्या आर्येंत सुचविलें आहे. दुसऱ्या कामाकडे लक्ष्य गेल्यामुळें व मनांत अनेक विचार घोळत असल्यामुळें मला आपल्या हेराचें देखील स्मरण राहिलें नाहीं. याची ही

आर्या वाचल्यावरून मला आठवण झाली. गारुड्याचा वेष घेणारा हा माझा हेर **विराधगुप्त** असावा यांत कांहीं संशय नाहीं. नंतर **प्रियंवदकाला** ह्मणाला, 'अरे, त्याला आंत घेऊन ये. खरोखर तो उत्तम कवि आहे. तेव्हां त्याच्याकडून कांहीं सुभाषित ऐकिलें पाहिजे.'

याप्रमाणें **राक्षसाचा** हुकूम होतांच **प्रियंवदक** बाहेर जाऊन त्या गारुड्याला आंत घेऊन आला. गारुडी **राक्षसाला** पाहून आपल्याशींच ह्मणाला, 'स्वारी या वेळीं कांहीं चिंतन करीत बसली आहे. कारण डावा हात, तोंड तिरकस फिरवून, गळ्यावर ठेविला आहे. पण ह्याच्या उद्योगावरून शंकित झालेली राजलक्ष्मी **चंद्रगुप्ताच्या** छातीवर अद्यापि वक्रदृष्टि करीत नाहीं.'

**विराधगुप्तानें** अमात्य **राक्षसाला** मुजरा केला, तेव्हां **राक्षसाच्या** तोंडांतून सहज 'कोण तो, **विराध!**' इतकीं अक्षरें निघालीं; पण त्याचें नांव यावेळीं उघड करावयाचें नव्हतें, ह्मणून जीभ चावून **प्रियंवदकाला** ह्मणाला, 'अरे, आतां सर्पाशीं खेळावयाचें आहे, तेव्हां येथें नोकराचाकरांचें कांहीं विशेष काम नाहीं. आणि तूंही बाहेर देवडीवर उभा राहिलास तरी चालेल.'

**राक्षसाला विराधगुप्ताशीं** एकांत करावयाचा होता, ह्मणून त्यानें **प्रियंवदक** व इतर नोकर यांना बाहेर जाण्याविषयीं हा इषारा केला, त्याप्रमाणें ते दूर गेले. नंतर **राक्षस विराधगुप्ताला** ह्मणाला, 'हें आसन आहे, यावर बैस.'

त्याची आज्ञा होतांच **विराधगुप्त** आसनाला स्पर्श करून जमिनीवरच बसला. **विराधगुप्ताला** पाहून **राक्षसाला** पूर्वीच्या गोष्टीची आठवण झाली. **नंदाच्या** कारकीर्दीत

**विराधगुप्त**ही एका अधिकारावर होता, व त्यामुळें त्याची स्थिति चांगली होती. सांप्रत तो दरिद्रावस्थेंत होता. त्यांतून हेराचें काम पतकरल्यामुळें त्यानें केंस वाढविले होते. अंगावर खंडीभर मळ सांठला होता. त्याची पूर्वीची व सांप्रतची स्थिति आठवून **राक्षसाला** फार वाईट वाटलें. त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तो ह्मणाला, 'अरे, महाराजांच्या (नंदाच्या) पायांची सेवा करणारे तुह्मी लोक, तुमची आणि अशी स्थिति व्हावी काय? कालगति विचित्र आहे!'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'दिवाणसाहेब, यावेळीं शोक करणें उचित नाहीं. यद्यपि सांप्रत आमची अशी दशा झाली आहे, तथापि लवकरच आपण आह्मांला पूर्वीच्या स्थितीवर पोंचवाल अशी आमची खात्री आहे.'

**राक्षस** ह्मणाला, 'पुढें जें काय होईल तें खरें; पण गड्या, आधीं **कुसुमपुरा**कडील काय हकीकत आहे ती सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'दिवाणजी, **कुसुमपु**रांतली हकीकत फार मोठी आहे. आतां ती कोठपासून सांगूं तें सांगा.'

**राक्षस** ह्मणाला, 'बाकीची हकीकत असो. **चंद्रगुप्ता**नें नगरांत प्रवेश केला व त्यावेळीं त्याचा घात करण्याकरितां आम्हीं जे लोक नेमिले होते, त्यांनीं काय काम केलें, तेथपासून सर्व हकीकत सांग ह्मणजे झालें.'

हें ऐकून **विधरागुप्त** ह्मणाला, 'सांगतों ऐका. **शक, यवन, किरात, कांबोज, पारसीक, बाल्हीक** इत्यादि मोठे मोठे, **चाणक्या**नें आपल्या शहाणपणानें वश करून घेतलेले वीर व **चंद्रगुप्त** यानें पूर्वी जमविलेले आणि **पर्वतराजा**च्या सैन्यांतून त्याला अनुकूळ झालेले असे पुष्कळ

सरदार यांनीं, प्रलयकालीं खवळलेल्या समुद्रांनीं वेढलेल्या भूमंडलाप्रमाणें, **कुसुमपुर** आसमंतात् वेढलें आहे.'

सरदारांचें नांव ऐकून त्या शूर **राक्षसा**ची वीरश्री प्रगट झाली. तो तत्काल तरवार हातांत घेऊन कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें **विराधगुप्ता**ला ह्मणाला, 'अरे! मी जिवंत असतां **कुसुमपुरा**ला वेढा घालणार कोण आहे?'

यावेळीं **प्रवीरक** नांवाचा दुजऱ्या जवळ होता, त्यालां तो ह्मणाला, 'अरे, आतां लवकर अशी व्यवस्था कर कीं, तटबंदीच्या भोंवतीं, धनुष्य घेऊन लढणाऱ्या वीरांना वेढा द्यावयाला सांग. तसेंच वेशीवर, शत्रूच्या हत्तींचीं गंडस्थलें फोडणारे असे, हत्ती ठेव. जे माझ्याबरोबर शत्रूवर हल्ला करायाला तयार असतील, व ज्यांला प्राणापेक्षां कीर्ति अधिक वाटत असेल, व जे मृत्यूचें भय बाळगीत नसतील, त्यांनीं आतांच्या आतां माझ्याबरोबर बाहेर निघावें!'

वस्तुतः या वेळीं **राक्षसा**चा हा आवेश मोठा चमत्कारिक होता. कारण **कुसुमपुरा**शीं आतां त्याचा काय संबंध राहिला होता! त्यानें बहुत दिवस त्या नगरांत राहून मोठा अधिकार चालविला होता, व तो निस्सीम स्वामिभक्त होता, यावरून **कुसुमपुर** सांप्रत शत्रूच्या हातीं गेलें आहे, त्याचें स्मरण न राहून त्यानें पूर्वीचा बहुत दिवसांचा अभ्यास व मनाचा ग्रह यांला अनुसरून तें आपल्याच ताब्यांत आहे असें समजून, वरील भाषण केलें. तें ऐकून **विराधगुप्तं** ह्मणाला, 'दिवाणसाहेब, उगीच रागावूं नका. पूर्वी झालेली गोष्ट यावेळीं मी सांगत आहें.'

हें ऐकून **राक्षस** सुस्कारा सोडून ह्मणाला, 'अरेरे! एकूण ही झालेली गोष्ट आहे. मी समजत होतों, यावेळीं हें चा-

ललें आहे कीं काय. तरवार खालीं ठेवून **नंद**राजाला उद्देशून ह्मणाला, 'महाराज **नंदा**, मजवर तुझी किती मेहेरबानी होती तिची मला वरचेवर आठवण होते. **कुसुमपुरांत** लढाई चालली होती तेव्हां—जिकडे हें हत्तींचें सैन्य लढत आहे तिकडे **राक्षस** जाऊन त्यांचा पराभव करील; हरिणांसारखे किंवा उंचावरून पडणाऱ्या उदकाच्या प्रवाहासारखे चपल असे हे स्वार **राक्षस**च मागें हटवील; तसेंच ह्या पायदळाचा **राक्षस**च नाश करील; याप्रमाणें वरचेवर मला अनेक हुकूम करणारा तूं-जें तें काम **राक्षसा**नें करावें असें समजत होतास, व त्यामुळें प्रीतीनें जणुं काय हजारों राक्षस आपल्या जवळ आहेत असें तुला वाटत होतें. हाय हाय! ते दिवस गेले. बरें, **विराधगुप्ता**, पुढें काय सांगणार तें सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'याप्रमाणें जिकडून तिकडून शहराला शत्रूचा वेढा पडला असून कित्येक दिवस एकसारखें युद्ध चाललें होतें. शहरांतल्या लोकांना बाहेर जाण्यास सवड मिळत नसल्यामुळें, ते फार कंटाळले होते. एकंदरींत, लोकांचा नाश होत असून त्यांना फार संकटें भोगावीं लागतात ह्मणून त्यांच्यावर दया करण्याकरितां महाराज **सर्वार्थसिद्धि** हे भुयाराच्या वाटेनें तपोवनांत निघून गेले, तेव्हां यजमानांच्या वियोगानें तुमचेही हातपाय गळल्यासारखे होऊन, पुनः **नंदा**चें राज्य त्याला मिळवून देण्याकरितां तुम्हीही भुयाराच्या वाटेनें निघून गेल्यावर, **चंद्रगुप्ता**ला मारण्याकरितां ह्मणून जी तुह्मी विषकन्या पाठविली होती, तिच्या योगानें बिचाऱ्या **पर्वतराजा**चा घात झाला.'

हें ऐकून **राक्षस** कपाळाला हात लावून ह्मणाला, '**गड्या**

हा काय चमत्कार झाला तो पहा. कोणत्या तरी एका मनुष्याचा घात करण्याला समर्थ अशी कर्णाच्या *वासवी शक्तीसारखी मीं ती विषकन्या बाळगून ठेविली होती. तिच्या योगानें, जसा कर्ण अर्जुनाला मारण्याची इच्छा

---

* कर्ण हा मोठा पराक्रमी वीर होता. असें सांगतात की, जन्मत: त्याच्या अंगावर अभेद्य कवच उत्पन्न झालें होतें व त्याच्या योगानें तो लढाईत अजिंक्य होता. त्याचें बळ कमी करावें म्हणून आपला पुत्र अर्जुन याच्या हिताकरिता इंद्रानें ब्राह्मणाचें रूप धारण करून, कर्ण वैश्वदेव करून काकबलि टाकायाला बाहेर आला त्या वेळीं त्याच्याजवळ कवचाची भिक्षा मागितली. कर्ण जसा पराक्रमी होता तसाच दानशूरही होता. त्यानें त्या ब्राह्मणाला आपलें अंग तासून कवच देण्याचें कबूल केलें. इंद्र अशा रीतीनें कपटवेषानें त्याच्याकडे येणार हें त्याचा बाप सूर्य यानें आधींच त्याला सांगितलें होतें. याशिवाय कवचाची भिक्षा मागणार हा कोणी सामान्य भिक्षुक नाहीं असें समजून कर्णानें त्याची पुरती ओळख काढली, व वचनाप्रमाणें आपलें अंग तासून कवच तर त्याला दिलेंच, पण त्याच्या बदला शक्ति नावाचें इंद्राचें, कधीही निष्फळ न जाणारें, आयुध होतें तें मागून घेतलें. त्यालाच वासवीशक्ति म्हणतात 'ज्या पुरुषावर तूं ही सोडशील त्याला मारून हें आयुध पुन माझ्याजवळ प्राप्त होईल' असें इंद्रानें कर्णाला सांगितलें होतें. (ही कथा महाभारत वनपर्वांत आहे.) त्याप्रमाणें कर्ण ती शक्ति अर्जुनावर सोडण्याकारिता जपत होता. पण अर्जुनाशीं त्याचा लढाईचा प्रसंग येण्यापूर्वी द्रोणाचार्य कौरवाचे सेनापति असतां, जयद्रथाला मारला त्या दिवशीं अहोरात्र युद्ध चाललें होतें, व त्या युद्धात पांडवांच्या पक्षानें लढणाऱ्या घटोत्कचानें कौरवांची दाणादाण करून सोडली व दुसऱ्या कोणत्याही शस्त्रास्त्रानी त्याचा नाश होणार नाहीं असें समजून सर्वांनीं आग्रह केल्यावरून अर्जुनाकरितां राखून ठेविलेली ती शक्ति कर्णानें घटोत्कचावर सोडून त्याला मारिलें!

घटोत्कच हा राक्षस असून दुराचारी होता व तो आपल्या पक्षाचा होता तरी त्याला मारणें भाग होतें, व कर्णाची शक्ति कोणत्यातरी उपायानें अर्जुनावर न येईल असें करावयाचें होतें; म्हणून पांडवांचा साह्यकर्ता विष्णु अर्थात् कृष्ण यानें घटोत्कचाला उत्तेजन देऊन कर्णावर धाडला व त्याचा अंत करवून कर्णाची शक्तिही फुकट घालवून अर्जुनाचा बचाव केला. (ही कथा महाभारत द्रोणपर्वांत सांगितली आहे).

करीत होता तसा, मी **चंद्रगुप्ताचा** घात करण्याची इच्छा करीत होतों. ती, कृष्णासारख्या दुष्ट **विष्णुगुप्ताच्या** कृतीनें **घटोत्कचाप्रमाणें**, बिचाऱ्या **पर्वतराजाच्या** मृत्यूला कारण झाली!'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'दिवाणजी, या कामीं आपल्याकडून ह्मणजे कांहीं कच्ची मसलत झाली होती, असें नाहीं. पण दैवाचीच लीला विचित्र, त्याला कोणाचा काय इलाज आहे!

**राक्षस** ह्मणाला, 'असो, जें झालें तें झालें. पुढें काय झालें तें सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'नंतर, आपला पिता **पर्वतराज** याचा याप्रमाणें शेवट झाल्यामुळें त्रासून, कुमार **मलयकेतु** तेथून पळून गेला; व त्याचा चुलता, **पर्वतराजाचा** बंधु, **वैरोचक** याला मथवून **चाणक्यानें** आपल्याला अनुकूळ करून घेतल्यावर, थोडक्याच दिवसांनीं **चंद्रगुप्ताचा**, राजवाड्यांत प्रवेश करण्याचा समारंभ निश्चित झाला. त्या दिवशीं त्या दुष्ट **चाणक्यानें कुसुमपुरांतल्या** प्रमुख प्रमुख साऱ्या मंडळीला बोलावून असें सांगितलें कीं, 'आज मध्यरात्रीच्या सुमारास ज्योतिष्यांनीं मुहूर्त दिला आहे. त्या मुहूर्तावर **चंद्रगुप्त** नंदराजाच्या महालांत प्रवेश करणार, तेव्हां पूर्वदिशेच्या मुख्य दरवाज्यापासून सर्व वाडा उत्तम सुशोभित करावा. जिकडे तिकडे मंगलकारक ध्वज, पताका, तोरणें वगैरे उभारावीं.'

याप्रमाणें त्याचा हुकूम होतांच, **दारुवर्मा** नांवाच्या कारागिरानें सोन्याचीं तोरणें इत्यादिक लावून राजवाड्याचा मुख्य दरवाजा उत्तमप्रकारें सुशोभित केला. त्याच्या मनांत, ह्याच दरवाज्यांतून **चंद्रगुप्त** आंत जात असतां,

त्याचा समाचार घ्यावयाचा होता; ह्मणून त्यानें गुप्त रीतीनें सर्व तयारी करून ठेविली होती.

**चाणक्यानें दारुवर्म्याला** दरवाजा सुशोभित करण्याविषयीं आज्ञा केली नव्हती. त्यानें दुसऱ्याच कारागिरांला तें काम सांगितलें होतें. असें असून **दारुवर्म्यानें** आपण होऊन तयारी केली, याबद्दल त्या धूर्त **चाणक्याला** तेव्हांच संशय आला. तो **दारुवर्म्याचें** तें कृत्य पाहून बाह्यात्कारें मोठा खुष झाला, व त्याच्या कारागिरीची विशेष तारीफ करून व त्याची खूप स्तुति करून—ह्या तुझ्या हुशारीचें फळ लवकरच तुला प्राप्त होईल, असें त्यानें **दारुवर्म्याला** सांगितलें.

हें ऐकून **राक्षस** घाबरल्यासारखा होऊन ह्मणाला, गड्या, तूं हें काय सांगतोस? **दारुवर्म्याच्या** कृतीनें त्या **चाणक्याला** कोठून संतोष होणार? यावरून मला असें वाटतें कीं, **दारुवर्म्याचा** प्रयत्न निष्फल झाला असेल, किंवा त्यापासून कांहीं अनिष्ट तरी झालें असेल. **दारुवर्म्यानें** मूर्खपणानें ह्मणा, किंवा त्याची राजाच्या ठिकाणीं विशेष भक्ति होती ह्मणून ह्मणा, **चाणक्याचा** हुकूम होण्याची वाट न पाहतां दरवाजा शृंगारिला. यामुळें त्या दुष्ट **चाणक्याच्या** मनांत बळकट संशय उत्पन्न झाला असेल. बरें, पुढें काय झालें तें सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'नंतर दुष्ट **चाणक्यानें** मध्यरात्रीच्या समयीं चांगला मुहूर्त आहे असा पुकारा करून, **चंद्रगुप्ताची** राजवाड्यांत प्रवेश करण्याची सर्व तयारी केली. तें वर्तमान सर्व शहरभर पसरल्यामुळें पुष्कळ लोक जमा झाले. मुहूर्ताची वेळ जवळ आली असें पाहून,

**चाणक्यानें पर्वतराजाचा बंधु वैरोचक**, याला आणि **चंद्रगुप्ताला** एका सिंहासनावर बसवून, दोघांलाही समसमान राज्याचा विभाग मिळणार, असें लोकांला विदित केलें. **पर्वतराजाला** आपण अर्धें राज्य देणार, अशी जी पूर्वी त्यानें प्रतिज्ञा केली होती, ती या कृत्यानें आपण पूर्ण केली असें त्यानें लोकांला दर्शविलें.'

**राक्षस** ह्मणाला, 'अरे, नंदावर स्वारी करण्याकरितां **पर्वतकाची** उठावणी करावी ह्मणून त्यानें त्याला अर्धें राज्य देण्याचें त्यावेळीं कबूल केलें होतें. **पर्वतराज** तर मेलाच. तेव्हां आतां त्याच्या भावाला अर्ध राज्य देऊन आपली प्रतिज्ञा पुरी केल्याबद्दल लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्याचा त्याचा विचार होता असें वाटतें.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'तोच हेतु; आणखी दुसरें काय असणार!'

हें ऐकून **राक्षस चाणक्याच्या** बुद्धीविषयीं मोठें आश्चर्य करून आपल्याशींच ह्मणाला, या **चाणक्याची** धूर्तपणाची तर कमाल आहे बुवा! **पर्वतराजाला** तर मारून टाकलाच. व त्याचें अपयश आमच्या डोक्यावर घातलें. आतां त्याबद्दल कदाचित् कोणी संशय घेईल, ह्मणून त्याचा बंधु **वैरोचक** आपल्या जाळ्यांत सांपडला आहे, त्या बिचाऱ्याला कोणत्यातरी गुप्त उपायानें ठार करण्याची तजवीज केली असेल. त्याला राज्याचें अर्ध देण्याचा जो हा बूट काढला आहे, तो केवळ **पर्वतराजाच्या** मरणासंबंधानें कोणी आपल्यावर कांहीं अपयश ठेवील तर तें या निमित्तानें नाहींसें करावें, अशी त्याची युक्ति असेल. **विराधगुप्ताला** ह्मणाला, 'बरें, पुढें काय झालें तें सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'याप्रमाणें सर्व तयारी करून **वैरोचकाला** राज्याभिषेक केला. त्याच्या अंगावर हिऱ्यामाणकांचे उत्तमोत्तम अलंकार घातले. रत्नखचित चिलखत त्याच्या अंगांत घातलें. बहुमोल मुकुट त्याच्या मस्तकावर घातला. सुवासिक फुलांचे हार त्याच्या गळ्यांत घातले. एकंदरींत त्याला असा सजविला कीं, त्याच्या विशेष परिचयाच्या मनुष्याला देखील त्याची ओळख पटूं नये, अशी तजवीज केली, व हें त्याला सजविण्याचें काम लोकांला न कळवितां, मोठ्या बेताबातानें करविलें. नंतर **वैरोचकाला** मोठ्या शृंगारलेल्या हत्तीवर बसवून **चंद्रगुप्ता**च्या बरोबर असणारे सर्व राजे व इतर सरदार वगैरे लोक त्याच्या बरोबर देऊन, **वैरोचकाची** स्वारी मोठ्या थाटानें बाहेर काढविली.

**चंद्रगुप्त**ही या स्वारीबरोबरच होता; पण **चाणक्यानें** त्याला पूर्वीच शिकवून ठेविलें होतें, त्याप्रमाणें तो **चंद्रवशा** नांवाच्या हत्तिणीवर बसून अगदीं साध्या थाटानें त्याच्या बरोबर निघाला. बिचाऱ्या दुर्दैवी **वैरोचकाला**, आपला हा एवढा मोठा थाटमाट चालला आहे यांतला हेतु काय, याविषयीं मुळींच संशय देखील आला नाहीं! जणुं काय तो मृत्यूच्या तोंडांतच प्रवेश करण्याकरितां निघाला आहे असा नेमलेल्या वेळीं छावणींतून निघून रमतरमत **दारुवर्म्यानें** तयारी करून ठेविली होती, त्या दरवाज्यांत येऊन पोंचला.

दरवाज्यांत येऊन पोंचतांच, **चंद्रगुप्ता**च्या बरोबरचे सरदारलोक जे **वैरोचका**बरोबर आले होते, त्यांनीं आपापले घोडे एकाएकीं उभे केले.

**दारुवर्म्यानें** यंत्राची रचना करून त्या दरवाज्यांत एक तोरण बांधलें होतें, व त्याची अशी योजना केली होती कीं, **चंद्रगुप्त** त्या तोरणाच्या खालीं येतांच एकाएकीं तें पेटून त्याच्या अंगावर पडावें, व त्या योगानें त्याचा नाश व्हावा. अशी योजना करून **दारुवर्मा** आपण खालीं भुयारांत दडून बसला होता.

तुह्मीं **चंद्रगुप्ता**च्या नाशाकरितां ह्मणून जे जे मनुष्य नेमले होते, त्यांत **वर्बरक** नांवाचा महात **चंद्रगुप्ता**जवळ ठेविला होता हें आपणांस माहीत असेलच. **दारुवर्म्यानें** तोरणाची अशी तयारी करून **वर्बरकाला** सूचना केली होती कीं, 'तूं हत्ती घेऊन येशील त्या वेळीं त्या तोरणाला मध्यें एक सोन्याचें फळ बांधून ठेविलें आहे, त्याला धरून ओढ, ह्मणजे मला इशारा पोंचेल व मी पुढची योजना करीन'.

याप्रमाणें संकेत होऊन **वर्बरक** हत्ती चालवीत होता. पण अंबारींत **वैरोचक** बसला आहे हें त्या बिचाऱ्याला माहीत नव्हतें. **चंद्रगुप्ता**च्या प्रवेशाची तयारी झाली असून त्याच्याकरितां हा सर्व प्रयत्न आहे, **वैरोचका**बद्दल अशी तयारी कोण करणार, असें समजून त्यानें विशेष शोध केला नाहीं.

हत्ती दरवाज्यांत येऊन पोंचतांच **वर्बरकानें** एकदम तोरणाला हिसका मारला व तो वर हात करून तोरण धरीत आहे तों, त्याच्या पायाखालून हत्तीण पुढें निघून गेली. त्याबरोबर तो दुर्दैवी महात खालीं पडून त्याचा चेंदामेंदा झाला!

इकडे **दारुवर्म्यानें** हत्तिणीवर बसलेला हा **चंद्रगुप्तच**

असेल असें समजून पूर्वसंकेताप्रमाणें तोरण त्याच्या अंगावर पाडून बिचाऱ्या **वैरोचकाला** जागच्या जागीं मारून टाकिलें!'

हें ऐकून **राक्षस** चडफडून ह्मणाला, 'अरेरे! एका कृत्यांत दोन अनर्थ प्राप्त झाले. आह्मीं **चंद्रगुप्ताला** मारण्याचा प्रयत्न केला होता तो एकाच्या बाजूस राहून, **वैरोचक** आणि **वर्वरक** हे दोघेही मेले. बरें, पण त्या **दारुवर्म्याचें** काय झालें?'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'त्याचें का? त्या दुर्दैव्याला कोण जिवंत ठेवणार? त्यानें **वैरोचकाचा** घात केला हें पहातांच, त्याच्या बरोबरच्या लोकांनीं दगड मारून त्याला जागच्या जागीं ठार केलें!'

हें ऐकून **राक्षस** डोळ्यांत अश्रु आणून ह्मणाला, 'शिव शिव! **दारुवर्मा** आमचा परम मित्र होता. आमच्यावर त्याचा अतिशय विश्वास होता. आज त्याचा वियोग झाला! बरें, पण तेथें **अभयदत्त** नांवाचा एक वैद्य होता, त्यानें काय केलें तें सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'त्यानें का? त्यानें सर्व कांहीं केलें!'

हें ऐकून **राक्षस** आनंदित होऊन म्हणाला, 'काय! त्या दुरात्म्या **चंद्रगुप्ताला** मारला?'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'प्रधानजी, त्यानें आपल्याकडून तसा प्रयत्न केला होता; पण दैवानें मारूं दिला नाहीं.'

हें ऐकून **राक्षस** दुःखित होऊन ह्मणाला, 'तर मग सर्व कांहीं त्यानें केलें, असें तूं म्हटलेंस तें काय?'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'महाराज, त्यानें विष घालून एक उत्तम प्रकारचें चूर्ण **चंद्रगुप्ताला** देण्याकरितां तयार

केलें होतें ; पण **चंद्रगुप्त चाणक्या**ला दाखविल्यावांचून कांहींच खात नाहीं. तें चूर्ण **चाणक्यानें** पाहिलें तेव्हां त्याची परीक्षा करण्याकरितां त्यानें तें सोन्याच्या भांड्यांत घातलें. कांहीं वेळानें त्याचा रंग बदलला. तेव्हां त्यांत विष आहे असें सांगून, **चाणक्यानें**, **चंद्रगुप्ता**ला तें खाऊं नको, ह्मणून सांगितलें '

**राक्षस** ह्मणाला, 'अरे! तो दुष्ट **चाणक्य** मोठाच लबाड आहे. बरें, पण तो वैद्य सुखरूप आहेना ?'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'तो आतां अक्षयसुखाचा अनुभव घेत आहे. त्या औषधांत विष आहे असें समजतांच, तेंच औषध **चाणक्यानें** त्याच्याकडून खावविलें. अर्थात् बिचारा वैद्य मेला!'

हें ऐकून **राक्षस** खिन्न होऊन ह्मणाला, 'फार वाईट गोष्ट झाली ! मोठा अनुभवी वैद्य नाहींसा झाला ! बाकी सर्वांची काय अवस्था झाली तें कळलें. पण शेजघरावरचा मुख्य अधिकारी **प्रमोदक**, याची काय हवाल आहे ती सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'त्याची आणखी निराळी ती कसली असणार ? जी बाकीच्यांची, तीच त्याची.'

हें ऐकून **राक्षस** उद्विग्न होऊन ह्मणाला, अरे 'असें काय ह्मणतोस ! नीट सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'महाराज, काय सांगूं ! एकापेक्षां एकेक अशीं दुःखकारक वर्तमानें ऐकविण्याची माझ्यावर पाळी आली आहे, याचें मला फार वाईट वाटतें. अहो त्या मूर्खानें फारच अजागळपणा केला. तुह्मी त्याला एकदम पुष्कळसें द्रव्य दिलें, त्याच्या योगानें तो अगदीं

बेफाम झाला. त्यानें मोठ्या श्रीमंतीचा थाट घातला, तेव्हां अर्थात् ही गोष्ट **चाणक्याच्या** कानावर गेली. त्या गरिबाला इतकें द्रव्य कोठून प्राप्त झालें, अशी शंका येऊन **चाणक्यानें** त्याला विचारिलें, तेव्हां भलतेंच कांहींतरी सांगूं लागला. त्यामुळें **चाणक्याची** पक्की खातरी होऊन. तो तुमच्या पक्षाचा आहे, असें समजून त्यानें त्या **प्रमोदकाला** विचित्र रीतीनें मारविलें!'

हें ऐकून **राक्षस** फारच खिन्न झाला. **विराधगुप्ताच्या** तोंडांतून एक तरी आनंदाची गोष्ट ऐकायला मिळेल, अशी त्याला मोठी आशा होती. पण ती पूर्ण न होतां एकापुढें एक दु:खकारक वर्तमानें ऐकतां ऐकतां त्याचें मन फारच अस्वस्थ झालें. तो ह्मणाला, '**प्रमोदकाच्या** हातून तरी कांहीं होईल असें मला वाटलें होतें ; पण तेथें देखील दैवानें आमचा घात केला. असो. पण कायरे, **चंद्रगुप्त** ज्या ठिकाणीं निजतो, तेथपर्यंत भुयार तयार करून त्यांत **बीभत्सक** इत्यादि मारेकरी आह्मीं ठेविले होते, त्यांची काय खबर आहे?'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'दिवाणसाहेब, तें मला विचारूं नका. फार भयंकर वर्तमान आहे.'

हें ऐकून **राक्षस** ह्मणाला, 'काय, इतकें भयंकर वर्तमान आहे ह्मणतोस, तर दुष्ट **चाणक्याला**, ते तेथें राहतात, असें समजलें काय?'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'आणखी काय तर? **चंद्रगुप्त** राजवाड्यांत प्रवेश करणार, त्याच्या पूर्वीच त्या दुरात्म्या **चाणक्यानें** तो वाडा लक्ष्यपूर्वक तपासून पाहिला. पाहतां पाहतां तो शेजघरांत आला. तेव्हां तेथें भिंतीला छिद्र पडलें असून त्यांतून एक मुंगी बाहेर निघालेली त्याच्या दृष्टीस

पडली. तिच्या तोंडांत भाताच्या शितकणाचा कांहीं अंश होता; तेवढ्यावरून त्या धूर्ताला संशय आला, व त्यानें तत्काल विशेष तपास केला. तेव्हां एथें कांहीं तरी दगा आहे असें समजून, एकदम त्यानें त्या शेजघरालाच बत्ती लावून दिली. तेव्हां जिकडे तिकडे धूर कोंडल्यामुळें तेथून निघण्याचा जो मार्ग होता, तो भुयारांत असलेल्या **बीभत्सा**दिकांला मुळींच दिसला नाहीं. यामुळें ते तेथल्या तेथेंच जळून मेले !'

हें ऐकून **राक्षस** दुःखाश्रु टाकीत होत्साता ह्मणाला, 'हाय हाय ! मोठी वाईट गोष्ट झाली. गड्या **विराधगुप्ता**, त्या दुरात्म्या **चंद्रगुप्ता**चें दैव त्याला कसें अनुकूळ आहे तें पहा ! कारण, त्याला मारण्याकरितां मीं मोठ्या बंदोबस्तानें विषकन्या पाठविली. तिच्या योगानें तो तर मेला नाहींच ; पण दुर्दैवानें त्याच्या राज्याचा अर्धा हिस्सेदार **पर्वतक** मरण पावला. तसेंच जे शस्त्रास्त्रांनीं त्याला मारण्याच्या कामांत व औषधांच्या कामांत नेमले होते ते आपल्याच कृतीनें आपण मेले. चमत्कार पहा कीं, मी जी कांहीं मसलत करतों, ती त्या **चंद्रगुप्ता**ला फलद्रूपच होते!'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'आपण म्हणतां तसें आहे खरें, तथापि आरंभलेली गोष्ट आतां आपण सोडूं नये. सामान्य मनुष्य असतात, ते, पुढें कांहीं विघ्न येईल ह्मणून, कोणत्याही कामाला आरंभच करीत नाहींत. मध्यम लोक, प्रारंभ केला असून मध्यें कांहीं विघ्नें आलीं ह्मणजे तें काम सोडून देतात, पण जे उत्तम गुणवान् पुरुष आहेत, ते वरचेवर अनेक विघ्नें आलीं तरी आरंभलेलें काम मुळींच सोडीत नाहींत.'

'आणखीं असें पहा कीं, थोरांनीं आपण आरंभलेलें काम सोडतां नये. शेष आपल्या मस्तकावर नेहमीं पृथ्वी धारण करतो, तो काय तिचा त्याला भार वाटत नाहीं, ह्मणून धरतो काय ? तसाच हा सूर्य सारा दिवस फिरत असतो, तो, त्याला त्याचे श्रम वाटत नाहींत ह्मणून फिरतो काय ? तर ज्याचा आपण अंगीकार केला, तें सोडण्याविषयीं मोठे पुरुष लाजत असतात. ज्या कार्याचा स्वीकार केला, तें शेवटास नेऊन पोंचविणें हें थोरांचें कुलव्रतच आहे.'

**राक्षस** म्हणाला, 'सख्या **विराधगुप्ता**, अरे, आरंभलेली गोष्ट मीं सोडली नाहीं, याचा प्रत्यक्ष तुला अनुभव आहेच. बरें, पुढें काय झालें तें सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'शेजघरांतील ही हकीकत झाली, त्या दिवसापासून **चाणक्य** पहिल्यापेक्षां अनेक रीतीनें **चंद्रगुप्ताचें** रक्षण करण्याविषयीं तत्पर राहूं लागला. त्यानें तुमच्या पक्षाची ह्मणून जेवढी मंडळी होती, त्यांला वेंचून काढून त्यांचा पक्का बंदोबस्त केला.'

**राक्षस** ह्मणाला, 'बरें, सांग सांग, कोणांकोणांला त्यानें काय काय शिक्षा दिली तें.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'तुमचा परमविश्वासू **जीवसिद्धि** नांवाचा क्षपणक, याचे पांच पाट काढून त्याला आधीं नगरांतून हांकून लावला.'

हें ऐकून **राक्षस** मनांत ह्मणाला, यांत कांहीं मोठेंसें नाहीं. त्या **जीवसिद्धीला** कांहीं आश्रयच नव्हता, तेव्हां त्याला बाहेर घालवून दिलें तरी त्यांत फारसें कांहीं नाहीं. **विराधगुप्ताला** म्हणाला, 'अरे, पण त्याचा कोणता अपराध पाहून त्याला ही शिक्षा दिली !'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'तुम्हीं पाठविलेल्या विषकन्येकरवीं **पर्वतेश्वराला** मारलें; म्हणून त्यानें त्याला घालविलें.'

**राक्षस** हाही मोठा कारस्थानी व **चाणक्याच्या** तोडीचाच बुद्धिमान् पुरुष होता. **जीवसिद्धीवर** जो दोष ठेवून त्याला त्यानें शहरांतून बाहेर घालविलें त्याबद्दल **कौटिल्याच्या** शहाणपणाचें **राक्षसाला** मोठें कौतुक वाटलें. तो मनांत म्हणाला, शाबास! एकूण पक्का शहाणा आहेस. खरोखरी तुझ्या मस्तकावर जें अपयश पडलें होतें, तें युक्तीनें तूं आमच्यावर लोटून दिलेंस, व अर्ध्या राज्याचा वारस (**पर्वतराज**) त्यांतल्या त्यांत मारविलास. याप्रमाणें एका मसलतीच्या बीजापासून अनेक फलें प्राप्त करून घेतलींस, याबद्दल तुला धन्यवाद दिला पाहिजे. **विराधगुप्ताला** ह्मणाला, 'पुढें काय झालें तें सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'नंतर तुमचा मित्र **शकटदास** याच्यावर संक्रांत आली. **दारुवर्मा** इत्यादिकांनीं जो प्रयत्न केला तो सर्व या **शकटदासाच्या** सांगण्यावरून केला असून, हा राजद्रोही आहे असा शहरभर पुकारा केला, व त्या गरिबाला सुळावर चढविला.'

हें ऐकून **राक्षसाच्या** डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तो ह्मणाला, 'मित्रा **शकटदासा**, तुला अशा वाईट रीतीनें मरण यायचें नव्हतें. अथवा ज्यापेक्षां तूं आपल्या धन्याकरितां मेलास, त्यापेक्षां तुझ्याबद्दल शोक करण्याचें कांहीं कारण नाहीं. वस्तुतः आह्मीच शोच्य आहों. कारण, आह्मी **नंदकुलाचा** नाश झाला असूनही, अद्यापि वांचण्याची इच्छा करितों!'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'दिवाणसाहेब, आपण देखील यजमानांच्या कार्याकरितांच झटत आहां.'

**राक्षस** ह्मणाला, 'अरे, आह्मी अद्यापपर्यंत प्राण ठेविले आहेत, ते हीच गोष्ट मनांत आणून ठेविले आहेत. केवळ वांचण्याच्या इच्छेनें या जगांत राहिलों आहों असें नाहीं ह्मणूनच, महाराज परलोकाला गेले असूनही आह्मी कृतघ्न अद्यापि त्यांच्यामागून जात नाहां. बरें, तुला आणखी काय काय गोष्टी सांगायच्या असतील त्या सांग. मित्राचें संकट ऐकण्याविषयीं हा मी पाषाणहृदय तयार झालों आहें.'

**विराधगुप्त** ह्मणाला, '**शकटदासादिकांला** याप्रमाणें शिक्षा झाल्या, तेव्हां आपले परम मित्र **चंदनदास** शेटजी यांनीं तुमच्या कुटुंबाला पळवून दुसरीकडे नेऊन ठेविलें.'

**राक्षस** ह्मणाला, 'अरेरे! तो भटोबा (**चाणक्य**) फारच क्रूर आहे. त्याच्या विरुद्ध **चंदनदासानें** ही गोष्ट केली हें चांगलें केलें नाहीं.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'तें कदाचित् अयोग्य असलें तर असो; पण त्यानें तसें न केलें असतें तर मित्रद्रोह झाला असता, व तो तर त्याच्याहीपेक्षां अयोग्य!'

**राक्षस** ह्मणाला, 'मग पुढें काय झालें?'

**विराधगुप्त** ह्मणाला, '**चाणक्यानें चंदनदासाला** बोलावून, तुमचें कुटुंब आपल्या हवालीं करण्याविषयीं पुष्कळ सामोपचाराच्या गोष्टी सांगितल्या, तथापि त्यानें तें मुळींच कबूल केलें नाहीं, ह्मणून अत्यंत रुष्ट होऊन **चंदनदासाला**—त्याच्या घरांत काय होतें नव्हतें तें सारें लुटून पोरांबाळांसहवर्तमान प्रतिबंधांत ठेविलें.'

हें ऐकून **राक्षस** ह्मणाला, 'तर मग, माझ्या कुटुंबाला **चंदनदासानें** पळविलें ह्मणून मोठ्या संतोषानें काय सांगतोस ! **चंदनदासाला** प्रतिबंधांत ठेविलें, या योगानें त्या चाणक्यबटूनें पोरांबाळांसहवर्तमान **राक्षसाला** करकरून बांधला असेंच कां ह्मणेसना !'

**विराधगुप्त कुसुमपुराहून** निघाला त्यापूर्वी वर सांगितलेल्या सर्व गोष्टी घडल्या होत्या. **शकटदासाला** सुळावर चढविण्याचा हुकूम झाला, व त्याप्रमाणें सुळीं देणार, हें वर्तमान त्यानें ऐकलें होतें; पण **सिद्धार्थकानें** त्याला तेथून सोडवून नेलें, हें त्याला ठाऊक नव्हतें, ह्मणून **शकटदासाला** सुळावर दिलें असेंच त्यानें **राक्षसाला** सांगितलें.

**शकटदास** तेथून पळून गेला, त्यानंतर **विराधगुप्त कुसुमपुरांतून** निघाला. तथापि तो अतिशय घाईनें निघाल्यामुळें **शकटदास राक्षसाजवळ** येऊन पोंचण्यापूर्वींच तो आला. मागाहून **शकटदासही सिद्धार्थकासहवर्तमान** हळुहळू मार्गक्रमण करीत करीत **राक्षसाजवळ** येऊन पोंचला. योगायोग असे घडून आले कीं, **विराधगुप्त राक्षसाला कुसुमपुराकडील** वर्तमान सांगत असतां, तोही दरवाज्यावर आला, तेव्हां एक हुजऱ्या आंत येऊन **राक्षसाला** मुजरा करून ह्मणाला, 'बाहेर **शकटदास** आपल्या भेटीची वाट पहात आहे.'

हें त्याचें सांगणें **राक्षसाला** प्रथम खरें वाटलें नाहीं. कारण, नुकतेंच **विराधगुप्तानें** त्याला सुळावर चढविल्याचें वर्तमान सांगितलें होतें, ह्मणून **राक्षस** हुजऱ्याला ह्मणाला, 'बाबा, तूं सांगतोस हें खरेंच का ! **शकटदास** बाहेर

आला आहे आणि तो माझ्या भेटीची इच्छा करतो आहे, यांत कांहीं खोटें नाहीं ना ?'

हुजऱ्या ह्मणाला, ' सरकार, मी कधींही आपल्या पायांजवळ खोटें बोललों आहें का? '

हें ऐकून **राक्षस विराधगुप्ता**कडे पाहून ह्मणाला, ' गड्या , हा सांगतो हें काय, तें तूं ऐकलेंस ना ?'

**विराधगुप्त** ह्मणाला, ' हो, नाहीं कोणी ह्मणावें ! कदाचित् तसेंही होईल. कारण, ज्याचें नशीब सबळ असेल, त्याला भवितव्यता रक्षण करीत असते. '

**राक्षस** हुजऱ्याला ह्मणाला, ' अरे **प्रियंवदका**, तर मग वेळ कां लावतोस! त्याला लवकर आंत घेऊन ये.'

याप्रमाणें हुकूम होतांच **प्रियंवदक** बाहेर जाऊन त्यानें **शकटदासाला राक्षसा**जवळ आणलें. **शकटदास** या वेळीं आपल्या मनांत ह्मणाला, काय सांगावें! या पृथ्वीच्या पोटांत जणूं काय सूळच रोंविला आहे असें त्या **चंद्रगुप्ता**चें सिंहासन सुस्थिर झालेलें पाहून, व अंतःकरणाला कालवून सोडणारी अशी त्याची राज्यलक्ष्मी, हीच कोणी एक सुळावर चढविण्याला नेलेल्या पुरुषाच्या गळ्यांतली माळ, तिला पाहून, व आमच्या यजमानांच्या विरुद्ध ते ज्या गर्जना करितात त्याच कोणी एक हलग्या, त्यांचा शब्द ऐकून, हें माझें कठीण मन नष्ट झालें नाहीं हें मोठें वाईट झालें. **राक्षसा**कडे पाहून ह्मणाला, ' राजा **नंद** जरी क्षीण झाला, तथापि ज्याची स्वामिभक्ति क्षीण झाली नाहीं, व आपल्या यजमानाकरितां जो एकसारखा झटणारा असा हा अमात्य **राक्षस**, ह्या पृथ्वीवर स्वामिभक्तांचा मासला कसा असतो तो

दाखविण्याकरितांच कीं काय, जिवंत राहिला आहे.'

त्याच्या जवळ जाऊन, 'दिवाणजीचा जयजयकार असो,' असें ह्मणाला. त्याला पाहून **राक्षस** हर्षानें एकदम आसनावरून उठून, 'सख्या **शकटदासा,** त्या दुष्ट **चाणक्या**च्या हातांत सांपडलास असूनही तूं दैवानें सुटलास, तर आतां मला एकदां कडकडून भेट,' असें बोलून **राक्षसानें** त्याला मिठी मारली.

बराच वेळ मित्राच्या भेटीचा आनंद अनुभवून **राक्षसानें** त्याला आसनावर बसवून घेतलें. कांहीं वेळ दोघेही सद्गदित झाल्यामुळें एकमेकांशीं बोलण्यास समर्थ झाले नाहींत. नंतर **राक्षस** आपलें मन स्थिर करून ह्मणाला, 'सख्या **शकटदासा,** यावेळीं तुझी भेट माझ्या हृदयाला एवढा मोठा आनंद देण्याला कारण कशी झाली, ती सांग.'

**सिद्धार्थक** त्याच्याबरोबरच होता. **शकटदास** त्याच्याकडे बोट दाखवून ह्मणाला, 'वस्तुतः तुमची भेट होण्याचा संभवच नव्हता; पण हा प्रियमित्र **सिद्धार्थक** यानें सुळावर चढविणाऱ्या मांगाला पिटाळून लावून तेथून मला पळवून आणलें, ह्मणून याच्या कृपेनें हा योग आला.'

**शकटदास** हा राक्षसाचा जिवलग मित्र होता. **सिद्धार्थकाशीं** त्याचा कांहीं संबंध नव्हता, तरी **शकटदासाला** त्यानें वांचविलें हें ऐकून **राक्षसाला** मोठा आनंद झाला. तो ह्मणाला, 'बाबा **सिद्धार्थका,** तूं जें काम केलेंस त्याच्या लायक असें दुसरें कांहींच नाहीं, तथापि हें थोडेंसें तुला बक्षीस घे.' असें ह्मणून त्यानें आपल्या अंगावरचे सर्व दागिने काढून **सिद्धार्थकाला** दिले.

ते दागिने घेऊन **सिद्धार्थकानें** **राक्षसाला** नमस्कार केला. तो बोलूनचालून **चाणक्याचा** हेरच होता. तो मनांत ह्मणाला, वाहवा! आर्य **चाणक्य** विलक्षण बुद्धिमान् खरा. त्यानें मला सांगितलें तें तसेंच अनुभवास आलें. असो; आपण आतां त्याच्या सांगण्याप्रमाणें पुढची व्यवस्था करावी.

**राक्षसाला** ह्मणाला, 'महाराज, मी या ठिकाणीं नवाच आलों आहें. माझ्या परिचयाचें येथें कोणी नाहीं. तेव्हां हे दागिने मी ठेवावे कोठें? माझी अशी विनंती आहे कीं हे आपल्याच जवळ असतील तर बरें. ही मोहोर केली ह्मणजे झालें. ज्या वेळीं मला गरज लागेल त्या वेळीं मी मागून घेईन.'

यावर **राक्षस** ह्मणाला, 'बाबा, असेनात कां! काय हरकत आहे? **शकटदासा,** तो सांगतो त्याप्रमाणें मोहोर करून त्याचे दागिने ठेवून घ्या.'

**राक्षसानें** याप्रमाणें कबूल केलें, तेव्हां **सिद्धार्थकानें** आपल्या हातांतली मोहरेची आंगठी काढून **शकटदासा**च्या हातांत दिली. **निपुणक** नांवाचा **चाणक्याचा** हेर प्रधानादिकांची हालचाल समजण्याकरितां **कुसुमपुरांत** संचार करीत असतां, ती आंगठी त्याला **चंदनदासाच्या** घरीं मिळाली. ती त्यानें **चाणक्याजवळ** दिली असून, **चाणक्यानें** पुढच्या कार्याकरितां ती **सिद्धार्थकाला** दिली होती.

**राक्षसाच्या** नांवाची आंगठी पाहून **शकटदासानें** हळूच ती **राक्षसाला** दाखविली, आणि 'तुमच्या नांवाची ही आंगठी ह्याच्या हातांत कशी प्राप्त झाली,' ह्मणून विचारलें.

तेव्हां **राक्षस** ती आंगठी हातांत घेऊन मनांत ह्मणाला, बरोबर, मी **कुसुमपुरांतून** निघालों त्या वेळीं तिनें ( बायकोनें ), आपल्याला कर्मणुकीकरितां एवढी असूं द्या, ह्मणून मुद्दाम माझ्या हातांतून ही आंगठी काढून घेतली होती; पण ती याच्या हातांत कशी आली हें कांहीं समजत नाहीं. **सिद्धार्थकाला** म्हणाला, 'बाबा, ही आंगठी कोठून तुझ्या हातांत आली?'

हें ऐकून **सिद्धार्थक** म्हणाला, 'महाराज, **कुसुमपुरांत** **चंदनदास** नांवाचा प्रसिद्ध जवाहिऱ्या आहे, त्याच्या दरवाजाच्या जवळ ही पडली होती, ती मला मिळाली.'

हें ऐकून **राक्षस** म्हणाला, 'बरोबर, आतां मात्र जुळतें खरें.'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'दिवाणसाहेब, जुळतें असें आपण म्हटलें. पण येथें जुळण्यासारखें काय आहे?'

**राक्षस** म्हाणाला, 'बाबा, मोठे द्रव्यवान् लोक असतात त्यांच्याच घरीं अशा जिनसा कोठें तरी पडतात, व त्या कोणाला तरी मिळतात. गरिबांच्या घरीं कोठून मिळणार, असें मी म्हटलें.'

**शकटदास** ह्मणाला, 'मित्रा **सिद्धार्थका,** ही आंगठी अशी तशी नाहीं. दिवाणजींच्या नांवाची यावर मोहोर आहे, तेव्हां हिच्या संबंधानें दिवाणसाहेब तुला पुष्कळ द्रव्य देऊन खुष करतील. ही त्यांची आंगठी त्यांना परत दे.'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'महाराज, दिवाणसाहेब ही आंगठी घेतील तर मजवर मोठा अनुग्रहच होईल. त्याविषयीं माझ्याकडून ना मुळींच नाहीं.' असें बोलून त्यानें ती आंगठी **राक्षसाच्या** हातांत दिली.

तीच आंगठी **राक्षसानें** **शकटदासाच्या** हवालीं करून, 'तुझ्याकडून जे कागदपत्र वगैरे बाहेर जातील त्यांवर तूं हीच मोहोर करीत जा' असें सांगितलें.

**शकटदासानें** ती गोष्ट मान्य केली. नंतर **सिद्धार्थक** हात जोडून ह्मणाला, 'दिवाणसाहेब, माझी एक विनंती आहे.'

**राक्षस** ह्मणाला, 'काय तुझें ह्मणणें असेल तें खुशाल मोकळ्या मनानें सांग.'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'महाराज, दुसरें काय सांगावयाचें आहे? त्या **चाणक्यबटूचें** अप्रिय करून **कुसुमपुरांत** राहण्याची कोणाचीही छाती होईल असें मुळींच नाहीं, हें आपल्यालाही माहीत असेलच. मीं तर उघडउघड त्याच्या विरुद्ध वर्तन केलें आहे. तेव्हां आतां तिकडे जाण्याची मला आशा करावयास नको, म्हणून माझ्या मनांत आपल्या पायांची सेवा करून येथेंच रहावें असें आहे.'

**शटकदासाला** त्यानें वांचविलें म्हणून **राक्षस** सर्व प्रकारें त्याचा आभारी झाला होता. तशांतून **चाणक्याच्या** विरुद्ध वर्तन करणारे लोक मिळतील तितके त्याला पाहिजेच होते, व **सिद्धार्थकानें** त्याच्या नांवाची आंगठी आणून दिली होती, व स्वतः ती आंगठी **राक्षसानें** मागितल्यावरून **सिद्धार्थकानें** दिली. वस्तुतः ती **राक्षसाला** हार खाण्याची दोरीच दिली, असें म्हटलें तरी चालेल. पण **राक्षसाला** तिची प्राप्ति झाल्यामुळें मोठा आनंद झाला होता. ह्मणून तो **सिद्धार्थकाला** म्हणाला, 'बाबा, तूं म्हणतोस तसें करशील तर आह्मांला फार संतोष होईल. आह्मी होऊनच तुला तसें करण्यास सांगावयाचें; पण तुझा अभिप्राय काय

आहे हें न समजल्यामुळें इतका विलंब लागला, तर तूं खुशाल आमच्या येथें रहा. व हें घर आपलें आहे असें समज.'

वस्तुत: **सिद्धार्थकाला** कोणतीही अडचण नव्हती, व त्याला **राक्षसाच्या** चाकरीची मुळींच गरज नव्हती; पण **चाणक्यानें** त्याला जी कामगिरी सांगितली होती, ती करण्याकरितांच त्यानें मुद्दाम हें सर्व ढोंग केलें होतें.

**राक्षसानें** आपल्या घरीं राहण्याविषयीं आज्ञा दिली तेव्हां मोठा आनंद झाल्यासारखें दाखवून **सिद्धार्थक** त्याच्या पायांवर डोकें ठेवून ह्मणाला, 'महाराज, खरोखर आपण हा मजवर मोठा अनुग्रह केला.'

**राक्षस** ह्मणाला, '**शकटदासा,** तुला पुष्कळ श्रम झाले असतील, व हा **सिद्धार्थक**ही बिचारा श्रमला असेल, तर याला घेऊन जा आणि तुह्मी खुशाल विश्रांति घ्या.'

याप्रमाणें त्याची आज्ञा होतांच, **शकटदास सिद्धार्थकाला** घेऊन दुसऱ्या चौकांत गेला. **शकटदासाशीं** हें **राक्षसाचें** बोलणें चाललें होतें तोपर्यंत **विराधगुप्त** मुकाट्यानें तेथें बसला होता. ते दोघेही निघून जातांच **राक्षस** त्याला ह्मणाला, 'सख्या **विराधगुप्ता,** तुझें आणखीं कांहीं सांगायाचें राहिलें असेल तर तें आतां सांग. बरें, पण मला एक गोष्ट अवश्य समजून घ्यावयाची आहे. त्या दुरात्म्या **चंद्रगुप्ताचा** नाश करण्याकरितां आह्मी जे कांहीं प्रयत्न करितों, ते दरबारांतल्या लोकांना सहन होतात किंवा नाहीं व त्यांविषयीं त्यांचा काय अभिप्राय आहे तें सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'दिवाणसाहेब, खरें विचाराल तर दरबारांतल्या सर्व मंडळीला हे तुमचे प्रयत्न मनापासून

आवडतात. व ज्यांना जशी सवड मिळेल तसे ते या कामीं अनुकूळ होतात. कित्येक उघडपणें देखील त्याला आपली संमति देतात. आणखीं दुसरी एक तेथें प्रसिद्धि झाली आहे.'

हें ऐकून **राक्षसाला** अंमळ उमेद आली. तो ह्मणाला, 'कसली कसली ती प्रसिद्धि आहे, तें सांग.'

**विराधगुप्त** ह्मणाला, 'तेथें अशी अफवा उठली आहे कीं, **मलयकेतु** पळून गेला त्या दिवसापासून **चंद्रगुप्त चाणक्यावर** फार रागावला आहे, असें लोक ह्मणतात. तसेंच **चाणक्यही**, त्याची विशेष प्रतिष्ठा झाली असून जिकडे तिकडे दरारा बसला असल्यामुळें, **चंद्रगुप्ताला** मुळींच मानीत नाहीं. ज्या त्या कामांत **चंद्रगुप्ताचा** अपमान करून तो त्याला फार क्लेश देतो, असेंही लोकांत प्रसिद्ध झालें आहे. ही ह्मणजे केवळ ऐकींव गोष्ट आहे असें नाहीं. **चाणक्य चंद्रगुप्ताचा** अपमान करतो हें माझ्यासुद्धां पाहण्यांत आलें आहे.'

हें ऐकून **राक्षसाला** अतिशय आनंद झाला. तो म्ह-णाला, 'गड्या **विराधगुप्ता**, तर मग, आमचें काम फत्ते होईल असें वाटतें. नुकताच तूं श्रमून आला आहेस, तरी मी तुला आतांच दुसऱ्या एका कामगिरीवर नेमतों. तूं आतां येथें विश्रांति घेत बसूं नको. ह्याच वेषानें असाच परभारें तूं **कुसुमपुराला** जा, आणि तेथें माझा प्रियमित्र **स्तनकलश** नांवाचा भाट आहे, त्याला माझ्या सांगण्यावरून असें सांग कीं, **चाणक्यानें चंद्रगुप्ताचा** आज्ञाभंग केला म्हणजे त्या त्या वेळीं तूं **चंद्रगुप्ताला** ईर्षा चढेल अशा तऱ्हेच्या कविता रचून त्या त्याला ऐकवीत जा. आणि वरचेवर कांहीं महत्त्वाची गोष्ट होईल ती **करभक** नांवाच्या तुझ्या

मित्राच्या हातीं मला सांगून पाठवीत जा. असा माझा त्याला निरोप सांग.'

**विराधगुप्त** हात जोडून ह्मणाला, 'जशी आपली आज्ञा असेल त्याप्रमाणें करतों.'

**राक्षसानें** त्याला आग्रहपूर्वक सांगितल्यावरून **विराधगुप्त** परत **कुसुमपुराकडे** जाण्यास निघाला.

**चंद्रगुप्तानें पर्वतकाची** उत्तरक्रिया केली असून, **पर्वतराज** बहुमोल असे जे तीन दागिने आपल्या अंगावर धारण करीत होता, ते **चाणक्यानें** पाठविलेल्या **विश्वावसु** इत्यादि तिघां ब्राह्मणांला, देण्याचा संकेत झाला होता हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें ते तीनही दागिने त्या तिघां ब्राह्मणांनीं **चंद्रगुप्तापासून** दान घेतले, व लगेच **चाणक्याला** आणून दाखविले. तेव्हां **चाणक्यानें** त्याना जव्हेऱ्यांचा वेष घेऊन **राक्षसाकडे** जाऊन ते तीन दागिने त्याला विकून येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें **विश्वावसूनें** ते दागिने घेऊन जवाहिऱ्याच्या वेषानें ते विकण्याकरितां **राक्षसा**-जवळ आणले.

तो प्रथम दरवाज्यांत आला त्या वेळीं शिपायांनीं त्याला **शकटदासाची** भेट करवून दिली. **शकटदास** हा तेथें आल्यापासून **राक्षसाचा** कारभारीच झाला होता. त्यानें ते दागिने पाहून विकत घेण्याला योग्य आहेत असें समजून, हुजऱ्याच्या हातीं **राक्षसाला** निरोप पाठविला, व ते तीन दागिनेही त्याच्याकडे धाडले.

**राक्षसानें**, ते **पर्वतराजाचे** दागिने आहेत किंवा दुसऱ्या कोणाचे आहेत, याविषयीं मुळींच चौकशी केली नाहीं; व त्याला तें मुळीं माहीतही नव्हतें. दागिने पाहतांच

त्याला ते पसंत पडल्यावरून त्यानें, लागेल तितकें द्रव्य देऊन ते खरेदी करावे, असा **शकटदासाला** निरोप पाठविला. व त्याप्रमाणें **शकटदासानें** त्यांची योग्य किंमत करून ते दागिने विकत घेतले.

**स्तनकलश** नांवाच्या चारणाला* (भाटाला) सांगण्याकरितां **विराधगुप्ताला कुसुमपुराकडे** पाठविलें होतें, व तिकडून उत्तर आणण्याकरितां **करभकाची** योजना केली होती; पण तो **करभक राक्षसाजवळच** होता. त्याला काय सांगायाचें तें सांगून **राक्षसानें** त्याला तिकडे रवाना केलें.

* **चारण** हा शब्द महाराष्ट्र लोकांस कांहींसा अपरिचित वाटेल. संस्कृत भाषेंत तर हा प्रसिद्धच आहे पूर्वकालीं राजेलोकाजवळ सूत, मागध, बंदी आणि **चारण** या नांवाचे लोक असत, व त्याचीं कामेंही निरनिराळीं नेमलेलीं असत. सूत आणि मागध या दोघांचें काम साधारणत एकच ह्मटलें तरी चालेल. राजाजवळ त्याच्या पूर्वजांचे गुणानुवाद मोठ्या सुरस रीतीनें वर्णन करणें हें यांचें मुख्य काम. बंदी ह्मणजे मराठींत ज्याना भाट ह्मणतात ते. हे मोठे बुद्धिमान् असून बहुश्रुत व चतुर असले पाहिजेत. प्रसंग पाहून एखाद्या गोष्टीचें योग्य रीतीनें राजाजवळ वर्णन करणें व त्याची स्तुति करून त्याला युद्धादिकांविषयीं प्रोत्साहन देणें हें यांचें मुख्य काम **चारण** ह्मणजे कथक अर्थात् समय पाहून उत्तम कथा सांगणारे. वेळोवेळीं अनेक दृष्टांत सांगून स्तुति वगैरे करून राजाचें मन एखाद्या गोष्टीकडे वळविणें अथवा त्याचा प्रतिकूल ग्रह होईल असें करणें, हें यांचें मुख्य काम. सांप्रत **राजस्थानांत** जीं जुनीं संस्थानें आहेत तेथें **चारण** या नांवाचे लोक आहेत; सूत, मागध आणि बंदी या नांवाचे मात्र कोठें अस त्याचें उपलब्ध होत नाहीं. **उदेपूर, जयपूर,** वगैरे संस्थानातील राजाच्या पदरीं जे **चारण** लोक आहेत त्यांचें दरबारांत मोठें वजन आहे. हे लोक केवळ स्तुतिपाठकच नसून ते त्या राजांचे पुरोहित बनले आहेत. धर्मसंबंधांत व चालीरीतींत यांच्या संमतीवाचून कोणताही फेरफार होऊं शकत नाहीं. हे चांगले बहुश्रुत असून देशभाषेंत कविता करतात. यानीं आपापल्या राजांचे कवितावद्ध इतिहास लिहिले आहेत. **राजपुतान्याचा** इतिहास याच्या ग्रंथांवरूनच मिळतो. प्रसिद्ध ग्रंथ **पृथुराजरास** याचा कर्ता **चंदबर्दायी** हा **चारणच** होता.

तो मनांत म्हणाला, काय! दुरात्मा **चाणक्य चंद्रगुप्ता**च्या विरुद्ध जाईल काय! **विराधगुप्ता**नें मला हें वर्तमान सांगितल्यावरून आपलें काम फत्ते होईल असें वाटतें. कारण, सांप्रत **चंद्रगुप्त** हा कांहीं सामान्य नाहीं. तो सार्वभौम पदवीचा अधिकारी झाला असून, इतर सर्व राजांला हुकूम करणारा झाला आहे. तेव्हां त्याच्या मनांत आपल्या पदवीचा मोठेपणा येणें अगदीं साहजिक आहे. **चाणक्य**ही मनांत समजत असेल कीं, **चंद्रगुप्त चंद्रगुप्त** ह्मणजे काय! हा माझ्या आश्रयानें एवढ्या योग्यतेला चढला आहे. तेव्हां **चाणक्याला** त्याची कांहींच पर्वा वाटत नसेल. एवढें मोठें राज्य आपल्या हातीं आल्यामुळें **चंद्रगुप्त** आपलें काम झालें असें मानीत असेल, व **चाणक्य** आपली प्रतिज्ञा पूर्ण झाली असें समजून स्वतःला कृतकृत्य मानीत असेल. तेव्हां या योगानें त्या उभयतांचें सख्य, ही कृतकृत्यताच खरोखर नाहींसें करील, यांत कांहीं संशय नाहीं.

---

## भाग तिसरा.

**राक्षस** ज्या **मलयकेतू**चा आश्रय करून राहिला होता व ज्याच्या जिवावर **चंद्रगुप्ता**चा नाश करण्याचा प्रयत्न करीत होता, त्याचें आणि त्याचें **चाणक्याला** परस्पर वैर पाडावयाचें होतें. **मलयकेतु** हा **राक्षसा**वर आपला पूर्ण विश्वास ठेवून बसला होता, व **राक्षस**ही त्याच्याशीं अगदीं शुद्धमनानें वागत होता, तेव्हां त्या दोघांत वैर उत्पन्न करावयाचें तें, **राक्षसाचें** मन आपल्याविषयीं शुद्ध नाहीं, अशी **मलयकेतूची** खातरी झाल्यावांचून, होणार

नाहीं ह्मणून **चाणक्यानें** तशा प्रकारचा प्रयत्न आरंभिला.

**विराधगुप्तानें**, **चाणक्याची** आणि **चंद्रगुप्ताची** आपसांत धुसफुस चालली आहे, असें जें **राक्षसाला** कळविलें तें खरें होतें. पण **चाणक्यानें चंद्रगुप्ताला** सांगून मुद्दाम तो प्रकार करविला होता. **राक्षसाचे** हेर **कुसुमपुरांत** फिरत असून ते वरचेवर त्याला इकडची खबर देतात हें **चाणक्याला** माहीतच होतें, ह्मणून तो पदोपदीं **चंद्रगुप्ताचा** अपमान करीत होता, व **चंद्रगुप्तही चाणक्याच्या** विरुद्ध वरचेवर उद्गार काढीत होता. **कुसुमपुरांतील** बहुतेक लोक मनापासून **राक्षसाच्या** पक्षाचे होते यामुळें **चाणक्य** आणि **चंद्रगुप्त** यांच्या दरम्यान बारीक सारीक कांहीं गोष्ट झाली तरी ती लोकांत तेव्हांच प्रसिद्ध होत होती. त्यावरूनच **विराधगुप्तानें राक्षसाला** तें वर्तमान कळविलें. आपलें आणि **चंद्रगुप्ताचें** हळुहळू वांकडें पडलें आहे, ही गोष्ट **राक्षसाच्या** कानावर गेली असून तो त्या संबंधानें फार खुष होऊन प्रयत्न करीत आहे, हें वर्तमान **चाणक्याला** समजलें. तेव्हां अगदीं उघडपणें **चंद्रगुप्ताशीं** भांडण करावें व तें वर्तमान **राक्षसाच्या** कानावर जावें असा विचार करून, **चाणक्यानें** कौमुदीमहोत्सवाच्या निमित्तानें तसें करण्याचा निश्चय केला.

**चंद्रगुप्तानें** कौमुदीमहोत्सव करण्याविषयीं हुकूम द्यावा व त्याप्रमाणें सर्व तयारी होऊन आयतेवेळीं **चाणक्यानें** तो मना करावा, असा त्या उभयतांचा निश्चय ठरला होता, त्याप्रमाणें **चंद्रगुप्तानें** आपल्या चोपदाराला हुकूम दिला. तेव्हां तो ह्मातारा चोपदार, काठी टेंकीत टेंकीत चाललण्याच्या भ्रमानें वैतागल्यासारखा होऊन ह्मणाला, 'ही

राजसेवा आतां पुरे झाली. हातीं मोठा अधिकार असल्यामुळें एक प्रकारें मनाला कांहीं आनंद वाटतो, पण अगांत शक्ति असली तर साऱ्या गोष्टी. आतां ह्या म्हातारपणीं मी खुशाल हरि हरि ह्मणत बसावें, पण बेटी आशा सुटत नाहीं. तिच्यामुळें, मधांत माशी घुटमळते त्याप्रमाणें माझा जीव घोटाळत आहे !'

आशेला उद्देशून ह्मणाला, 'हे तृष्णे ! शब्द, स्पर्श, रूप इत्यादि विषयांचा स्वीकार करून त्यापासून आपल्याला सुख मिळेल अशी तूं इच्छा केलीस; पण इंद्रियें शिथिल झाल्यामुळें त्यांच्यानें ते आपापले विषय घेववत नाहींत. तूं एखाद्या विषयाकडे मोठ्या जोरानें धांवत असतेस, पण विकळ झालेलीं हीं गात्रें तुझा हुकूम मुळींच मानीत नाहींत ! ह्या जरेनें तुझ्या डोक्यावर पाय दिला आहे, असें असून तूं उगीच कां तळमळतेस !'

अंमळ पुढें जाऊन **सुगांग** नांवाच्या राजवाड्यांतल्या महालावरच्या अधिकाऱ्याला हांक मारून ह्मणाला, 'कामदारांनो, महाराज **चंद्रगुप्त** तुह्मांला आज्ञा करीत आहेत कीं, आज शहरांत जिकडे तिकडे कौमुदीमहोत्सव सुरू झाला आहे. तेव्हां ह्या महालाच्या गच्चीवर बसून नगराची शोभा पहावी अशी सरकारची इच्छा आहे, तर ती गच्ची साफसुफ करून उत्तमप्रकारें सुशोभित करून ठेवा.'

वर सांगितल्याप्रमाणें कौमुदीमहोत्सव करण्याविषयीं **चंद्रगुप्ता**चा हुकूम सुटला होता, व त्याबरोबरच उत्सव वगैरे कांहीं एक करूं नये असा **चाणक्या**चा हुकूम झाला होता. **सुगांग** राजमहालावरच्या कामदारांला हे दोनही हुकूम माहीत होते. व राजाच्या हुकुमापेक्षां **चाणक्या**चा

हुकूम विशेष मान्य होईल असें समजून, ते कौमुदीमहोत्सव होणार नाहीं अशी आपल्या मनांत गांठ मारून स्वस्थ बसले होते.

चोपदारानें गच्ची शृंगारण्याविषयीं **चंद्रगुप्ताचा** हुकूम कळविला, तो ऐकून ते कामदार ह्मणाले, 'अहो, तुह्मी काय सांगतां हें? शहरांत उत्सव वगैरे कोणी कांहीं करूं नये असा दुसरा हुकूम केव्हांच झाला आहे, तें महाराजांला कळलें नाहीं का!'

**चाणक्य** आणि **चंद्रगुप्त** यांचीं काय कारस्थानें आहेत तीं कोणाला कळत नव्हतीं, ह्मणून नौकर लोक त्या संबंधानें कांहीं बोलत नव्हते. चोपदार ह्मणाला, 'अरे, तुह्मांला या गोष्टी कशाला पाहिजेत! तुमचे घडे भरले आहेत कीं काय? ह्या गोष्टी बोलणें ह्मणजे आतांच तुमच्या प्राणांवर बेतण्याचा प्रसंग आहे! मी सांगतों तसें तुह्मी मुकाट्यानें करा ह्मणजे झालें. तुह्मी लवकर उत्तम प्रकारची तयारी करा. सुवासिक वस्तु ज्यांना लावल्या आहेत व फुलांच्या माळा बांधल्या आहेत, अशा खांबाला पूर्णचंद्रासारख्या शुभ्र दिसणाऱ्या चंवऱ्या बांधा. जिकडे तिकडे चंदनाचे सडे घाला, फुलें विखरा, सिंहासन तयार करून ठेवा. याप्रमाणें सर्व तयारी होऊंद्या.'

चोपदाराचें हें भाषण ऐकून ते कामदार अतिशय भ्याले. ते आपसांत ह्मणाले, 'हा सांगतो हें खरें आहे. आपल्याला ती पंचाईत हवी कशाला? हुकूम होईल त्याप्रमाणें काम केलें ह्मणजे झालें. चोपदाराला ह्मणाले, 'दादा, हे पहा, आह्मी सरकारच्या हुकुमाप्रमाणें आतांच सर्व तयारी करतों.'

चोपदार ह्मणाला, 'हो हो, लवकर करा. सरकारस्वारी-

ही आलीच पहा. स्वस्थ असून मजबूत अशा आपल्या अवयवांनीं उंचसखल असलेल्या मार्गांत देखील एकसारखा चालणारा. व बहुत दिवस दुसऱ्या धूर ओढणाऱ्यानें वाहिलेला, असा मोठा राज्यरूपी गाड्याचा भार अगदीं तरुणपणांत आपल्या मानेवर घेण्याविषयीं ज्याचा दृढ निश्चय झाला आहे, असा हा **चंद्रगुप्त**रूपी वृषभ मोठा गंभीर असून वरचेवर हिसके बसले तरी दुःखित होत नाहीं.'

चोपदारानें सांगितल्याप्रमाणें **सुगांग**राजमहालांत तेथील लोकांनीं झटपट सर्व तयारी करून राजाला खबर दिली. तेव्हां **चंद्रगुप्त** जनानखान्यांतल्या चोपदारणीसहवर्तमान तिकडे जाण्यास निघाला. आपण हें जें भांडणाचें ढोंग केलें आहे, तें अखेरपर्यंत योग्य रीतीनें कसें पार पडेल, याची त्याला मोठी काळजी लागली होती, व वरचेवर तत्संबंधी विचार त्याच्या मनांत घोळत होते. तो आपल्याशींच ह्मणाला, हें राज्य ह्मणून जें कांहीं आहे तें आपल्या राजपणाला उचित कर्तव्य करणाऱ्या राजाला, लोकांची अप्रीति संपादन करण्याचें एक स्थानच आहे, असें ह्मटलें तरी चालेल. कारण, प्रजेकडून योग्य करभार इत्यादि वेळच्यावेळीं वसूल करून त्याची नीट व्यवस्था लावण्याकडे लक्ष्य दिलें, तर सारा दिवस तिकडेच मोडल्यामुळें राजाला स्वच्छंदपणा मुळींच मिळत नाहीं. बरें, तसें झालें ह्मणजे मग तो राजा तरी कसला? चाकराचा पडचाकर ह्मटला तरी चालेल. कदाचित् राजधर्म आहे ह्मणून स्वार्थ सोडून परार्थाविषयीं त्यानें यत्न करावा असें ह्मटलें, तर राजा पराधीन होतो, व पराधीन झालेल्या मनुष्याला सौख्य कधींही मिळावयाचें नाहीं. हेंच सर्वांच्या अनुभवास येत आहे.

आणखी दुसरें असें आहे कीं, इंद्रियनिग्रह करणाऱ्या अशा मोठ्या राजांच्या हातून देखील ह्या राजलक्ष्मीचें रक्षण होणें हें काम मोठें कठिण आहे. कारण, ही लक्ष्मी, कडक स्वभावाचा राजा असला तर, त्याच्याजवळ फार वेळ राहण्यास नाखुष असते. गरीब स्वभावाचा असला, तर लोक त्याचा अपमान करतात, ह्या दुःखानें ती त्याच्याजवळ देखील उभी राहत नाहीं. मूर्ख असला, तर त्याचा द्वेष करते. बरें, मोठा विद्वान् असला तथापि त्याच्यावर ह्मणजे ही प्रीति करील असेंही नाहीं. मोठा शूर असला तर त्यापासून भय पावते. भित्रा असला तर त्याचा उपहास करते. एकंदरींत—कामुकाला वश करून घेण्यांत विशेष प्रवीण झालेल्या वेश्येसारखी ही राजलक्ष्मी राजीखुषीनें संभाळणें फारच कठीण आहे !

सांप्रत माझ्यावर एक मोठेंच संकट आलें आहे. दाटून कांहीं तरी भांडण काढून थोडे दिवस अगदीं स्वतंत्ररीतीनें राज्यकारभार चालवावा अशी आर्य **चाणक्याची** आज्ञा झाली आहे. वस्तुतः **चाणक्याच्या** विरुद्ध एक अक्षर देखील तोंडावाटे काढणें हें माझ्यानें कधींही व्हावयाचें नाहीं. पण त्यांच्या आग्रहास्तव मी तसें करण्याचें कबूल करून, जाणूनबुजून निरुपायास्तव एकाद्या पातकाचा स्वीकार करावा, त्याप्रमाणें ती गोष्ट मीं मनांत आणली आहे. वस्तुतः मी परतंत्र आहें असें मानण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आर्य **चाणक्याच्या** हितकारक उपदेशानें माझ्या बुद्धीवर जे चांगले संस्कार घडत आहेत, त्यांच्या योगानें मी नेहमीं स्वतंत्रच आहें. कारण, मी कोणतेंही चांगलें काम करण्याविषयीं प्रवृत्त झालों असतां, गुरुजी

(**चाणक्य**) मला कधीं नको ह्मणत नाहींत. मूर्खपणानें जेव्हां रस्ता सोडून जाऊं लागेन, तेव्हां मात्र ते अंकुशासारखे आहेत. गुरूला मुख्यत्वें विनयाची अपेक्षा असते. तशा रीतीनें वागणारे शिष्य नेहमीं योग्य कामांत स्वतंत्रच असतात. याहून जें अधिक स्वातंत्र्य असेल त्याची आह्मांलाही गरज नाहीं.

**वैहीनरी** नांवाचा ह्मातारा चोपदार बरोबर होता, त्या-सहवर्तमान **चंद्रगुप्त सुगांग** नांवाच्या महालांत येऊन पोंचला. तेथें शृंगारलेल्या गच्चीवर उभा राहून आसमंतात्च्या प्रदेशाची शोभा पाहून ह्मणाला, 'ह्या शरदृतूची रमणीयता मोठी वर्णन करण्यासारखी असते. कारण, दिशा हळु-हळू स्वच्छ होत जातात. आकाशांत मेघ पांढरे सफेत इक-डून तिकडे संचार करितात. तसेच नद्यांचे प्रवाह बारीक बारिक होत जाऊन त्यांच्या दोहों बाजूंला सफेत वाळवंटें फारच सुशोभित दिसतात व त्यांवर मधुर शब्द करणारे सारसपक्षी संचार करीत असतात.

आकाशांत चंद्राचा स्वच्छ प्रकाश असल्यानें दाहाही दिशा उज्ज्वल दिसतात, व नक्षत्रांचा प्रकाशही फार रमणीय दिसतो. तुफान झालेले पाण्याचे प्रवाह या दिवसांत बेताबातानें वहात असतात. तशींच कणसें आलेलीं भातें, ऐश्वर्यवान् पुरुषाप्रमाणें, आपलें मस्तक नम्र करून असतात. त्यामुळें या शरदृतूनें सर्व लोकांला जणुं काय नम्रच केलें आहे असें वाटतें !'

नगराच्या जवळून वाहणाऱ्या गंगेच्या प्रवाहाकडे पाहून ह्मणाला, 'अनेक नद्या ह्याच कोणी एक ज्याच्या स्त्रिया, असा आपला पति जो समुद्र, याच्या पुष्कळ बायका अव-

लोकन करून, दुःखानें कृश होणाऱ्या अशा ह्या गंगेला, रतिकथा सांगणाऱ्या परम चतुर अशा दूतीप्रमाणें, ही शरद् समुद्राला नेऊन भेटविते.'

इतक्यांत त्याला कौमुदीमहोत्सवाची आठवण झाली, आणि चहूंकडे पाहून ह्मणाला, 'अरे, पण हें काय! ह्या कुसुमपुरांत कौमुदीमहोत्सव सुरू झाल्याचें कोठेंच कांहीं चिन्ह दिसत नाहीं!' चोपदाराला ह्मणाला, 'आर्या वैहीनरे, अरे, माझ्या हुकुमाप्रमाणें सर्व शहरांत कौमुदीमहोत्सव करावा अशी लोकांना वर्दी दिली होती कीं नाहीं?'

चोपदार ह्मणाला, 'होय महाराज. तेव्हांच चोहोंकडे जाहीर केलें होतें.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'तर मग, कोठें कांहीं हालचाल दिसत नाहीं, यावरून शहरवासी लोकांनीं माझा हुकूम मानला नाहीं कीं काय?'

चोपदार कानांवर हात ठेवून ह्मणाला, 'शिव! शिव! असें कसें होईल? साऱ्या पृथ्वीवर महाराजांचा हुकूम अमान्य करण्याची कोणाचीच छाती नाहीं, तेथें नगरवासी लोकांना तो अमान्य करण्याचें धैर्य कोठून येईल?'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'तर मग अद्यापि शहरांत उत्सव सुरू झाला नाहीं, हें काय? चतुर व अनेक हास्यविनोदाच्या कथा सांगण्यामध्यें निपुण अशा विट*, चेट†, इत्या-

* विट हा शब्द मराठींत अप्रसिद्ध आहे. साहित्यशास्त्रकारानी याचें लक्षण असें वर्णिलें आहे कीं, "ज्यानें स्त्रियांच्या नादाला लागून सर्वस्व घालविलें आहे, जो स्वभावतः मोठा धूर्त व चौसष्ट कला ज्याला थोडथोड्या येत आहेत, जो वेश्याला खुष करण्याच्या कामांत मोठा चतुर व चांगला वक्ता असून मधुर भाषण करणारा व चारचौघांस मान्य असून चांगल्या वंशांत उत्पन्न झालेला तो विट." विट हे एक प्रकारचे वेश्याचे अनुचर, असे ह्मटलें तरी चालेल. [वयाचा.

† चेट म्हणजे गुलाम अथवा बंदा. हा बहुतकरून हीन जातीचा असा-

दिकांसहवर्तमान वेश्यांचे थवे शहरांत इकडून तिकडे अद्यापि मोठमोठ्या रस्त्यांवरून संचार करीत नाहींत. तसेंच एकमेकांच्या चढाओढीनें उंचउंच वस्त्रें व अलंकार इत्यादिक धारण करून नागरिक जन प्रियांसहवर्तमान संचार करीत नाहींत. यावरून त्यांनीं उत्सव मुळीं केलाच नाहीं असें वाटतें.'

चोपदार ह्मणाला,'होय सरकार, असें दिसतें तर खरें.'

राजा ह्मणाला, 'पण तें असें कां तें सांग.'

चोपदार ह्मणाला, 'त्यांत असें आहे.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'असें मोघम बोलूं नको. काय तें उघड सांग.'

चोपदार ह्मणाला, 'होय, आज्ञेप्रमाणें सांगतों. कौमुदी-महोत्सव करूं नये, अशी ताकीद झाली होती.'

हें ऐकून **चंद्रगुप्त** मुद्दाम राग आल्यासारखें दाखवून ह्मणाला, 'काय? उत्सव करूं नये ह्मणून सांगितलें! बरें, कोणीं सांगितलें तें?'

**चाणक्यानें** सांगितलें होतें, हें चोपदाराला ठाऊक होतें, तरी भीतीमुळें **चाणक्याचें** नांव घेण्याची त्याची छाती झाली नाहीं. तो ह्मणाला, 'महाराज, यापुढची गोष्ट मी विदित करूं शकत नाहीं.'

राजा ह्मणाला, 'प्रेक्षकांच्या दृष्टीला अतिशय आनंद देणारा हा रमणीय उत्सव आर्य **चाणक्यानें** तर बंद केला नसेलच.'

चोपदार ह्मणाला, 'महाराज, जिवंत रहावें अशी ज्याची इच्छा असेल असा दुसरा कोण मनुष्य आपला हुकूम तोडण्याचें साहस करील!'

**वैहीनरीनें** पर्यायमात्रानें, कौमुदीमहोत्सव **चाणक्या**-नेंच बंद केला, असें सांगितलें तेव्हां **चंद्रगुप्ताला** फारच राग आला. तो आसनावर बसून चोपदाराला ह्मणाला, 'आर्य **चाणक्याची** या वेळीं भेट घ्यावी अशी माझी इच्छा आहे. तर त्याला बोलावून घेऊन ये.'

हें ऐकून **वैहीनरी** मुजरा करून **चाणक्याच्या** घरीं गेला.

इकडे **चाणक्य** अनेक मसलती योजीत असून, **राक्षस** आपला द्वेष करितो ह्मणून रागावला होता. तो त्याला उद्देशून ह्मणाला, 'अरे दुरात्म्या **राक्षसा**, तूं माझ्याशीं द्वेष करतोस हें चांगलें नव्हे. जसा **नंदाचा** द्वेष करून मी त्याच्या नगरांतून, रागावलेल्या सर्पासारखा, बाहेर निघालों आणि सतत प्रयत्न करून **नंदाला** मारून, **चंद्र-गुप्ताला** राज्यावर बसविलें, तसा तूंही रागानें **कुसुमपुरां**-तून बाहेर जाऊन **चंद्रगुप्ताचें** ऐश्वर्य हरण करण्याविषयीं इच्छा करीत आहेस. माझ्यापेक्षांही आपलें शहाणपण विशेष दाखविण्याचा तुझा इरादा आहे. पण **राक्षसा**, हें खूप समज कीं, प्रसंग माझ्याशीं आहे.' आकाशाकडे लक्ष्य लावून ह्मणाला, 'अरे **राक्षसा**, अरे **राक्षसा**! नको उगीच, तूं हें संकट आपल्या अंगावर घेऊं नकोस. हें सो-डून दे. स्वतः उन्मत्त झाला असून दुष्टप्रधानांवर ज्यानें सर्वस्वी भार टाकला होता, तो **नंद** या वेळीं गादीवर नाहीं आहे. हा राजा **चंद्रगुप्त** आहे. आणि **नंदाच्या** वेळचा मुख्य प्रधान जो तूं तोही अधिकारावर नसून, मी **चाणक्य** या वेळीं अधिकारावर आहें. तुझें मुख्य वैर काय तें माझ्या कीर्तीचें अनकरण करावें हेंच दिसतें.

पुनः कांहीं वेळ विचार करून ह्मणाला, 'याबद्दल मी इतका खेद करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. कारण, माझे विश्वासू सेवक **भागुरायण** इत्यादिक यांनीं **पर्वतराजाचा पुत्र मलयकेतु**, याला अगदीं वेढून टाकिलें आहे. व ते **सिद्धार्थक** इत्यादिक माझे सेवक आपआपल्या कामाविषयीं उद्युक्त आहेत. सांप्रत **चंद्रगुप्ता**शीं मीं कपटकलह करण्याचा घाट घातला आहे. आतां **चंद्रगुप्ता**शीं भांडण करून पुढें योजून ठेविलेल्या युक्तीप्रमाणें या शत्रूचा भेद मी करीन.'

**चाणक्य** याप्रमाणें विचार करीत बसला आहे तों, ह्मातारा चोपदार तेथें येऊन पोंचला. खरोखर, त्या चोपदाराला या वेळीं मोठें संकट पडलें होतें. आधींच तो ह्मातारपणामुळें वैतागला होता व त्यांतून सांप्रतचा प्रसंग तर फारच भयंकर होता. **चाणक्या**च्या विरुद्ध कांहीं बोलावें, तर तिकडून भय व **चंद्रगुप्ता**च्या विरुद्ध बोलावें, तर तिकडूनही भय. अशी कांहीं त्याची विलक्षण स्थिति झाली होती. तो ह्मणाला, ही राजसेवा मोठी कठीण खरी. आधीं राजाचें भय बाळगलें पाहिजे. पुढें त्याच्या प्रधानाचें—तसेंच राजाच्या मेहेरबानींतल्या मनुष्यांचें, तसेंच राजवाड्यांत असलेल्या रिकामटेकड्या व खुषमस्कऱ्या लोकांचें भय बाळगलें पाहिजे. असें एकाचें कीं दोघांचें ! कितिकांचें तरी भय बाळगावें ? हें एवढेंसें पोट जाळण्याकरितां कोणीं डोळे वटारले तर उगीच खालीं मान घालून उभें राहिलें पाहिजे ! अत्यंत हीनपणा देणाऱ्या ह्या चाकरीला श्ववृत्ति (कुत्र्याचें जिणें) ह्मणतात तें अगदीं खरें आहे !

असो; आपल्या नशिबीं तेंच लिहिलें आहे. यजमानांच्या हुकुमाप्रमाणें या आर्य **चाणक्या**च्या घरापर्यंत तर आलोंच. आतां आंत जाऊन त्याला राजाचा निरोप सांगितला ह्मणजे झालें.

**चाणक्य** एक प्रकारें **चंद्रगुप्ता**च्या राज्याचा धनीच होता, असें ह्मटलें तरी चालेल. सर्व पृथ्वीचीं राज्यसूत्रें त्याच्या हातांत होतीं. एवढा मोठा अधिकारी असूनही तो स्वतः अगदीं निरपेक्ष होता. दरवाज्यावर पाहरा करणारे शिपाई तर नव्हतेच; पण एखाद्या तपस्वी ब्राह्मणाचा आश्रम असावा, त्याप्रमाणें त्याच्या घरची स्थिति होती. चोपदार त्याच्या दरवाज्याच्या आंत गेला आणि एवढ्या मोठ्या सार्वभौमाच्या दिवाणाच्या घरचें ऐश्वर्य पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें. तो ह्मणाला, 'ह्या पुरुषाच्या निरपेक्षतेची कमाल आहे. ही याच्या अंगणांत दगडाची कपर पडली आहे ती, बहुतकरून अग्निहोत्रांत घालायचे सुकलेले शेणाचे गोळे फोडण्याकरितां ठेविली असावी असें वाटतें. हा येथें शिष्यांनीं आणलेल्या समिधांचा भारा पडला आहे. बरें, घर पाहिलें तर वरचें आस्तरण जुनें झालें असून, कौलें देखील नाहींत; गवतानें शाकारलेलें आहे. भांड्यांकुंड्यांचें नांव देखील नाहीं. जिकडे पहावें तिकडे भोपळे व लोटकीं यांच्याशीं प्रसंग!

यावरून महाराज **चंद्रगुप्ता**ला हे वरचेवर हाक मारतांना वृषला वृषला (शूद्रा) ह्मणून हाक मारतात, हें योग्यच आहे. कारण, यांला कशाचीच गरज नाहीं. मग हे राजाची एवढी भीड कशाला ठेवतील! पुष्कळ लोक राजाच्या अंगीं नसलेल्या गुणांचें मोठ्या गौलतेनें वर्णन करून लोभाविष्ट

होत्साते त्याची स्तुति करितात. पण तो तृष्णेचा प्रभाव आहे. नाहींपेक्षां निस्पृह मनुष्याला राजा देखील तृणासारखा तुच्छ वाटतो!

वैहीनरी याप्रमाणें आपल्याशींच बोलत होता, तों समोर **चाणक्य** बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. **चाणक्याचा** दराराच कांहीं विलक्षण प्रकारचा होता. त्याला पाहतांच तो म्हातारा चोपदार चपापल्यासारखा होऊन म्हणाला, 'अरे! मी काय वेड्यासारखा बडबडतों आहें. हा आर्य **चाणक्य** येथें जवळच बसला आहे. ज्यानें **नंदराजाचा** अस्त करून **मौर्य** ( चंद्रगुप्त ) राजाचा उदय केला आहे, असा हा पर्यायानें शीतल व उष्ण प्रकाश पाडणारा तेजस्वी सूर्य, ह्या भगवान् सूर्यनारायणापेक्षांही, मोठा तेजस्वी आहे.'

असें बोलून **चाणक्याजवळ** जाऊन **वैहीनरीनें** गुडघे टेंकून त्याला नमस्कार केला, तेव्हां चोपदाराला पाहून **चाणक्य** ह्मणाला, '**वैहीनरे**, कां आला होतास?'

चोपदार ह्मणाला, 'महाराज, गडबडीनें नमस्कार करावयास येणाऱ्या हजारों राजांच्या मस्तकांवरील मुकुटांत खचलेल्या माणकांच्या प्रकाशानें ज्यांचें चरणकमल लाल दिसत आहे, अशा महाराज **चंद्रगुप्तांनीं** आपल्याला साष्टांग नमस्कार करून अशी विनंती केली आहे कीं, कोणत्याही कामाची हरकत नसेल तर मी आपल्या दर्शनाची इच्छा करीत आहें.'

**चाणक्य** ह्मणाला, '**वैहीनरे**, **चंद्रगुप्त** माझ्या भेटीची इच्छा करीत आहे काय? हा कौमुदीमहोत्सव मीं बंद केला हें वर्तमान तर त्याच्या कानांवर गेलें नाहींना?'

चोपदार ह्मणाला, 'महाराज, कसें न जाईल?'

हें ऐकून **चाणक्य** रागावून ह्मणाला, 'पण तें वर्तमान त्याला कोणीं सांगितलें?'

यावर चोपदार भिऊन ह्मणाला, 'महाराज, क्षमा असावी. कोणीं सांगितलें नाहीं. सरकारांनीं आपणच **सुगांग** नांवाच्या महालाच्या गच्चीवर जाऊन, शहरांत कोठें उत्सव सुरू झाला नाहीं असें पाहून तें जाणलें.'

**चाणक्य** ह्मणाला, 'तर काय, तो आपल्या आपणच समजला! आणि मग त्यावर तुह्मी खूप भर देऊन त्याला राग येईल असें केलें असेल नाहीं? असेंच असेल, आणखीं दुसरें काय असणार?'

याप्रमाणें **चाणक्यानें** उलट **वैहीनरी**वरच राग काढला. हें पाहून तो भयानें कांपत कांपत मान खालीं घालून उभा राहिला. त्याला पुनः **चाणक्य** ह्मणाला, 'समजलों. तुह्मी राजाच्या भोंवतालचे चाकरलोक माझा फार द्वेष करतां, हें मला पक्कें समजलें आहे. बरें पण यावेळीं **चंद्रगुप्त** कोठें आहे?'

चोपदार कांपत कांपत ह्मणाला, '**सुगांग** राजमहालाच्या गच्चीवर सरकारस्वारी बसली असून तेथून मला आपल्या पायांकडे पाठविलें आहे.'

हें ऐकून **चाणक्य** आसनावरून उठला, आणि **चंद्रगुप्ता**कडे जाण्यास निघाला. बिचारा तो ह्मातारा **वैहीनरी** लटलट पुढें चालला असून, **चाणक्य** दांत ओंठ खात त्याच्या मागून निघाला. वस्तुतः हें सारें ढोंगच होतें. जसा **चंद्रगुप्त** केवळ मुलाप्रमाणें त्याच्याशीं एकनिष्ठपणें वागत होता, तसा तोही सदय बापासारखा त्याच्यावर प्रेम ठेवीत होता.

**चाणक्य** राजवाड्यांत जाऊन **वैहीनरीनें** दाखविलेल्या मार्गानें गच्चीवर चढला आणि तेथें आसनावर बसलेल्या **चंद्रगुप्ता**ला पाहून मनांत ह्मणाला, शाबास, शाबास! कुबेराच्याही ऐश्वर्याला तुच्छ करणारें व दुर्दैवी **नंदा**ला अंतरलेलें असें सिंहासन सर्व राजांत परमश्रेष्ठ अशा या **चंद्रगुप्तानें** सुशोभित केलें आहे असें पाहून, व योग्य राजाशीं त्याचा समागम झाला ह्मणून मला फार आनंद होतो!

अंमळ पुढें जाऊन **चंद्रगुप्ता**ला ह्मणाला, 'तुझा विजय असो!' **चाणक्या**ला पाहतांच तत्काल आसनावरून उठून **चंद्रगुप्तानें** त्याचे पाय धरले. तेव्हां दोन्ही हातांनीं त्याला वर उठवून **चाणक्य** ह्मणाला, 'वरून पडणाऱ्या **भागीरथी**च्या उदकाच्या तुषारांनीं ज्याच्या शिळा गार झाल्या आहेत, अशा **हिमाचलापर्यंत** उत्तरेस, व तीरावर असणाऱ्या अनेक रंगांच्या रत्नांनीं चकचकीत दिसणाऱ्या क्षारसमुद्रापर्यंत दक्षिणेस, वारंवार भयभीत झालेले राजे तुला शरण येऊन आपल्या मस्तकावरच्या मुकुटांवरील रत्नांच्या किरणांनीं तुझ्या पायांच्या बोटांचे सांधे प्रकाशित करोत!'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'आर्या, आपल्या पायांच्या कृपेनें आपण ह्मणतां त्या ऐश्वर्याचा सांप्रत मी उपभोग घेतच आहें. आतां आसनावर बसावें.' याप्रमाणें त्याची विनंती ऐकून उभयतां आपापल्या आसनांवर बसले.

नंतर **चाणक्य** ह्मणाला, 'मला कां बोलाविलें होतेंस?'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'आपल्या दर्शनानें स्वतःवर अनुग्रह करून घेण्याकरितां बोलाविलें होतें.'

यावर **चाणक्य** हंसून ह्मणाला, 'हें नम्रपणाचें बोलणें एकीकडे असूंदे. राजेलोक कामदारांला निष्कारण कधींही बोलावीत नाहींत.'

**चाणक्याच्या** मनांत पूर्वसंकेताप्रमाणें भांडणाची सुरवात करावयाची होती, हें समजून **चंद्रगुप्त** ह्मणाला, 'बरें, कौमुदीमहोत्सवाची आपण मनाई केली असें समजलें, त्यांत आपण कोणता विशेष फायदा पाहिला?'

यावर **चाणक्य** हंसून ह्मणाला, 'तर मग आमची चांगली पूजा उतरण्याकरितां तूं आह्मांला बोलावून आणलेंस असें वाटतें.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'शिव शिव! असें कोण ह्मणतो? मी शिष्याच्या नात्यानें विनंती करण्याकरितां बोलाविलें आहे.'

**चाणक्य** ह्मणाला, 'असें असेल तर ज्यांच्या जवळ विनंती करावयाची असेल, त्यांना कोणतीही एखादी गोष्ट बरी वाटली आणि ती त्यांनीं केली, तर शिष्यांनीं त्या कामीं त्यांना प्रतिबंध करूं नये.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'होहो, बरोबर, आपण ह्मणतां तसेंच. पण आपण जें कांहीं कराल त्यांत कांहीं तरी हेतु असल्यावांचून रहावयाचा नाहीं. ह्मणून कौमुदीमहोत्सव बंद करण्यांत काय हेतु आहे, तो समजून घेण्याकरितां प्रश्न करण्याची मला सवड आहे.'

**चाणक्य** ह्मणाला, 'शाबास, चांगलें समजलास. कांहीं तरी हेतु असल्यावांचून हा **चाणक्य** अगदीं लहानसहान गोष्ट करण्याविषयीं देखील कधीं प्रवृत्त होणार नाहीं, हें अगदीं खरें आहे.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'आर्या, ह्मणूनच आपल्या मुखानें

सूचना केली असावी. पण कांहीं चिंता नाहीं. दुष्टा **राक्षसा**, तुला समजून येईल. हा **चाणक्य** निजला नाहीं, पुरता जागा आहे !

ते भाट **राक्षसानें** फितविलेले आहेत, हें **चंद्रगुप्तालाही** समजलें होतें; पण त्यानें, मुद्दाम त्यांनीं सुचविलेली गोष्ट आपल्याला मान्य झाली असें दाखविण्याकरितां, त्या दोघां भाटांला चांगलें बक्षीस देण्याविषयीं, चोपदाराला हुकूम केला.

राजाच्या हुकुमाप्रमाणें चोपदार भाटांला बक्षीस देण्यास जाऊं लागला, तेव्हां हीच उत्तम संधि आहे असें पाहून **चाणक्य** वैहीनरीला ह्मणाला, 'अरे थांब, जाऊं नको.' **चंद्रगुप्ताला** ह्मणाला, 'अरे निष्कारण हा एवढा मोठा खर्च करण्याचें काय कारण?'

हें ऐकून **चंद्रगुप्त** मोठा दुःखी होऊन ह्मणाला, 'जिकडून तिकडून मला आपण असे प्रतिबंध करूं लागलां, तर मला हें राज्यसें वाटणार नाहीं, केवळ बंदिशाळेसारखें होईल.'

**चाणक्य** ह्मणाला, 'अरे, स्वतः कारभार न करणाऱ्या राजांची अशीच स्थिति असते. तर तुला आमचें करणें आवडत नसल्यास तूं आपला कारभार स्वतः चालवीत जा ह्मणजे झालें.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'होहो, त्यांत काय अडचण? हा पहा मी आजपासून स्वतःच सर्व कारभार चालवितों.'

**चाणक्य** ह्मणाला, 'तसें होईल तर फार चांगलें. त्याचा आह्मांला मोठा संतोष वाटेल, व आह्मीही आपलें काम करण्यास लागूं.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'जर असें आहे तर कौमुदीमहोत्सव आपण कां बंद केला, तें आधीं ऐकण्याची माझी इच्छा आहे.'

**चाणक्य** ह्मणाला, 'कां बंद केला हें ऐकण्याची जशी तुला इच्छा आहे, तशी कौमुदीमहोत्सव करण्यांत काय अधिक आहे, तें मलाही ऐकण्याची इच्छा आहे.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'त्यांतलें मुख्य प्रयोजन ह्मटलें ह्मणजे माझा हुकूम तोडणें आणि माझ्या मनाला संताप देणें, हेंच बहुतकरून असावें असें वाटतें.'

**चाणक्य** ह्मणाला, 'हो हो, तुझा हुकूम अमान्य करायचा हेंच कौमुदीमहोत्सव बंद करण्याचें आमचें प्रयोजन आहे. कारण, तमालवृक्षाच्या कोवळ्या पानांसारखीं ज्यांच्या तीरांवरील अरण्यें काळीं भोर दिसत आहेत, व इतस्ततः संचार करणाऱ्या जलचरांनीं ज्यांचें उदक उचंबळविलें आहे, अशा चारही समुद्रांच्या गळ्यांतली केवळ माळा, अशी शेंकडों राजांनीं मस्तकावर धारण केलेली तुझी आज्ञा, फक्त माझ्याजवळच मात्र मोडली जाते. यामुळें माझ्या ठिकाणीं तुझी जी नम्रता आहे, तिच्या योगानें तुझें राजपण शोभिवंत दिसणारें आहे, असें सर्व लोकांला माहीत होतें. आणखी दुसरेंही कांहीं कारण ऐकावें असें तुझ्या मनांत असेल, तर तेंही सांगतों.'

**चंद्रगुप्त** म्हणाला, 'तर मग, काय आहे तें सांगावें.'

हें ऐकून **चाणक्य**, **शोणोत्तरा** नांवाची चोपदारीण जवळ उभी होती, तिला ह्मणाला, 'अग, तो कायस्थ **अचलजी** याला माझ्या आज्ञेवरून सांग कीं, **भद्रभट** इत्यादि मंडळी रागावून येथून पळून जाऊन **मलयकेतूच्या** आश्र-

याला राहिली, आणि तेथून त्यांनीं जें पत्र पाठविलें आहे तें मी मागतों ह्मणावें.'

हें ऐकून **शोणोत्तरा** त्या कायस्थाजवळ जाऊन पत्र घेऊन आली, तें **चाणक्य** आपल्या हातांत घेऊन **चंद्रगुप्ता**ला ह्मणाला, 'हें अमळ वाचून पहा.'

**चंद्रगुप्ता**नें तें पत्र आपल्या हातांत घेतलें आणि मनांतल्या मनांत वाचूं लागला. त्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर होता.—

'स्वस्तिश्री महाराज राजपूजित सार्वभौम श्री**चंद्रगुप्त**महाराज यांच्या सेवेशीं, आपल्या पायांच्या सेवेंत तत्पर असणारे मुख्य मुख्य सरदार भयानें पळून येऊन आपल्याला वध्य अशा **मलयकेतू**चा आश्रय करून राहिले आहेत. त्यांत पिलखान्यावरचा मुख्य अधिकारी **भद्रभट**, पागेवरचा अधिकारी **पुरुषदत्त**, मुख्य जमादार **चंद्रभानु** याचा भाचा **दिंगरात**, सरकारचा संबंधी महाराज **बलदेवगुप्त**, आपला अगदीं लहानपणचा सेवक **राजसेन**, आपला सेनापति **सिंहबल** याचा धाकटा बंधु **भागुरायण**, **माळव्या**च्या राजाचा मुलगा **लोहिताक्ष**, व क्षत्रियांत परम श्रेष्ठ **विजयवर्मा**, आह्मी इतकेजण महाराजांचे पाय सोडून येथें आलों आहों, तरी सरकारच्या कार्याविषयीं तत्पर आहो.'

याप्रमाणें पत्र वाचून **चंद्रगुप्त** ह्मणाला, 'आर्या, पत्रांत इतकाच मजकूर आहे. पण हे आमच्यावर नाराज झाले याचें कारण काय तें मला समजलें पाहिजे.'

वर दिलेलें पत्र हें खरोखर त्या **भद्रभट** इत्यादिकांनीं मुळींच पाठविलेलें नव्हतें. कारण, ते **कुसुमपुरां**तून

पळून गेले ते आपल्या इच्छेनें गेले नसून **चाणक्याच्या** सांगण्यावरूनच गेले, व त्यांनीं मुद्दाम **मलयकेतूचा** आश्रय केला. **राक्षसाच्या** मनांत **चाणक्य** आणि **चंद्रगुप्त** या उभयतांत वैर पाडावयाचें होतें, ह्मणून **चाणक्यानें** मुद्दाम हें एक बनावट पत्र तयार करून या वेळीं प्रसिद्ध केलें. येथें काय काय गोष्टी घडतात त्या **राक्षसाला** अचूक समजतात हें **चाणक्याला** माहीतच होतें. तेव्हां वर दिलेल्या पत्रांतील मजकुरावरून **चंद्रगुप्तावर** त्यांचा मुळींच राग नव्हता. काय तो **चाणक्याचा** त्यांना कंटाळा आला होता असें व्यक्त होत असून हें वर्तमान **राक्षसाला** समजलें ह्मणजे तो फार खुष होईल असा **चाणक्याचा** हेतु होता.

**चंद्रगुप्तानें भद्रभटादिकांला** नाराज होण्याचें कारण काय, तें विचारल्यावरून **चाणक्य** ह्मणाला, ' ऐक बाबा, सांगतों. येथें पिलखान्यावरचा अधिकारी व पागेवरचा अधिकारी **भद्रभट** आणि **पुरुषदत्त** नांवाचे जे दोघे सरदार होते ते नेहमीं चैनींत निमग्न असत. त्यांना दारू पिणें, स्त्रियांशीं विलास करणें, नाचतमाशे पहाणें, यावांचून दुसरें कांहीं सुचत नव्हतें. ते नेमलेल्या कामावर मुळींच लक्ष देत नव्हते; ह्मणून मी त्यांना कामावरून दूर करून केवळ पोटगी देऊन ठेविलें होतें. ह्मणून ते रागावून शत्रूच्या ( **मलयकेतूच्या** ) पक्षाला मिळाले. व ते येथें ज्या अधिकारांवर होते, तेच अधिकार **मलयकेतूनें** त्यांना तेथें दिले आहेत. आतां **डिंगरात** आणि **बलगुप्त** या दोघांला तुझ्यापासून नेमणुका मिळत होत्या, त्या त्यांना अगदीं कमी वाटूं लागल्या व **मलयकेतूकडे** गेलों असतां याहून मोठ्या नेमणुका मिळतील असें समजून, येथून

पळून जाऊन ते **मलयकेतूच्या** आश्रयाला राहिले आहेत. आतां तुझा बाळपणचा हुजऱ्या **राजसेन**, याला तुझ्या मेहेरबानीनें पुष्कळ ऐश्वर्य मिळालें, ह्मणून तो आपल्या ठिकाणीं कृतकृत्य झाला. व येथें राहिलों आणि कदाचित् तुझी इतराजी झाली, तर मिळालेली जिनगी जाईल ह्मणून जवळ काय होतें नव्हतें तें चट सारें गुंडाळून, तो **मलयकेतु**जवळ राहिला आहे. आणि सेनापति, **सिंहबलाचा** धाकटा बंधु **भागुरायण** तोही पूर्वी येथें रहात होता तेव्हां **पर्वतकराजाशीं** त्याचा विशेष स्नेह जडला होता. त्याच्या प्रीतीस्तवच त्यानें—'तुझ्या बापाला **चाणक्यानें**च मारविलें' असें गुप्तपणें **मलयकेतूला** सांगून त्याच्या मनांत आमच्याविषयीं भय उत्पन्न करून, **मलयकेतूला** येथून पळविला; व नतर राजद्रोह करणारे **चंदनदास, शकटदास** इत्यादिकांला कडक शिक्षा झाली, तेव्हां आपल्याच अपराधानें आपल्या ठिकाणीं साशंक होऊन, त्यानें येथून पळ काढून **मलयकेतूचा** आश्रय धरिला. **मलयकेतूलाही** असें वाटलें कीं, **भागुरायण** हा आपला प्राणरक्षक आहे, तेव्हां त्यानें कृतज्ञताबुद्धीनें त्याला आपला एक प्रधान केला. आतां, दुसरे ते **लोहिताक्ष** आणि **विजयवर्मा** यांचा आपसांत भाऊबंदकीचा तंटा होता. त्यांत तूं त्यांचा जो योग्य विभाग दिलास तो त्यांना मान्य झाला नाहीं, व मोठ्या गर्वानें त्यांनीं तें सारें सोडून शत्रुपक्षाचा आश्रय केला. याप्रमाणें त्यांचीं नाराज होण्याचीं कारणें आहेत.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'ते असे नाराज झाले आहेत हें आपल्याला आधीं समजलें नव्हतें का? मग तेव्हांच त्यांचा चांगला बंदोबस्त कां केला नाहीं?'

**चाणक्य** ह्मणाला, 'त्यांचा बंदोबस्त करण्याला सवड झाली नाहीं.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'तो कसा करावा तें समजलें नाहीं ह्मणून केला नाहीं, किंवा तसें करण्यांत कांहीं हेतु होता?'

**चाणक्य** ह्मणाला, 'न समजेल कां! कांहीं कारण होतें ह्मणूनच बंदोबस्त केला नाहीं.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'तर मग त्याचें काय कारण होतें तें आतांच मला ऐकावयाचें आहे.'

**चाणक्य** ह्मणाला, 'ऐक आणि नीट लक्षांत ठेव. जे कामदार लोक नाराज झाले असतील, त्यांचा बंदोबस्त करणें तो दोन रीतींनीं होत असतो. त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांच्यावर मेहेरबानी करावी, किंवा त्यांना प्रतिबंधांत ठेवावें, असे दोन प्रकार आहेत. **भद्रभट** आणि **पुरुषदत्त** ह्या दोघांवर अनुग्रह करावयाचा ह्मटला ह्मणजे, त्यांच्याकडून जे अधिकार काढून घेतले होते, ते त्यांना पुनः देणें, हाच होय. पण तशा व्यसनी पुरुषांला एवढे मोठे अधिकार देणें, ह्मणजे एक प्रकारें आपल्या राज्याचा नाश करून घेतल्यासारखेंच होतें; ह्मणून त्यांच्यावर मेहेरबानी केली नाहीं. **दिंगरात** आणि **बलगुप्त** हे दोघे फारच लोभी. त्यांना तुझें सर्व राज्य दिलें तरी संतोष वाटावयाचा नाहीं. मग त्यांच्यावर अनुग्रह कसा करितां येईल! **राजसेन** आणि **भागुरायण** हे दोघे द्रव्य आणि प्राण सुरक्षित ठेवण्याविषयीं प्रयत्न करीत होते. तेव्हां त्यांच्यावर मेहेरबानी करण्याला सवड कोणती होती? तसेंच **लोहिताक्ष** आणि **विजयवर्मा** हे आपल्या वारसांचा द्वेष क-

रीत असून, स्वत: मोठ्या ताठ्यानें वागणारे असल्यामुळें, त्यांच्यावर तरी कसा अनुग्रह करितां आला असता ? ह्मणून मेहेरबानी करण्याचा पक्ष मुळींच सोडून दिला. आतां त्यांचा निग्रह करतां आला असता; पण नंदाचें एवढें मोठें राज्य नुकतेंच आमच्या हातीं आलें आहे, तेव्हां त्यांच्यासारख्या मोठ्या मोठ्या सरदारांला आह्मीं जबर शिक्षा दिल्या, तर नंदाच्या घराण्यावर विशेष प्रेम ठेवणाऱ्या रयतेच्या विश्वासाला आपण पात्र होणार नाहीं; ह्मणून त्यांना शिक्षा केल्या नाहींत. तेव्हां याप्रमाणें आमच्या पक्षाची मंडळी बहुतेक **मलयकेतूला** जाऊन मिळाली आहे, व इकडचा पुरता माहितगार, **राक्षस**, त्याचा मुख्य प्रधान झाला आहे. असा तो **मलयकेतु** म्लेंच्छ राजांला अनुकूळ करून घेऊन, त्यांची मोठी फौज जमवून आपल्या बापाचा सूड उगविण्याकरितां आमच्यावर स्वारी करण्याला तयार झाला आहे. तेव्हां सांप्रतची ही वेळ कांहींतरी उद्योग करण्याची आहे. चैनींत बसून नाच, रंग, उत्सव करण्याची ही वेळ नव्हे. या वेळीं आपल्या शहरची तटबंदी दुरुस्त करून किल्ल्याची वगैरे तयारी करणें सोडून कौमुदीमहोत्सव करण्यांत काय अर्थ आहे ! ह्मणूनच मी तो मना केला आहे.'

हें ऐकून **चंद्रगुप्त** ह्मणाला, 'हं हं, समजलों. या संबंधानें मला पुष्कळ विचारावयाचें आहे.'

**चाणक्य** ह्मणाला, 'खुशाल विचार बापडा. मलाही पुष्कळ सांगावयाचें आहे.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'तुह्मी ह्या ज्या आतां भयाच्या गोष्टी सांगतां, त्यांचा पूर्वीच कां बंदोबस्त केला नाहीं ! ह्या सर्व

अनर्थाचें मूळकारण **मलयकेतु** आहे. त्याला येथून पळून जाण्याची सवड कां दिली?'

**चाणक्य** ह्मणाला, 'त्याला जर जाऊं दिला नसता तर त्याच्या बापाला वचन दिल्याप्रमाणें अर्धे राज्य द्यायला पाहिजे होतें, किंवा त्याला कैद तरी केलें पाहिजे होतें. बरें, कैद करावें तर **पर्वतकाला** आह्मीं मारलें, अशी जी शत्रुपक्षाच्या लोकांनीं कंडी पिकविली होती, तिला आह्मींच हात दिल्यासारखें झालें असतें. बरें, प्रतिज्ञेप्रमाणें अर्धे राज्य द्यावें तर **पर्वतक** मारविला गेला त्याचें फळ काय? केवळ कृतघ्नता मात्र आपल्या पदरीं आली असती. ह्मणून **मलयकेतु** पळून गेला तरी त्याच्याकडे लक्ष्य दिलें नाहीं.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'बरें चिंता नाहीं. **मलयकेतूच्या** संबंधानें आपण आह्मांला असें उत्तर दिलें, आणि तें घटकाभर आह्मी कबूलही करितों. पण आह्मी **नंदांचें** राज्य घेतल्यानंतर **राक्षस** कित्येक दिवस येथेंच होता. त्याची आपण कां उपेक्षा केली? या प्रश्नाचें आपणांकडून काय उत्तर मिळेल बरें?'

**चाणक्य** ह्मणाला, 'हो हो. याच्यावर देखील आमचें योग्य उत्तर आहे. **राक्षसाची** आपल्या यजमानावर (**नंदांवर**) निश्चल भक्ति होती. त्यांतून तो येथें फार दिवस राहिला होता. तेव्हां त्याचा स्वभाव लोकांना माहीत असल्यामुळें **नंदराजावर** अनुरक्त असलेल्या प्रजेच्या विश्वासाला तो पात्र होता. याशिवाय, तो स्वतः मोठा बुद्धिमान् व शूर असून जबरा उद्योगी. त्याचे साह्यकर्तेंही पुष्कळ होते. द्रव्य तर त्याच्या जवळ अपरंपार भरलेलें होतें. असा तो मोठा बलवान् असून येथेंच

राहत होता. तेव्हां त्याच्यावर आम्हीं हल्ला केला असता तर मोठी गडबड उडाली असती. कदाचित् त्याला येथून हांकून दिला असता, तर बाहेरून कांहीं तरी अनर्थ उत्पन्न होण्याची भीति होती. ह्मणून येथल्यायेथेंच कांहीतरी उपायानें तो अनुकूल होईल तर पहावें, असा विचार करून प्रथम त्याला राहूं दिलें. पण कोणत्याही उपायांनीं तो वश होत नाहीं असें वाटलें, तेव्हां, हृदयांतला कांटा उपटून टाकतात त्याप्रमाणें, त्याला दूर पिटाळून लावला.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, ' पण इतकें हवें होतें कशाला? लढाई करून त्याला जिंकून कैदेंत ठेविला असता ह्मणजे झालें होतें.'

**चाणक्य** ह्मणाला, 'हं हं, **राक्षस** तो. तें कांहीं सामान्य प्रकरण नाहीं. लढाई सुरू केली असती तर तुमच्या सैन्याचा त्यानें नाश केला असता किंवा आपण मरून तरी गेला असता. तसें झालें असतें, ह्मणजे दोहोंकडूनही वाईटच होतें. कारण, लढाईंत त्याचा नाश झाला असता तर तसल्या शहाण्या मनुष्याचा घात करणें योग्य नव्हे. कदाचित् त्याणें तुझ्या फौजेचा नाश केला असता तरी मोठें नुकसान झालें असतें. याकरितां जंगली हत्तीप्रमाणें त्याला युक्तीनेंच वश करून घेतला पाहिजे होता.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'तुमच्या शहाणपणापुढें आमचें कांहीं विशेष आहे असें नाहीं. तरी तुह्मी सांगितलेल्या गोष्टीवरून **राक्षसच** अधिक शहाणा असें वाटतें.'

हें ऐकून रागावून **चाणक्य** ह्मणाला, 'असें अर्धें कां बोलतोस? **राक्षसा**इतका तूं शहाणा नाहींस हें वाक्य तुझ्या तोंडांतून बाहेर यावयाचें राहिलें होतें. बरें पण, तो तुला

एवढा शहाणा वाटतो, त्यानें असें केलें तरी काय तें सांग पाहूं.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'सांगतों ऐका. त्या चतुर पुरुषानें हें **कुसुमपूर** आमच्या हातीं आल्यावर देखील, आमच्या मानेवर पाय देऊन आपल्या इच्छेप्रमाणें हवे तितके दिवस येथें वास्तव्य केलें. आमच्या नांवाचा दांडोरा पिटणाऱ्या आमच्या फौजेला पाहिजे तेव्हां अटकाव केला. आपल्या शहाणपणानें आह्मांला भूल पाडली. ज्यांच्यावर आह्मीं विश्वास ठेवावा, त्यांच्यावर देखील आमचा अविश्वास उत्पन्न करून त्यांला येथून घालविलें, तेव्हां आणखी त्यानें करावें तें काय?'

हें ऐकून **चाणक्य** हंसून ह्मणाला, 'हं, हें **राक्षसानें** केलें एवढेंचना! मीं असें समजलों होतों कीं, **नंदाप्रमाणें** तुला हाकलून देऊन, तूं जसा **नंदाच्या** सिंहासनावर बसलास, तसा **मलयकेतूला** त्यानें तुझ्या आसनावर बसविलें असेल!'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'उगीच त्या गोष्टी हव्यात कशाला? तें सर्व दुसऱ्यानेंच केलें. त्यांत तुमचें काय?'

हें ऐकून **चाणक्य** संतापून ह्मणाला, 'अरे मत्सऱ्या! मोठा राग आल्यामुळें स्फुरण पावणाऱ्या हाताच्या बोटांनीं आपली शेंडी मोकळी सोडून सर्व शत्रूंचा नाश करण्याची उग्र प्रतिज्ञा लोकांसमक्ष कोणीं केली! व तीप्रमाणें नऊशें नव्याणव कोटि द्रव्याचे मालक ते **नवनंद**, **राक्षस** प्रत्यक्ष पहात असतां, बोकडासारखे कोणीं मारले तें सांग पाहूं? तसेंच ज्यांच्या आसमंतात् गिधाडें बसलीं आहेत, आकाशांत जाणारे धुराचे लोट एकसारखे चालत

असून त्यांच्या योगानें जणूं काय मेघांनींच दिशा व्यापल्या आहेत असा भास होत आहे, व ज्यांच्यापासून वसेचे लोट वाहत आहेत, असे त्या **नवनंदांना** जाळण्याला प्रवृत्त झालेले अग्नि, अद्यापि श्मशानवासी प्राण्यांला आनंद देत होत्साते पेटताहेत, हा कोणाचा प्रभाव? आणि असें असून तूं हें काय बोलतोस?'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'आपण ह्मणतां तें सारें झालें खरें; पण तें दुसऱ्यानें केलें इतकेंच. त्याबद्दल आपण फुशारकी मारायला नको.'

हें ऐकून **चाणक्य** फारच संतापून ह्मणाला, 'काय दुसऱ्यानें केलें? बरें बरें, कोणीं केलें तें सांग पाहूं!'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'आणखी कोण करणार! त्या नंद-कुळावर प्रतिकूळ झालेल्या दैवानेंच तें केलें.'

**चाणक्य** ह्मणाला, 'छत्! दैवाला अडाणी लोक मुख्य मानतात.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'आणि जे विद्वान् असतात तेही उगीच बडबड करीत नाहींत.'

यावर **चाणक्य** दांत ओंठ चावून ह्मणाला, '**चंद्रगुप्ता,** मला एक आपला चाकर समजून माझ्या डोक्यावर बसावयाला पहातोस? **नंदांच्या** वधाविषयीं प्रतिज्ञा करून मोकळी सोडलेली शेंडी बांधली होती,* पण ती पुनः सोडण्याविषयीं माझा हात पुढें सरतो आहे.' जमिनीवर पाय

* येथें मुळात 'शेंडी बांधली होती' असें म्हटलें आहे तें खरें नव्हे. कारण, **राक्षसाला** अगदीं कुंठित करून त्याला **चंद्रगुप्ताचा** दिवाण केल्यावाचून आपली प्रतिज्ञा पूर्ण झाली नाहीं असें **चाणक्य** समजत होता व शेवटीं त्याणें तसेंच केलें आहे. तेव्हा जसें हें भांडण मुद्दाम केलें तसेंच शिखाबंधनही असावें असें दिसतें.

आपटून ह्मणाला, ' हा पाय, पुनः तशीच प्रतिज्ञा करावी ह्मणून, चलित होतो. **नंदाचा** नाश झाल्यामुळें शांत झालेला माझा क्रोधाग्नि काळानें घेरलेला तूं पुनः पेटविण्याची इच्छा करतोस, असें वाटतें. '

उभयतांनीं जाणूनबुजून हें नाटक केलें होतें. तेव्हां **चाणक्य** वांकडेंतिकडें बोलला तरी **चंद्रगुप्ताला** त्याचें भय वाटलें नाहीं, पण वरील भाषण ऐकून तो खरोखरच भिऊन मनांत ह्मणाला, या भाषणावरून आर्याला खरोखरच राग आला असें वाटतें. कारण क्रोधानें स्फुरण पावणाऱ्या पापण्यांपासून पटपट जलाचे थेंब खालीं पडत आहेत, व संतापानें नेत्रांपासून धूर निघूनच कीं काय कांति पिंगट झाली आहे असें दिसतें. या वेळच्या यांच्या मुद्रेवरून, तांडवनृत्य करून रौद्ररसाचा अभिनय करणाऱ्या **महादेवाच्या** पादप्रहाराची आठवण करून, या वेळीं यांचा पादप्रहार पृथ्वीनें सहन केला असेल! '

**चाणक्य** बुद्ध्या आणलेला राग अंमळ शांतकरून ह्मणाला, '**चंद्रगुप्ता**, असा उगीच वाद करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. जर तुला आमच्यापेक्षां **राक्षस** अधिक बुद्धिमान् असें वाटत असेल, तर मला तुझ्या या राज्यकारभाराची कांहीं जरूर नाहीं. हें मी शस्त्र खालीं ठेवतों. हें तूं त्या **राक्षसालाच** दे.' असें बोलून **चाणक्यानें** कंबरेची तरवार काढून खालीं ठेविली, आणि आकाशाकडे लक्ष्य लावून **राक्षसाला** उद्देशून ह्मणाला, 'अरे **राक्षसा**, अरे **राक्षसा**! माझ्या बुद्धीला जिंकण्याची इच्छा करणाऱ्या तुझ्या बुद्धीचा हा प्रकर्ष आहे. तूं असें समजत आहेस कीं, **चंद्रगुप्ताची** **चाणक्यावरची** भक्ति चळली ह्मणजे मी त्याला सहज

जिंकीन. असा विचार करून तूं आह्मां उभयतांत विरोध पाडण्याची जी युक्ति योजलीस, ती तुझ्याच नाशाला कारण होणार आहे. आमचें तीपासून कांहीं वांकडें होणार नाहीं.' असें बोलून **चाणक्य** मुकाट्यानें तेथून निघून गेला.

इकडे **चंद्रगुप्त** चोपदाराला ह्मणाला, 'आर्या **वैहीनरे**, आजपासून **चाणक्याची** पर्वा न बाळगतां **चंद्रगुप्त** स्वयमेव राज्य करणार आहे, असें दरबारच्या सर्व मंडळीला जाहीर कर.'

राजदरबारांतली मंडळी फार उलाढाली करणारी असते. **चंद्रगुप्ताच्या** राज्यांत लहान थोर सर्व कामदारांला काय तें **चाणक्याचें** भय होतें. **चाणक्य** मोठा आटोकाट असून, अगदीं कोणाची भीड मुरवत ठेवणारा नसल्यामुळें खटपटी करणाऱ्या लोकांना तो मुळींच आवडत नव्हता. ह्माताऱ्या **वैहीनरीला**, **चाणक्याचें** आणि **चंद्रगुप्ताचें** भांडण झालें, हें मनापासून आवडलें. तो मनांत ह्मणाला, आजपर्यंत आर्य हें उपपद लावल्यावांचून महाराजांनीं **चाणक्याचें** नांव कधींच उच्चारिलें नाहीं. असें असून आज नुसतें **चाणक्य** असें ह्मटलें, हें काय? यावरून **चाणक्याकडचा** अधिकार यांनीं काढून घेतला असें वाटतें. वस्तुतः असें करण्यांत महाराजांचा कांहीं दोष आहे असें वाटत नाहीं. कारण, राजाकडुन प्रधानाचा जो असत्कार होतो, तो प्रधानाच्याच अपराधामुळें होतो. कारण महाताच्या प्रमादानेंच हत्ती बिघडत असतो.

**वैहीनरी** विचार करीत उभा राहिला आहे असें पाहून **चंद्रगुप्त** ह्मणाला, 'आर्या **वैहीनरे**, कसला विचार करतोस?'

चोपदार ह्मणाला, 'नाहीं नाहीं, कसलाही विचार करीत नाहीं. महाराज आतां मात्र खरोखरीचे महाराज झाले, ही दैवानें मोठी मेहरबानी केली.'

चोपदार फार दिवस राजदरबारांत वापरलेला होता, तरी यावेळीं तो बोलतांना फसला. वरील वाक्य त्यानें सहज ह्मटलें, पण त्याचा अर्थ फार निराळा आहे. आजपर्यंत तूं केवळ नांवाचा राजा होतास. आतां मात्र खरा राजा झालास, असा त्याच्या बोलण्याचा अर्थ होता; तो समजून **चंद्रगुप्त** मनांत ह्मणाला, हं हं, आह्मी उभयतां याप्रमाणें भांडावें आणि आपला हेतु साधावा, अशी इच्छा करणाऱ्या तुझा मनोरथ पूर्ण होऊं दे.

नंतर तो **शोणोत्तरा** दासीला ह्मणाला, 'अग, हें असें व्यर्थ भांडण केल्यामुळें माझें डोकें दुखूं लागलें आहे. यावेळीं मला अंमळ निजावेंसें वाटतें. तर शेजघराकडे चल.'

राजाची अशी आज्ञा होतांच **शोणोत्तरा** त्याचा हात धरून शेजघराकडे घेऊन जावयाला लागली. **चंद्रगुप्तानें** **चाणक्याच्या** आज्ञेवरूनच हें भांडण केलें होतें, तरी **चाणक्यावर** त्याची एकनिष्ठ भक्ति असल्यामुळें त्याला फार वाईट वाटलें. तो मनांत ह्मणाला, आर्य **चाणक्याच्या** आज्ञेनेंच मीं त्याचा असा पाणउतारा केला; तथापि माझी बुद्धि या वेळीं जशी काय खाड्यांत पडण्याला प्रवृत्त झाली आहे असें वाटतें. आणि जे दुष्ट मनुष्य खरोखरीच गुरूचा उपमर्द करितात त्यांचें हृदय लाजेनें कसें फुटत नाहीं, हें मोठें नवल आहे!

## भाग चवथा.

**राक्षसानें**, **चाणक्य** आणि **चंद्रगुप्त** यांच्यांत वैर पाडण्याकरितां, **विराधगुप्ताला** पाठविलें असून, त्याच्या मागोमाग, तावडतोब तिकडची खबर आपल्याला देण्याकरितां **करभकाला** पाठविलें होतें, हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें ते दोघेही **कुसुमपुरांत** येऊन **राक्षसानें** त्यांला जी काय व्यवस्था करण्यास सांगितली होती, ती त्यांनीं केली. वर सांगितल्याप्रमाणें **चाणक्य** आणि **चंद्रगुप्त** यांचा कलह झाला—वस्तुतः तो खरा नव्हता, तरी खरोखरीचाच आहे, असें समजून **राक्षसाला** ती खबर देण्याकरितां **करभक** रात्र बेरात्र करून **राक्षसाजवळ** येऊन पोंचला. त्यानें दीर्घप्रवास करणाऱ्या मुशाफराचा वेष धरला होता. तो **राक्षसाच्या** दरवाज्यांत येऊन ह्मणाला, 'राजाचा हुकूम मोठा जबर आहे. नाहीं तर येथें उगीच कोण येरजाऱ्या घालील ? प्रभूची आज्ञा पाहिजे तिकडे जाऊन येण्यास सेवकांला प्रवृत्त करिते. हें अमात्य **राक्षसाचें** घर. तर आतां आंत जाऊन **राक्षसाला** आनंदाचें वर्तमान सांगावें.' दरवाज्यांत उभा राहून ह्मणाला, 'अरे येथें दरवाज्यावर कोण आहे!' इतक्यांत एक मनुष्य बाहेर आला, त्याला ह्मणाला, 'बाबा, अमात्य **राक्षसाला**, **पाटलिपुत्रनगराहून** **करभक** आला असून तो तुमच्या भेटीची इच्छा करीत आहे, अशी विनंती कर.'

हें ऐकून तो हुजऱ्या ह्मणाला, 'अरे बाबा, फार मोठ्यानें बोलूं नको. गेल्या रात्रीं दिवाणसाहेब कांहीं महत्त्वाच्या गोष्टीचा विचार करीत होते, त्याखालीं त्यांना सारी रात्र

जागरण झाल्यामुळें यावेळीं त्यांचें डोकें दुखत आहे. अद्यापही त्यांहीं बिछाना सोडला नाहीं, तेव्हां, अंमळ थांब, सवड पाहून मी त्यांना खबर देतों.'

हें ऐकून **करभक** ह्मणाला, 'बरें बाबा, तूं सांगितलेंस तसेंच करतों. मी अंमळ बसतों येथें.' असें सांगून तो तेथेंच बसला. इकडे **राक्षस** रात्रीं झोंप न लागल्यामुळें अस्वस्थ होऊन बिछान्यावर पडला आहे. जवळ **शकटदास** बसला आहे, व त्यांचें कांहीं बोलणें चाललें आहे. इतक्यांत **राक्षस** आपल्याशींच ह्मणाला, 'मी वरचेवर एक एका कार्याची योजना करीत असतां दैव आपल्याला प्रतिकूळ आहे असें समजून, व **चाणक्याच्या** कुटिल बुद्धीकडे पाहून, मला मोठी काळजी उत्पन्न होते. तसेंच मी योजलेली मसलत अगदीं फसली ह्मणजे, हें असें कसें झालें? या गोष्टीचा विचार करीत असतां, रात्रीच्या रात्री माझ्या त्या काळजींत जातात !

आणखी एकादा नाटक रचणारा व आमच्यासारखा राजकारणांत व्यापृत असणारा, या दोघांची स्थिति एकसारखीच आहे. आम्ही आधीं लहानशा कार्याला आरंभ करतों, व पुढें त्याचा विस्तार व्हावा अशी आमची इच्छा असते. आरंभलेल्या कार्यांत गर्भित असलेलीं बीजें अत्यंत गहन असलीं, तरी तीं उकलावीं, असा आमचा प्रयत्न असतो. नेहमीं त्याच्याविषयीं आह्मी सूक्ष्म विचार करीत असतों. विशेष विस्तार पावलेलें कार्य असलें, तरी तें पुनः आवरून घेण्याचा आमचा प्रयत्न असतो. तात्पर्य, नाटक रचणारा आणि आह्मी एकसारखे आहों, तथापि तो दुरात्मा **चाणक्यबटु**—'

राक्षसाचें वाक्य पूर्ण झालें नाहीं तों, इतक्यांत प्रियंवदक आंत येऊन ह्मणाला, 'प्रधानजींचा जयजयकार असो.'

राक्षसानें त्याच्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. तो पूर्वी जें अर्धें वाक्य बोलला होता त्याच्यापुढें ह्मणाला, —'निग्रह करण्याला शक्य होईल काय?'

प्रियंवदक पुनः ह्मणाला, 'दिवाणसाहेब.'

इतक्यांत राक्षसाचा डावा डोळा लवूं लागला. तें दुर्निमित्त पाहून मनांत म्हणाला, आतां जे हे आकस्मिक शब्द माझ्या कानांवर पडले, त्यांवरून माझें आणि ह्या प्रियंवदकाचें वाक्य जुळवून पाहिलें तर, दुरात्मा चाणक्यबटु जयशाली होईल. अमात्य ( आपण ) हरला जाईल असें वाक्य होतें, व त्यावरून पुढचें लक्षण काय आहे तेंही लक्ष्यांत येत नाहीं. हा डावा डोळा लवतो आहे, त्यानें हाच अर्थ सुचविला आहे. तथापि उद्योग करायचें सोडतां कामा नये. प्रियंवदकाला ह्मणाला, 'बाबा, तुला काय सांगावयाचें आहे?'

प्रियंवदक म्हणाला, 'करभक दरवाज्यांत उभा आहे.'

हें ऐकून राक्षस म्हणाला, 'त्याला लवकर आंत घेऊन ये.' याप्रमाणें हुकूम होतांच प्रियंवदक बाहेर जाऊन करभकाला आंत घेऊन आला. तो राक्षसाला मुजरा करून उभा राहिला, तेव्हां राक्षसानें त्याला खालीं बसण्यास सांगितल्यावरून मोठ्या नम्रपणानें तो नमस्कार करून खालीं बसला.

राक्षस अनेक मसलतींत निमग्न झाला होता, व वरचेवर आपल्याला अपेश येतें म्हणून त्याचें मन फार खिन्न झालें होतें. करभकाला कोणच्याशा कामावर

पाठविला होता इतकी त्याला आठवण होती. पण तें काम कोणतें, याचें त्याला स्मरण होईना; म्हणून तो विचार करूं लागला.

इतक्यांत **मलयकेतु** राक्षसाची भेट घेण्याकरितां त्याच्या घराकडे आला. या वेळीं त्याच्या बरोबर फारसा परिवार नव्हता. त्याचा सल्लामसलत देणारा **भागुरायण**, व एक चोपदार, एवढेच कायते त्याच्याबरोबर होते. त्याची सडी स्वारी होती, ह्मणून रस्त्यानें येणारे जाणारे लोक गैरमाहितीनें त्याच्या जवळून जाऊं लागले. तें पाहून एक मनुष्य त्यांना धिसपटावून ह्मणाला, 'अरे, पलीकडे व्हा, पलीकडे व्हा, अरे, दूर सरा. काय तुम्ही पहात नाहीं? भेटीची तर गोष्ट दूरच असो, पण सामान्य मनुष्याला मोठे दैवशाली अशा मनुष्यदेवांचें देवांप्रमाणें दर्शन देखील होणें दुर्लभ.'

तो मनुष्य लोकांला पैस, पैस करूं लागला, तेव्हां लोक ह्मणाले, 'अरे बाबा, उगीच आह्मांला कां धुडकावतोस?'

तो गृहस्थ ह्मणाला, 'अहो, काय तुह्मांला ठाऊक नाहीं? हे कुमार **मलयकेतु**, दिवाणजी राक्षस यांचें डोकें दुखतें आहे, असें ऐकून त्यांच्या भेटीकरितां निघाले असून इकडे येत आहेत, म्हणून तुम्हांला पैस केलें.'

तो गृहस्थ असें बोलत आहे इतक्यांत **भागुरायण** आणि चोपदार यांसहवर्तमान **मलयकेतु** तेथें प्राप्त झाला. **भागुरायण** हा **चाणक्याचा** पक्षपाती असून त्यानेंच त्याला मुद्दाम इकडे पाठविलें होतें हें पूर्वी सांगितलेंच आहे. **भागुरायणानें** **मलयकेतूला** गोडगोड गोष्टी सांगून तो त्याचा पुर्ता हितकर्ता बनला होता.

तो वरचेवर मलयकेतुला अशा गोष्टी सांगत होता कीं, त्याच्या योगानें राक्षसावरचें त्याचें प्रेम व विश्वास हळुहळू कमी होईल. इतके दिवस राक्षस मसलत करीत आहे, व उगीच नाद लावला आहे; पण अद्यापि कांहीं घडून येत नाहीं, हे विचार तो त्याच्या मनांत भरवीत असे. याच गोष्टी मनांत आणून मलयकेतु सुस्कारा सोडून मनांत ह्मणाला, बाबा (पर्वतराज) परलोकवासी झाले, त्याला आज दहा महिने होऊन गेले. आह्मी उगीच आपल्या पुरुषत्वाचा अभिमान धारण करीत आहों. अद्यापि आमच्या हातून त्यांच्या नांवानें पळीभर पाणी देखील सुटलें नाहीं. कारण, आह्मीं आधीं तशीच प्रतिज्ञा केली आहे. ज्या वेळीं त्यांचा अंतकाळ झाला, आणि रत्नखचित कंकणें तुटेपर्यंत छाती बडवून घेतली, व अंगावरचा पदर अस्ताव्यस्त झाला असून, हाय हाय, असा आर्त शब्द करून, करुणस्वरानें जमिनीवरचे रजःकण भिजून जाईपर्यंत आमच्या मातुश्री रडूं लागल्या, तेव्हां—'या वेळीं तुमची जी अवस्था झाली आहे तीच शत्रूच्या स्त्रियांला जेव्हां प्राप्त होईल तेव्हांच मी बाबांचें क्रियाकर्मांतर करीन, अशी जी मीं प्रतिज्ञा केली होती, तीच खरी केली पाहिजे. फार काय सांगावें? शूर पुरुषाला उचित अशा प्रकारचें कर्म करून लढाईंत देहत्याग करून आपल्या वडिलांच्या पाठोपाठ जावें, अथवा आमच्या मातुश्री ज्या रडताहेत, त्यांच्या डोळ्यांतले अश्रु काढून ते शत्रूच्या प्रियांच्या डोळ्यांत घालावे हेंच आमचें मुख्य कर्तव्य आहे.

बरोबर जाणारी मंडळी निघण्याची तयारी करीत आहे असें पाहून चोपदाराला ह्मणाला, 'आर्या जाजले, ह्या आ-

मच्या बरोबरच्या राजेलोकांला सांग कीं, आपण यावेळीं माझ्याबरोबर येण्याचे श्रम कशाला घेतां? मी एकटाच, पूर्वी सूचना न करतां, एकाएकीं अमात्य **राक्षस** यांच्या भेटीला जाऊन त्यांना संतोष उत्पन्न करण्याची इच्छा करीत आहें.'

याप्रमाणें चोपदाराला आज्ञा होतांच, तो मागें फिरून त्या राजांला उद्देशून ह्मणाला, 'अहो, कुमार **मलयकेतु** सांगतात कीं, आपण माझ्या बरोबर येण्याचे श्रम घेऊं नका.' हें ऐकून राजेलोक मागें फिरले. तेव्हां **जाजली**, आपला हुकूम मानून हे मागें फिरले, हें **मलयकेतु**ला दाखवून ह्मणाला, 'पहा, पहा, अत्यंत उंच धरलेल्या मानेला तीक्ष्ण लगामानें आकर्षण करून कितीकांनीं आपले घोडे तेथल्या तेथेंच उभे केल्यामुळें, ते आपल्या पुढच्या खुरांनीं जगुं काय आकाशाचे तुकडेच करीत आहेत असें वाटतें. कितीएक हत्तीवर बसलेले असून आपला हुकूम ऐकतांच, घांटांचा नाद बंद करून तेथल्या तेथें हत्तीला आवरून उभे राहिले आहेत. एकंदरींत समुद्राप्रमाणें आपली मर्यादा हे राजे उल्लंघन करीत नाहींत.'

**मलयकेतु** ह्मणाला, 'आर्या **जाजले**, तूंही इतर मंडळीसह परत जा. एकटा **भागुरायण** माझ्याबरोबर येऊं दे, ह्मणजे झालें.'

**मलयकेतू**ची आज्ञा मान्य करून **जाजली** इतर मंडळीसह मागें परतला. तेव्हां **मलयकेतु** **भागुरायणा**ला ह्मणाला, 'सख्या, **भागुरायणा**, मी आज इकडे यायला निघालों तेव्हां **भद्रभट** इत्यादिकांनीं मला विनंती केली कीं, आह्मी अमात्य **राक्षस** याच्या द्वारानें तुमचा आश्रय

केला नाहीं; तर तुमचा सेनापति शिखरक याच्या द्वारानें आह्मीं आपला आश्रय केला आहे. दुष्ट प्रधान चाणक्य याच्या संगतीनें दूषित झालेल्या चंद्रगुप्तावर नाराज झालों, ह्मणून तुमच्या उत्तम गुणांकडे पाहून आपल्या आश्रयाला राहिलों आहों. तर त्यांनीं जें असें ह्मटलें, त्याचा मीं पुष्कळ वेळ विचार केला, पण त्यांतला अभिप्राय मला कांहीं समजला नाहीं.'

भद्रभटादिकांनीं वर सांगितल्याप्रमाणें मलयकेतूला कळविलें, त्यांत त्यांचा असा हेतु होता कीं, राक्षसाची आह्मांला गरज नाहीं, व आह्मी त्याच्यावर विशेष प्रसन्न नाहीं, असें मलयकेतूला सुचवावयाचें होतें.

मलयकेतूचें भाषण ऐकून भागुरायण ह्मणाला, 'बरोबर. त्यांतला अर्थ कांहीं फारसा दुर्बोध नाहीं. शत्रूला जिंकण्याची इच्छा करणारा व उत्तम गुणवान् अशा पुरुषाचा, त्याचा आवडता आणि अत्यंत हितकारी असा जो मनुष्य असेल, त्याच्या द्वारानें आश्रय करावा, ही गोष्ट न्यायाला अनुसरूनच आहे.'

भागुरायणानें आपल्या भाषणांत भद्रभटादिकांच्या बोलण्याचें चांगलें पुष्टीकरण केलें. 'आवडता आणि हित करणारा याच्या द्वारानें आश्रय करावा,' असें जें त्यानें सांगितलें, त्यावरून सेनापति शिखरक हा आवडता असून, राक्षस तितका आवडता व हितकर्ता नाहीं, असें अर्थात् सिद्ध होतें. तें ऐकून मलयकेतु ह्मणाला, 'सख्या भागुरायणा, अमात्य राक्षस हाही आमचा आवडता असून हितकर्ता आहे.'

भागुरायण ह्मणाला, 'हो हो, त्यांत काय संदेह? तो तुह्मा हितकर्ता आहे खरा, पण राक्षसानें मुख्यत्वें काय तें चा-

णक्याशीं वैर आहे. चंद्रगुप्ताशीं त्याचा कांहीं द्वेष नाहीं, तेव्हां कदाचित् चाणक्य अधिकारमदानें फुगला, आणि चंद्रगुप्ताला ती गोष्ट सहन झाली नाहीं, तर तो त्याला प्रधानगिरीपासून दूर करील. अर्थात् नंदकुलावर विशेष भक्ति असल्याकारणानें, चंद्रगुप्त हाही नंदाच्याच वंशांतला आहे असें समजून, व कुसुमपुरांत त्याचे आप्त इष्टमित्र पुष्कळ आहेत, तेव्हां त्यांच्या लोभानें अमात्य राक्षस कदाचित् चंद्रगुप्ताशीं सख्य करील. आणि चंद्रगुप्तही, आपल्या वडिलांपासून हा दिवाणगिरी करीत आला आहे असें समजून, त्याला आपला प्रधान करील. असें जर झालें, तर राक्षसाच्या द्वारानें आपण तुझा आश्रय केला असतां, नंतर तुझा त्याच्या संबंधानें आपल्यावर अविश्वास होईल तो न व्हावा ह्मणून भद्रभटादिकांनीं, सेनापतीच्या द्वारानें, आह्मीं तुझा आश्रय केला आहे, असें सुचविलें असावें असें वाटतें

कुसुमपुरांत चाणक्याचें आणि चंद्रगुप्ताचें भांडण झालें असून चाणक्य राज्यकारभार सोडून घरीं स्वस्थ बसला आहे, व चंद्रगुप्त आपणच सर्व कारभार चालवितो, हें वर्तमान चाणक्याकडून गुप्त रीतीनें भागुरायण, भद्रभट इत्यादिकांला समजलें होतें. ह्मणूनच त्यांनीं, चाणक्यानें सांगितलेल्या पुढच्या कार्याची तयारी करण्याकरितां, मलयकेतूला आज असें सांगितलें. भागुरायणानें त्यांच्या भाषणाची जी व्याख्या करून सांगितली, तींत, राक्षस चंद्रगुप्ताला मिळेल, हे विचार त्याच्या मनांत पूर्णपणें बिंबवून दिले, व मलयकेतूनें भागुरायणाचें ह्मणणें कबूलही केलें.

वर सांगितल्याप्रमाणें बोलत बोलत दोघेही राक्षसाच्या घरांत आले. यावेळीं राक्षस करभकाला कुसुमपुराकडील हकीकत विचारीत होता. मलयकेतु आपण आल्याची खबर न देतां एकाएकीं राक्षसाला भेटण्याच्या संकेतानें गेला होता. तो, राक्षस ज्या ठिकाणीं बसला होता, त्याच्या जवळ जाऊन पोंचला, इतक्यांत करभकाला कोणत्या कामगिरीवर आपण पाठविलें होतें याविषयीं विचार करीत बसलेल्या राक्षसाला आठवण झाली. तो ह्मणाला, 'बाबा करभका, तूं कुसुमपुरांत गेला होतास तेथें तुला त्या स्तनकलश भाटाची भेट झाली होती का?'

करभक ह्मणाला, 'होय महराज, तो भेटला होता.'

या दोघांचीं हीं वाक्यें मलयकेतूनें ऐकिलीं, आणि तो भागुरायणाला ह्मणाला, 'कुसुमपुराकडच्या कांहीं गोष्टी निघाल्या आहेत. तर यावेळीं आपण पुढें न जातां येथेंच उभे राहून त्या गोष्टी ऐकूं या. कारण राजेलोकांचा मनोभंग न व्हावा ह्मणून त्यांचे कामदार बहुतकरून त्यांच्या मनोरंजनार्थ खोट्या देखील गोष्टी सांगत असतात. पण ते स्वच्छंदपणें ज्या वेळीं गोष्टी करितात, त्या वेळीं त्यांचा खुलासा होत असतो. याकरितां अशा सहज चाललेल्या गोष्टी अवश्य ऐकल्या पाहिजेत.'

यावर भागुरायण ह्मणाला, 'तूं ह्मटलेंस तें अगदीं खरें आहे.' नंतर दोघेही राक्षस आणि करभक यांचा संवाद ऐकत आड उभे राहिले.

राक्षस हा अनेक मसलती करणारा मुख्य प्रधान होता. त्याच्यायेथें दुसऱ्या कोणाचा प्रवेश होणें कठीण असून, त्याच्या ज्या कांहीं मसलती चालावयाच्या त्या दुसऱ्याला

ऐकण्याचीही सवड मिळावयाची नाहीं. **मलयकेतु** आणि **भागुरायण** यावेळीं त्याच्या गुप्त गोष्टी ऐकत बसले हें वर्तमान चाकरांनीं त्याला कळविलें असतें, पण **राक्षस** हा सर्वप्रकारें **मलयकेतूच्या** आश्रयावर राहिलेला असून, उभयतांचा कोणत्याही प्रकारचा परकीपणा नाहीं असें समजून, कदाचित् हे दोघे मौजेनें बाहेर उभे राहिले असतील अशा समजुतीनें **राक्षसाच्या** सेवकांनीं आपल्या धन्याला ही खबर दिली नाहीं.

इकडे **राक्षस करभकाला** ह्मणाला, 'अरे, पण तें कार्य सिद्ध झालें ना?'

**करभक** ह्मणाला, 'आपल्या कृपेनें सिद्ध झालें.'

हें ऐकून बाहेर बसलेला **मलयकेतु भागुरायणाला** ह्मणाला, 'गड्या, हा कार्य ह्मणतो तें कोणतें असावें?'

**भागुरायण** ह्मणाला, 'हे प्रधान **राक्षस** आहेत. यांच्या गोष्टी फार खोल असतात. आतां ऐकलेल्या एवढ्याशा वाक्यावरून अमुकच कार्य असें सांगतां येणार नाहीं. तर लक्ष्यपूर्वक पुढें काय तें ऐक.'

इकडे **राक्षस करभकाला** ह्मणाला, 'अरे, विस्तारपूर्वक ती गोष्ट ऐकण्याची माझी इच्छा आहे.'

**करभक** ह्मणाला, 'ऐकावें महाराज. आपण मला **कुसुमपुरांत** जाण्यास सांगून, **चाणक्यानें** वेळोवेळ **चंद्रगुप्ताचे** हुकूम मोडलेसे झाले ह्मणजे त्यात्या वेळीं त्या **स्तनकलश** नांवाच्या भाटानें स्तुतिपर श्लोक गाऊन, त्यांत 'राजेलोकांनीं आज्ञाभंग सहन करूं नये,' अशा अर्थाच्या सूचना **चंद्रगुप्ताला** करीत जाव्या, याविषयीं त्याला सांगावें, ह्मणून मला आपण पाठविलें होतें.'

**राक्षस** ह्मणाला, 'हो हो. असें सांगितलें होतें खरें. बरें, मग पुढें काय झालें ?'

**करभक** ह्मणाला, 'आपल्या हुकुमाप्रमाणें मीं **पाटलिपुत्राला** जाऊन त्या **स्तनकलशाला** आपला हुकूम कळविला. याच संधीस **नंद**कुलाचा नाश झाल्यामुळें दुःखित झालेल्या शहरवासी लोकांच्या मनांचा संतोष करावा, एतदर्थ **चंद्रगुप्तानें** कौमुदीमहोत्सव करण्याविषयीं सर्वांला हुकूम दिला व तो उत्सव बहुत दिवस त्यांच्या परिपाठांतला असल्यामुळें, लहानपणापासून जिचा सहवास घडला आहे अशा स्त्रीच्या समागमाप्रमाणें, स्नेहपूर्वक नगरवासी जनांनीं राजाची ती आज्ञा मान्य केली.'

**राक्षसाला** या वेळीं, **नंदाच्या** कारकीर्दींत **कुसुमपुरांत** कौमुदीमहोत्सव कसा होत होता, त्याची आठवण झाली. **नंदराजावर** निरतिशय भक्ति असल्यामुळें, जेव्हां जेव्हां त्याची आठवण होत होती, तेव्हां तेव्हां **राक्षसाच्या** डोळ्यांतून अश्रुपात होत असे. त्याप्रमाणें या वेळींही डोळ्यांत पाणी आणून **राक्षस** ह्मणाला, 'हायरे, माझ्या प्रिय महाराजा **नंदा**! या वेळीं तूं कोठें आहेस ? पृथ्वीला आनंद करणारा **चंद्रगुप्त** असतांही, सर्व जगाला आनंद करणारा राजचंद्र तूं नाहींस. तेव्हां या कौमुदीमहोत्सवापासून लोकांला कितीसा आनंद होणार आहे ?'

**करभक** ह्मणाला, 'नंतर सर्व लोकांच्या नेत्रांला आनंद देणारा तो कौमुदीमहोत्सव, **चंद्रगुप्ताची** इच्छा नसतांही, **चाणक्यानें** बंद केला. ही संधि पाहून आपला हुकूम तोडल्याबद्दल **चंद्रगुप्ताला** राग येईल अशा प्रकारच्या बऱ्याच कविता **स्तनकलशानें** गाइल्या.'

हें ऐकून **राक्षस** आनंदित होऊन ह्मणाला, 'शाबास, **स्तनकलशा** शाबास! विरोधाचें बीज योग्य वेळीं पेरलें असतां, अवश्य त्याला फळ आल्यावांचून राहणार नाहीं. कारण, क्रीडारसांत निमग्न झालेल्या सामान्य मनुष्याला देखील त्याच्या क्रीडेंत कोणीं विघ्न आणिलें, तर सहन व्हावयाचें नाहीं. मग सर्व लोकांहून अधिक तेजस्वी असा राजा ती गोष्ट कशी सहन करील? बरें, पुढें काय झालें तें सांग.'

**करभक** ह्मणाला, 'नंतर आपला हुकूम मोडला हें पाहून रागावलेल्या **चंद्रगुप्तानें**, त्या प्रसंगाला योग्य अशा रीतीनें आपल्या ( **राक्षसाच्या** ) गुणांची तारीफ करून, **चाणक्याला** आपल्या अधिकारापासून भ्रष्ट केला.'

हें ऐकून **मलयकेतु** ह्मणाला, 'सख्या **भागुरायणा**, नुकतेंच तूं ह्मटलें होतेंस तें खरें झालें. **राक्षसाच्या** गुणांची **चंद्रगुप्तानें** प्रशंसा केली, तेव्हां अर्थात् यांच्याकडे आपला पक्षपात आहे, असें त्यानें उघड दर्शविलें, असें नाहीं का यावरून होत?'

**भागुरायण** ह्मणाला, 'गुणांची तारीफ केली यावरून पक्षपात आहे असें सिद्ध होतें; परंतु त्याहीपेक्षां **चाणक्याला** अधिकारावरून दूर केला, यावरून अधिक पक्षपात असल्याचें सिद्ध होतें.'

इकडे **राक्षस** ह्मणाला, 'कौमुदीमहोत्सव बंद केला हें एकच कारण झालें, किंवा आणखीही कांहीं कारणें झालीं होतीं, ह्मणून **चाणक्याला** **चंद्रगुप्तानें** दूर केला!'

हें ऐकून **मलयकेतु** ह्मणाला, 'अरे, **चाणक्याला** दूर

करण्याच्या संबंधानें दुसरेंही कांहीं कारण आहे का ह्मणून हा शोध करितो, याचा हेतु काय?'

**भागुरायण** ह्मणाला, 'कुमारा, **चाणक्य** मोठा बुद्धिमान् आहे. तो विनाकारण **चंद्रगुप्ता**ला राग येईल असें करणार नाहीं. **चंद्रगुप्त**ही उपकार जाणणारा आहे. तो केवळ एवढ्याच कारणावरून **चाणक्या**चा अपमान करील असें नाहीं, तेव्हां **चाणक्य** आणि **चंद्रगुप्त** या उभयतांचा अनेक कारणांवरून जो वियोग होईल, तो खरा व कायमचा समजतां येईल, ह्मणून हा इतर कारणांचा शोध करीत आहे.'

इकडे **करभक** म्हणाला, '**चंद्रगुप्ता**ला राग येण्याचें दुसरेंही कारण आहे. **मलयकेतु** आणि **राक्षस** हे दोघेही **कुसुमपुरां**तून पळून गेले, त्यांची **चाणक्या**नें उपेक्षा केली, हें एक दुसरें कारण आहे.'

हें ऐकून, **शकटदास** जवळ बसला होता त्याच्या हातावर टाळी देऊन **राक्षस** ह्मणाला, 'वाः फार चांगलें झालें. **चंद्रगुप्त** माझ्या हातांत आला असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. आतां **चंदनदासा**ला बंदिशाळेंतून सोडवीन व तुलाही आपल्या आप्त इष्टमित्रांचा व बायकापोरांचा समागम होईल!'

'**चंद्रगुप्त** माझ्या हातांत आला' असे **राक्षसा**नें ह्मटलें तें ऐकून **मलयकेतु भागुरायणा**ला म्हणाला, 'हा असें ह्मणतो यांतला काय अभिप्राय असावा बरें?'

**भागुरायण** ह्मणाला, 'दुसरा काय असणार? **चाणक्या**पासून निराळा झालेल्या **चंद्रगुप्ता**ला राज्यावरून हाकून दिला, तर त्यापासून कांहीं आवश्यक विशेष कार्य होणार आहे, असें राक्षसाला वाटत नसेल ह्मणून तो असें ह्मणतो.'

वस्तुतः **भागुरायणानें राक्षसाच्या** बोलण्याचा जो हा अर्थ केला तो अगदीं उलट होता. '**चंद्रगुप्त चाणक्याच्या** सल्लामसलतीनें वागणारा असून, **चाणक्य** विशेष बुद्धिमान् असल्या कारणानें ते उभयतां एक विचारानें आहेत तोंपर्यंत आपलें कार्य सिद्ध होणार नाहीं. आतां **चाणक्याशीं** त्याचा वियोग झाला आहे, तेव्हां **चंद्रगुप्त** सहज आपल्या हातांत मिळेल' असें **राक्षसानें** ह्मटलें असून, **भागुरायणानें मलयकेतूला** वाईट वाटावें एतदर्थ त्याचा दुसराच अर्थ केला.

इकडे **राक्षस करभकाला** ह्मणाला, 'अरे, पण अधिकारभ्रष्ट झालेला तो भटोबा सांप्रत कोठें आहे, हें तुला ठाऊक आहे का?'

**करभक** ह्मणाला, 'तेथेंच तो रहात आहे. कामकाज मात्र सर्व सोडून दिलें आहे.'

**राक्षस** आवेशानें ह्मणाला, 'काय? असा अपमान झाला असून अद्याप तेथेंच राहिला आहे? तपोवनाला गेला नाहीं, किंवा पूर्वीप्रमाणें प्रतिज्ञाही केली नाहीं?'

**करभक** ह्मणाला, 'दिवाणसाहेब, तो तपोवनाला जाणार आहे असें मीं ऐकलें आहे; पण अद्याप गेला नाहीं.'

यावर **राक्षस शकटदासाला** ह्मणाला, 'मला हें खरें वाटत नाहीं. कारण, ह्या भूमंडलाचा केवळ इंद्र असा महाराज **नंद**, यानें त्याला मुख्य आसनावरून उठविलें, ही गोष्ट ज्यानें सहन केली नाहीं, तो मनुष्य, स्वतः त्यानेंच ज्याला राजा बनविला आहे अशा **चंद्रगुप्तानें** एवढा अपमान केला असून, तो कसा बरें सहन करील?'

**राक्षसाच्या** गोष्टी ऐकत बसलेल्या **मलयकेतूला, राक्ष-**

साच्या बोलण्याचा विपरीत अर्थ सांगून भागुरायणानें त्याचें मन अंमळ दूषित करण्याचा प्रयत्न चालविला होता. यामुळें मलयकेतूला त्याच्या प्रत्येक वाक्यावर शंका उत्पन्न होत होती. राक्षसाचें हें वरील भाषण ऐकून मलयकेतु ह्मणाला, 'गड्या भागुरायणा, चाणक्य अरण्यांत गेला, किंवा त्यानें पुनः प्रतिज्ञा केली तर त्यापासून याचा (राक्षसाचा) कोणता स्वार्थ सिद्ध होणार, असें याला वाटतें बरें?'

भागुरायण ह्मणाला, 'ही गोष्ट फारशी गूढ नाहीं. जसा जसा चाणक्य चंद्रगुप्तापासून दूर होईल, तसा तसा याचा (राक्षसाचा) स्वार्थ सिद्ध होणारच आहे.'

चाणक्य तपोवनांत गेला नाहीं, व त्यानें प्रतिज्ञाही केली नाहीं, हें ऐकून राक्षसाला, त्यानें चंद्रगुप्ताशीं भांडण केलें, त्याविषयीं शंका आली होती. त्यावर शकटदास ह्मणाला, 'उगीच भलतीच कल्पना घेऊं नका. असें होणें हें योग्यच आहे. कारण असें पहा कीं, अनेक राजांच्या रत्नखचित मुकुटांनीं अलंकृत अशा मस्तकावर ज्यानें पाय ठेविला आहे, असा मौर्य चंद्रगुप्त आपल्याच सेवकांनीं आपला आज्ञाभंग केला तर ती गोष्ट कां सहन करील? चाणक्य मोठा रागीट आहे हें खरें, तथापि स्वयमेव अभिचार करण्याच्या कामांत किती दुःखें आहेत, हें त्याला चांगलें ठाऊक आहे. एकवेळ त्यानें प्रतिज्ञा केली होती ती दैवानें पूर्ण झाली. आतां, केलेली प्रतिज्ञा पुरी करण्याच्या दुःखाविषयीं भ्यालेला चाणक्य पुनः प्रतिज्ञा करण्यास तयार झाला नाहीं, हें योग्यच आहे.'

शकटदासाचें हें बोलणें राक्षसाला मान्य झालें, व चाणक्याचा आणि चंद्रगुप्ताचा झालेला कलह खरोखरी-

चाच आहे, अशी त्याची समजूत झाली! वस्तुतः येथेंच त्याच्या शहाणपणाला बट्टा लागला, व पुढें त्याला हार खावी लागली, त्यालाही हीच गोष्ट कारण झाली. दर्भ पायाला लागून त्यानें कांकोरा निघाला, ही गोष्ट न सहन करून, दर्भाचें बेटच्या बेट खणून काढण्याविषयीं प्रयत्न करणारा इतक्या रागीट स्वभावाचा **चाणक्य** यानें, आपण ज्याला नांवारूपास आणून एवढ्या ऐश्वर्यावर बसविला त्या **चंद्रगुप्तानें** तसा मोठा अपमान खरोखर केला असता तर, तो त्याणें सहन केला असता कीं नाहीं, या गोष्टीचा **राक्षसानें** पुरता विचार केला नाहीं. **चाणक्याचें** यापूर्वीचें वर्तन ज्याला माहीत असेल, तो खरोखर सांप्रतच्या त्याच्या भांडणावर भरंवसा ठेवणार नाहीं. असें असून **राक्षसा**सारख्या चतुर कारस्थानी पुरुषानें कसा भरंवसा ठेवला, याचें नवल वाटतें. **शकटदासानें** जीं कारणें सांगितलीं त्यांत कांहींच महत्व नव्हतें. एकंदरींत **राक्षसाची** बुद्धि या ठिकाणीं चळली असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. असो; काय विचारायचें होतें तें झालें ह्मणून **राक्षसानें** **करभकाला** घेऊन जाण्यास सांगितल्यावरून **शकटदास** त्याला बरोबर घेऊन दुसऱ्या चौकांत गेला.

**शकटदास** गेला त्या वेळीं **राक्षसाच्या** मनांत **मलयकेतूची** भेट घ्यावयाची होती, कारण नुकतेंच त्यानें **कुसुमपुराकडील** जें वर्तमान ऐकलें होतें तें त्याला कळवावयाचें होतें. तो आतां, आपण **मलयकेतूकडे** जाणार ह्मणून, सेवकाला सांगत आहे इतक्यांत—मीच आपल्या भेटीला आलों असें बोलून—**मलयकेतु** **राक्षसाच्या** जवळ गेला; तेव्हां त्यानें त्याला उत्थापन देऊन आसन दिलें.

दोघेही यथायोग्य आसनांवर बसल्यानंतर **मलयकेतु** राक्षसाला ह्मणाला, 'आपलें डोकें फार दुखत आहे असें ऐकलें होतें, तें आतां कांहीं कमी आहेना?'

हें ऐकून **राक्षस** ह्मणाला, 'तुझ्या नांवाला 'महाराज' असें उपपद लावून 'कुमार' ह्या उपपदाचा तिरस्कार होई-पर्यंत माझ्या डोक्याची बाधा कोठून कमी होणार?'

**मलयकेतु** ह्मणाला, 'असें करायचें हें आपण पतकरलेंच आहे. तेव्हां मला 'महाराज, ही पदवी मिळण्याला फारसें कठीण पडेल असें वाटत नाहीं. तथापि याप्रमाणें आह्मी लढाईची सर्व तयारी केली असून शत्रु संकटांत पडेल, याची वाट आणखी किती दिवस पहात बसायचें?'

हें ऐकून **राक्षस** हर्षानें ह्मणाला, 'छे छे, आतां दिवसगत करण्याची सवड आहे कोठें? आतां लवकर प्रस्थान ठेवायचें, दुसरें कांहीं नाहीं.'

**मलयकेतु** ह्मणाला, 'शत्रूवर कांहीं संकट येण्याची आपण वाट बघत होतां, तें त्याच्यावर आलें का?'

**राक्षस** ह्मणाला, 'हो हो, चांगलें मोठें संकट आलें आहे.'

**मलयकेतु** ह्मणाला, 'बरें, तें कसलेंसें आहे?'

**राक्षस** ह्मणाला, 'दुसरें काय असणार? योग्य सचिव नाहीं, हेंच संकट. **चाणक्याला चंद्रगुप्तानें** दूर केलें.'

**मलयकेतु** ह्मणाला, 'आर्या, सचिवाबद्दल संकट तें कसलें? मुळींच नाहीं ह्मटलें तरी चालेल.'

**राक्षस** ह्मणाला, 'तुझ्या ह्मणण्याप्रमाणें दुसऱ्या एखाद्या राजाला कदाचित् त्याचें संकट वाटणार नाहीं; पण **चंद्रगुप्ताला** खरोखर तें मोठेंच संकट आहे.'

**मलयकेतु** ह्मणाला, 'आर्या, आपण ह्मणतां तसें मला वाटत नाहीं. **चंद्रगुप्ताच्या** दरबारांतल्या कामदारांला काय ते **चाणक्याचे** दोष सहन होत नव्हते, व त्यामुळेंच ते त्याच्यावर रागावले होते. पण आतां **चाणक्य** दूर झाला, तेव्हां त्याचे इतर कामदारलोक त्याच्यावर विशेष प्रीति दाखवितील.'

**राक्षस** ह्मणाला, 'छे छे, असें ह्मणूं नको. **चंद्रगुप्ताच्या** कामदारमंडळींत दोन प्रकारचे लोक आहेत. कांहीं **चंद्रगुप्ताचे** हितकर्त्ते आहेत, व कांहीं **नंदावर** अनुरक्त असणारे लोक आहेत. त्यांतून **चंद्रगुप्ताच्या** पक्षाच्या कामदारांला **चाणक्याचा** उन्मत्तपणा व ताठा हाच नाराज होण्याला कारण झाला आहे. पण जे **नंदाच्या** घराण्यावर प्रेम ठेवणारे आहेत, त्यांला त्याबद्दल कांहीं वाटत नाहीं. ते लोक, आपले राजे **नंद** यांला त्या **चंद्रगुप्तानें** मारविलें ह्मणून त्याच्याविषयीं उदासीनपणा व राग यांनीं पीडित होत्साते, दुसरीकडे कोठें आश्रय मिळत नाहीं ह्मणून, निमूटपणें **चंद्रगुप्ताचीच** सेवा करून राहिले आहेत. कदाचित् त्यांना, शत्रुपक्षाचा समूळ नाश करण्याविषयीं समर्थ असा तुझ्यासारखा लढायला तयार झालेला, कोणी मिळेल तर, तत्काल **चंद्रगुप्ताला** सोडून ते तुझा आश्रय करतील! याविषयीं दुसरें कोणाचें उदाहरण नको. प्रत्यक्ष माझेंच घे ह्मणजे झालें.'

यावर **मलयकेतु** ह्मणाला, 'आर्या, आपण सांगितलें हें एकत्र संकट शत्रूवर आलें आहे, किंवा याशिवाय आणखीही कांहीं आलें आहे?'

**राक्षस** ह्मणाला, 'दुसरीं पुष्कळ असून काय करावयाचीं आहेत! हेंच एक मुख्य आहे.'

**मलयकेतु** ह्मणाला, 'आर्या, हेंच मुख्य आहे असें आपण कसें म्हणतां! **चंद्रगुप्त** दुसऱ्या योग्य प्रधानावर राज्यकारभार ठेवून किंवा तो स्वतःच आपल्या शिरावर घेऊन शत्रूचा समाचार घेण्याला असमर्थ आहे का?'

**राक्षस** ह्मणाला, 'हो हो, खरोखरच असमर्थ आहे. कारण, जे स्वतःसिद्ध कारभार चालविण्यास समर्थ असतात, ते तूं ह्मणतोस तसें करूं शकतील. पण तो दुरात्मा **चंद्रगुप्त** नेहमीं प्रधानावर सगळा भारिभार ठेवून आंधळ्यासारखा लोकव्यवहाराविषयीं अनभिज्ञ आहे. तो एवढें राज्य चालवून शत्रूचा कसा समाचार घेईल? प्रधान अथवा राजा अत्यंत उन्नतीला पावला असतां, राजलक्ष्मी पाय जमिनीवर ठेवून उभी राहते, आणि स्त्रीस्वभावामुळें त्यांचा भार सहन करण्याविषयीं असमर्थ झाल्यामुळेंच कीं काय, त्या दोहोंतून एकाला सोडून दुसऱ्याचा आश्रय करते. तान्हें मूल आईच्या स्तनांतून दूध आलें असें जसें पहातें, तसा लोकव्यवहार न जाणणारा अर्थात् मंदबुद्धि असा, सचिवरूपी दर्पणांतून पहाणारा राजा एक घटकाभर देखील राज्य चालवूं शकत नाहीं.'

प्रधानांवर राज्यभार ठेवून स्वस्थ राहण्यांत काय नुकसान आहे, तें **राक्षसानें** वर्णन केल्यावरून, **मलयकेतूला** आपण प्रधानाच्या तंत्रानें वागत नाहीं, याबद्दल संतोष वाटला. तो ह्मणाला, 'आपण ह्मणतां त्याप्रमाणें असेल कदाचित् तथापि त्याच्यावर स्वारी करण्याचीं कारणें पुष्कळ असतांही, मुद्दाम शत्रूवर कांहींतरी संकट

आणून त्यावेळीं त्याच्यावर स्वारी करणाराची हटकून कार्यसिद्धि होते.'

**राक्षस** ह्मणाला, 'यावेळीं निश्चयानें कार्यसिद्धि होणार असें तूं समज. कारण, तूं अत्यंत मोठा बलवान् राजा स्वारी करणारा आहेस, सर्व नगर **नंदा**वर अनुरक्त आहे, **चाणक्य** आपल्या अधिकारावरून भ्रष्ट झाला आहे, आणि **चंद्रगुप्त** नवाच गादीवर बसला आहे. मी तुझ्या अधीन असून, तुला चांगला मार्ग सांगावा, हाच काय तो माझा उद्योग आहे. यावेळीं केवळ तुझ्या मर्जीवरच आमची इष्टसिद्धि अवलंबून राहिली आहे.'

**मलयकेतू**ला, **भागुरायणा**च्या सांगण्यावरून, **राक्षसा**विषयीं कांहीं संशय आला होता, पण सांप्रतच्या त्याच्या बोलण्यावरून त्याच्या मनाची खात्री झाली. तो ह्मणाला, 'या वेळीं स्वारी करण्याला चांगली संधि आहे असें आपणास वाटत असेल, तर मग कां स्वस्थ बसतां? ज्यांच्या मस्तकापासून, पर्वतावरून उदकधारा पडाव्या त्याप्रमाणें, मदधारा वाहत आहेत असे माझे हजारों हत्ती शत्रूच्या नगराजवळच्या **शोणनदा**चें उदक यथेच्छ प्राशन करोत. तसेंच माझे हजारों हत्ती, आपल्या गंभीर गर्जनेनें दशदिशा नादावून सोडणारे, व मदजलाची वृष्टि करणारे, असे **विंध्य** पर्वताला मेघाप्रमाणें **कुसुमपु**राला चोहोंकडून वेढोत.' असें बोलून **राक्षसाचा** निरोप घेऊन **भागुरायणा**सहित **मलयकेतु** निघून गेला.

इकडे **राक्षसानें**, बाहेर कोण आहे, ह्मणून हाक मारल्यावरून **प्रियंवदक** नांवाचा हुजऱ्या आंत आला. त्याला तो ह्मणाला, 'अरे, ज्योतिष्यांपैकीं बाहेर कोण आहे?'

**प्रियंवदक** ह्मणाला, '**क्षपणक** आहे.'

हें ऐकून **राक्षसाला** अंमळ वाईट वाटलें. तो म्हणाला, 'प्रारंभींच **क्षपणक** कसा पुढें आला!'

**प्रियंवदक** ह्मणाला, '**जीवसिद्धि** बाहेर आहे.'

**राक्षस** ह्मणाला, 'बरें, त्याला बीभत्सवेषानें पुढें येऊं नको ह्मणावें. चांगला वेष करून यायला सांग.'

याप्रमाणें **राक्षसाची** आज्ञा होतांच, **प्रियंवदक** बाहेर जाऊन त्यानें क्षपणक **जीवसिद्धि** याला आंत आणिलें. **जीवसिद्धि** लोकांला उद्देशून ह्मणाला, 'मोहरूपी व्याधीचे केवळ वैद्य अशा *आर्हतांचें आज्ञावचन शिरसा मान्य करावें. त्यांचें सांगणें प्रथम घटकाभर कडू वाटतें, पण तें पुढें मोठें हितकर असतें.'

**जीवसिद्धि राक्षसाजवळ** येऊन, '†श्रावकांची धर्मवृद्धि असो,' असें ह्मणाला.

**राक्षस** म्हणाला, '‡भदंतजी, आम्हांला प्रस्थान ठेवण्याला उत्तम मुहूर्त कधीं आहे तें सांगा.'

**क्षपणक** कांहीं वेळ विचार केल्यासारखें करून ह्मणाला, 'श्रावका, आज दोनप्रहरानंतर निवृत्तसर्वकल्याण

---

* **जैन** लोक आपल्या मुख्य देवाला **अर्हन्** (पूज्य) असें ह्मणतात. त्या अर्हन्नें सांगितलेल्या धर्मपंथाप्रमाणें जे लोक वागतात त्याला **आर्हत** ह्मणतात. **क्षपणकाचा** वेष घेऊन आलेला **जीवसिद्धि** हा **चाणक्याचा** परम मित्र **इंदुशर्मा** हें पूर्वी सांगितलेंच आहे. तो यावेळीं **जैनांचा** जती बनून आला होता. जती हे वैदिकधर्मांतल्या संन्याशाप्रमाणेंच असतात तेव्हां—**आर्हत** या शब्दानें आपण व आपल्यासारखे धर्मिष्ठ इतर जती लोक यांचें सांगणें ऐका असें त्यानें आपल्या भाषणांत सुचविलें.

† श्रावक अर्थात् जैन. जैनलोकांत दुसऱ्याला 'श्रावक' म्हणून संबोधन देणें हा एक मोठा सन्मान आहे असें ते समजतात.

‡ 'भदंत' हें जैनधर्मी संन्याशाला बहुमानसूचक संबोधन देतात.

व संपूर्णचंद्र अशी पौर्णमासी तिथी लागत आहे. ही उत्तर दिशेहून दक्षिण दिशेला प्रस्थान करणाऱ्याला फार चांगली आहे, असें मला वाटतें. आणखी सूर्य अस्ताला जाऊं लागला असून पूर्ण चंद्राचा उदय झाला असतां, व केतूचा* अर्धा उदय आणि अर्ध अस्त झाला असतां, बुधलग्नीं गमन करावें.

**क्षपणकानें** अपयशकारक मुहूर्त मोठ्या खुबीनें सांगितला पण तो **राक्षसाच्या** ध्यानांत आला नाहीं. तो म्हणाला, 'भदंतजी, केवळ तिथीच शुद्ध नाहीं असें आपण म्हणतांना!'

**क्षपणक** म्हणाला, 'श्रावका, आमच्या ज्योतिषशास्त्रांत असें सांगितलें आहे कीं, तिथीपेक्षां नक्षत्र चौपटीनें श्रेष्ठ आहे. त्याच्यापेक्षां चौसष्टपट लग्न श्रेष्ठ आहे. तेव्हां सौम्यग्रहांचा योग असला म्हणजे जरी वाईट लग्न असलें, तरी तें चांगलें होतें. चंद्राचें बळ पाहून जा, म्हणजे तुझी सर्व सिद्धि होईल.'

**राक्षस** म्हणाला, 'हाच आपण सांगितलेला मुहूर्त दुसऱ्या ज्योतिष्यांच्या मताशीं ताडून पहा म्हणजे बरें.'

**क्षपणक** म्हणाला, 'श्रावका, तूंच ताडून पहा. मी तर आतां जातों.'

**राक्षस** म्हणाला, 'भदंतजी, आपल्याला राग तर आला नाहींना?'

---

* या भाषणांतले सूर्य, चंद्र आणि केतु या शब्दांत श्लेष आहेत. सूर्यशब्दानें नंद, चंद्रशब्दानें चंद्रगुप्त व केतुशब्दानें मलयकेतु हे लक्षित आहेत असें समजावें.

क्षपणक ह्मणाला, 'छे छे! मी कांहीं तुमच्यावर रागावलों नाहीं.'

राक्षस म्हणाला, 'तर कोण रागावला आहे?'

क्षपणक म्हणाला, 'भगवान् कृतांत काळ तुमच्यावर रागावला आहे. ह्मणूनच तुम्ही आपला पक्ष सोडून शत्रूच्या पक्षाचा आश्रय करून राहिलां आहां.' असें बोलून क्षपणक तत्काळ निघून गेला.

क्षपणक गेल्यावर राक्षस प्रियंवदकाला म्हणाला, 'वेळ किती राहिला आहे पहा.'

प्रियंवदक बाहेर जाऊन परत आंत येऊन म्हणाला, 'सूर्य अस्ताला जाण्याची वेळ आली आहे.' हें ऐकून राक्षस आसनावरून उठला, व खरोखर सूर्य अस्ताला जातो आहे, असें पाहून म्हणाला, 'उदयगिरीपासून प्रकट होणाऱ्या सूर्याला आपला विशेष अनुराग आहे असें, दाखविण्याकरितां आपल्या पानांच्या सावलीनें, लुबऱ्या सेवकांसारखे हे बागेंतले वृक्ष पुढें पुढें करीत होते, तेच, तो अस्ताला जातो आहे असें पाहून, दुसऱ्या दिशेला उदय पावणाऱ्या चंद्राकडे वळले आहेत.* एकंदरींत असेंच आहे. धनी ऐश्वर्यापासून भ्रष्ट झाला, ह्मणजे चाकरलोक त्याचा त्याग करीत असतात!'

---

* पूर्वाह्णात वृक्षाची सावली पुढें पुढें पडते व अपराह्णात मागें पडते, यावरून संपत्कालीं धन्याचा शब्द झेलायला पुढें तयार असलेले व विपत्कालीं त्याच्याकडे पाठ करणारे सेवक उत्प्रेक्षित आहेत असें समजावें.

## भाग पांचवा.

पहिल्या भागांत सांगितल्याप्रमाणें **राक्षसाला** हरवि-ण्याकरितां **चाणक्यानें भद्रभट**, **भागुरायण**, **जीवसिद्धि**, **सिद्धार्थक** इत्यादिकांला युक्तीनें **मलयकेतू**कडे पाठविलें, व त्यांनीं, त्यांचा आपल्यावर पूर्ण विश्वास बसेल, अशी व्यवस्था करून त्याच्या सैन्यांत एकेकानें एकेक अधिकार संपादन केला, व एक प्रकारें ते तेथले प्रमुखच झाले. **भागुरायण** तर **मलयकेतू**चा पुरता मित्र बनला. त्याच्या सल्ल्यावांचून **मलयकेतु** एक पाऊलदेखील टाकीनासा झाला. **भागुरायणानें** हळूहळू आपल्या चातुर्यानें **राक्षसा**विषयीं **मलयकेतू**च्या मनांत संशय उत्पन्न केला, हें चवथ्या भागाच्या शेवटीं सांगितलेंच आहे. तात्पर्य, **चाणक्याला**, **मलयकेतू**चा सर्वस्वीं मोड करून त्याला व **राक्षसाला** हस्तगत करण्याची, जी कांहीं तयारी करावयाची होती ती केली, व आतां लवकरच त्याच्या मसलतीचा बार उडविण्याची वेळ प्राप्त झाली.

**मलयकेतूनें** **राक्षसा**च्या सांगण्यावरून **कुसुमपुरावर** स्वारी करण्याकरितां प्रस्थान ठेविलें, हें चवथ्या भागाच्या शेवटीं सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें फौजेची कडेकोट तयारी करून, कूच दरकूच करीत **मलयकेतूचें** लष्कर **कुसुमपुराच्या** जवळ येऊन पोंचलें. काय तें तीन मुक्कामांचें अंतर होतें. तेथून तिसरा मुक्काम करावयाचा तो **कुसुमपुरांतच** करावयाचा, असा **मलयकेतूचा** बेत ठरला होता.

**राक्षसाविषयीं** **मलयकेतूला** संशय आला होता तरी,

तो केवळ आपला घात करील अशी अजूनपर्यंत त्याच्या मनाची खातरी झाली नव्हती. त्याच्यासारखा मसलती, व स्वतः मोठा शूर असून चतुर, अशा पुरुषाला सोडून देण्याचें **मलयकेतूला** धैर्य होत नव्हतें, ह्मणून मन शुद्ध नसतांही तो त्याच्याच तंत्रानें वागत होता, व आपला भाव त्यानें ह्मावेळपर्यंत **राक्षसाला** व्यक्त करून दाखविला नव्हता.

दुर्दैवी **मलयकेतूचा** सर्वस्वीं नाश व्हावयाचा होता ह्मणूनच कीं काय, त्याच्या बुद्धीला विपर्यास करणारा **भागुरायण**, नाहीं नाहीं त्या कल्पना काढून—सर्वस्वीं त्याच्या हिताविषयीं मनापासून झटणाऱ्या निष्कपटी **राक्षसाविषयीं**, त्याच्या मनांत विकल्प उत्पन्न करीत होता. **मलयकेतूची** फौज **कुसुमपुराच्या** अगदीं जवळ जवळ जात आहे असें पाहून, **भागुरायणानें** एक कुटिल कल्पना काढून **मलयकेतूला** असें सांगितलें कीं, 'आतां **कुसुमपुर** अगदीं जवळ आलें आहे. तेव्हां **राक्षस** **चंद्रगुप्ताशीं** कांहींतरी सल्ला-मसलत करील. लढाई सुरू होईपर्यंत त्याच्या कांहीं मसलती होऊं देतां उपयोगी नाहीं. एकदां लढाई सुरू झाली ह्मणजे मग उभयतांचा सल्ला होण्याचें फारसें भय नाहीं; व तत्पूर्वीही **राक्षसानें**, याप्रमाणें आपल्याला **चंद्रगुप्तावर** स्वारी करण्याची भर देऊन, पुढें कदाचित् आपला घात करण्याचा बेत केला असेल, तर तेंही आपल्याला कळलें पाहिजे. याकरितां असा बेत करावा कीं, आपल्या लष्करांतून कोणी मनुष्य बाहेर जावयाचा असला, किंवा आंत यावयाचा असला तर त्याचा नीट तपास करून, त्याच्या अंगावर छाप

मारल्याशिवाय त्याला येऊं जाऊं देऊं नये; व तें काम कोणातरी एका मनुष्याच्या हातीं ठेवावें. अशी **मलयके**तूला मसलत दिली, व त्या अविचारी मनुष्यानें ती मान्य करून बाहेर जाणाऱ्या येणाऱ्या मनुष्याच्या अंगावर छाप मारण्याचें काम **भागुरायणा**कडेसच सोंपविलें.

वर सांगितल्याप्रमाणें बंदोबस्त करण्याचें कारण असें कीं, **चाणक्या**च्या मसलतीप्रमाणें **मलयकेतु** आणि **राक्षस** यांचें भांडण आज करावयाचें होतें, व त्याच्या फौजेंतील प्रमुख प्रमुख सरदारही मारवायचे होते. आणि या कामाकरितां **सिद्धार्थक** व **जीवसिद्धि** या दोघांकडून कांहीं विपरीत गोष्टी **मलयके**तूला कळवावयाच्या होत्या, ह्मणून **भागुरायणा**नें अशी व्यवस्था केली. हा प्रकार पुढें योग्य वेळीं येईलच. असो.

त्या दिवशीं सकाळींच **राक्षसा**जवळ चाकरीला येऊन राहिलेला, व त्याच्या विश्वासाला पात्र झालेला **सिद्धार्थक**, यानें **राक्षसा**च्या नांवाची मोहोर करून जो लखोटा **चाणक्या**नें दिला होता तो, व **शकटदासा**ला प्राणसंकटांतून वांचविल्याबद्दल **राक्षसा**नें जे त्याला **मलयके**तूकडून स्वतःला मिळालेले दागिने बक्षीस दिले होते, व जे त्यानें एका थैलींत घालून ती थैली बंद करून त्यावर **राक्षसा**च्या नांवाची जी आंगठी त्याच्याजवळ होती तिनें मोहोर करून, **राक्षसा**जवळच ठेविले होते ते, **राक्षसा**चा कारभारी **शकटदास** याच्याकडून मागून घेतले; व त्या दोन्हीही वस्तु घेऊन **सिद्धार्थक** जाण्याच्या तयारीला लागला.

**चाणक्या**च्या कारस्थानाविषयीं विचार करून त्याला मोठें आश्चर्य वाटलें. तो आपल्याशींच ह्मणाला, बुद्धि

हेंच कोणी एक उदक, त्याच्या प्रवाहांनीं व देश आणि कालरूप कलशांनीं जिला पाणी घातलें आहे, अशी **चाणक्याची** मसलतरूपी वेल आज कांहींतरी फळ दाखवील असें वाटतें! याकरितांच मीं, अमात्य **राक्षसाच्या** नांवाची मोहोर केलेला हा लखोटा आर्य **चाणक्यानें** माझ्याजवळ दिला होता, तो घेतला. तसेंच, **राक्षसाच्या** नांवाची मोहोर केलेली ही दागिन्यांची थैलीही घेतली, आणि आतां मी **पाटलिपुत्र** नगरालाच जावयास निघालों आहें, तर आतां चालूं लागावें. फार वेळ करून उपयोगी नाहीं, असें बोलून **सिद्धार्थक** जाऊं लागला.

तो कांहींसा पुढें गेला, इतक्यांत **जीवसिद्धि** समोरून येत होता, तो त्याच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून **सिद्धार्थक** मनांत ह्मणाला, प्रयाणाच्या वेळीं ह्या जोगड्याचें (क्षपणकाचें) दर्शन हा एक अपशकुनच आहे, पण मला या वेळीं शुभशकुनांची गरज नाहीं. या वेळीं अपशकुनच झाला पाहिजे. कारण एव्हांशीं मला पुढें जावयाचें नाहीं, व मी या वेळीं मोठा अनर्थ उत्पन्न करावयास जात असून त्यापासून शेंकडों मनुष्यांचा नाश व्हावयाचा आहे; तेव्हां अपशकुन झाला हें फार चांगलें झालें; ह्मणूनच ह्या जोगड्याला चुकवून जाण्याचा प्रयत्न करीत नाहीं.

इतक्यांत **जीवसिद्धि** त्याच्याजवळ येऊन पोंचला. जती लोक जे आपल्या लोकोत्तर बुद्धीनें स्थापित केलेल्या मार्गद्वारें सिद्धी पावतात व आपल्या धर्माच्या व देवाच्या संबंधानें वरचेवर उद्गार काढीत असतात, त्याप्रमाणें **क्षपणक** ह्मणाला, 'अत्यंत गंभीर बुद्धि अशा आर्हतांला नमस्कार असो!'

**क्षपणक** अगदीं जवळ आला असें पाहून **सिद्धार्थक** मोठ्या नम्रतेनें ह्मणाला, 'भदंतजी, मी आपल्याला नमस्कार करतों.'

यावर **क्षपणकानें** 'श्रावका, तुला धर्मसिद्धि प्राप्त होवो,' असा त्याला आशीर्वाद दिला, व तो कोठेंतरी जाण्याच्या तयारीनें निघाला आहे असें पाहून त्याला ह्मणाला, 'श्रावका, तूं प्रस्थानाची तयारी करून निघाला आहेस असें दिसतें.'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'भदंतजी, आपणांला हें कसें समजलें?'

**क्षपणक** ह्मणाला, 'हात्त्याच्या! हें समजायला काय कठीण! तुला रस्ता दाखविणारा जणुं काय शकुनच, असा हा लखोटा तुझ्या हातांत आहे, त्यावरून तूं जावयाला निघालास हें उघडच दिसतें.'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'हा तुह्मीं जाणलें खरें. मी कोठें देशांतराला जावयाला निघालों आहें. बरें पण, आज दिवस कसा काय आहे तें सांगा पाहूं. आपण मोठे ज्योतिषी आहां ह्मणून विचारतों.

यावर **क्षपणक** हंसून ह्मणाला, 'मुंडण करून आतां नक्षत्र विचारतोस काय?' ह्मणजे तूं जायाला निघालास, आणि आतां मुहूर्त विचारतोस, हें काय? असा **क्षपणकाचा** अभिप्राय.

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'भदंतजी, अजून काय झालें आहे? आपण मुहूर्त सांगा. जर यावेळीं चांगला मुहूर्त असला तर जाईन. नाहीं तर दुसऱ्या वेळीं जाईन.'

वर ज्यांचा संवाद दिला आहे, ते दोघेही **चाणक्याच्या**

पक्षाचे होते हें पूर्वीं सांगितलेंच आहे. **सिद्धार्थक** यावेळीं **चाणक्या**कडेच जावयाला निघाला आहे, हें **क्षपणका**च्या लक्षांत आलेंच होतें; व येथील कार्य झाल्याशिवाय जाऊन कांहीं उपयोग नाहीं, ह्मणून तो ह्मणाला, श्रावका, सांप्रत येथेंच या **मलयकेतू**च्या फौजेंत राहशील तर बरें होईल.'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'भदंतजी, आपण असें ह्मणतां, तें कशावरून?'

**क्षपणक** ह्मणाला, 'श्रावका, ऐकून घे. यापूर्वी कोणालाही फौजेंतून बाहेर जाण्याला व आंत येण्याला मुळींच मनाई नव्हती. पण आतां **कुसुमपुर** अगदीं जवळ आलें आहे. ह्मणून तपास करून त्याच्या हातावर छाप मारल्याशिवाय कोणीही बाहेर जाण्यास किंवा आंत येण्यास समर्थ होत नाहीं, अशी व्यवस्था झाली आहे; व हें छाप मारण्याचें काम **मलयकेतूनें भागुरायणा**कडे सोंपविलें आहे. तेव्हां जर त्याच्याकडून तुला छाप मिळेल, तर बेफिकीर तूं जा. नाहीं तर येथेंच रहा. कारण, तसा गेलास तर ठिकठिकाणीं पहारेवाले आहेत, ते मुसक्या बांधून तुला राजाजवळ हजर करतील.'

हें ऐकून **सिद्धार्थक** ह्मणाला, 'भदंतजी, तुह्मांला हें माहीत नाहीं का, कीं मी अमात्य **राक्षसा**चा अगदीं जवळचा चाकर आहें. छाप नसतांही मी बाहेर जाऊं लागलों, तरी मला अटकाव करण्याची कोणाची छाती आहे?'

**क्षपणक** ह्मणाला, 'बाबा, तूं **राक्षसा**चा मनुष्य अस, किंवा पिशाचाचा अस, हातावर छाप घेतल्याशिवाय येथून बाहेर जाण्याला दुसरा कांहींच उपाय नाहीं.'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'भदंतजी, असे रागावूं नका. माझी कार्यसिद्धि होण्याविषयीं आशीर्वाद द्या.'

हें ऐकून **क्षपणक** ह्मणाला, 'श्रावका, बाबा, खुशाल जा, तुझी कार्यसिद्धि होवो. मलाही बाहेर जावयाचें आहे. पण तुझ्यासारखें मला कोण जाऊं देणार? तेव्हां मी **भागुरायणा**जवळ जाऊन हातावर छाप मारून घेतों.' असें बोलून **क्षपणक भागुरायणा**कडे येण्यास निघाला, व **सिद्धार्थक कुसुमपुरा**कडे जाण्यास निघाला.

इकडे छाप मारण्याचें साहित्य हातांत घेतलेल्या **भासुरक** नांवाच्या सेवकासहवर्तमान **भागुरायण** देवढीवर जाण्यास निघाला. आज पुढें काय काय गोष्टी करावयाच्या आहेत, त्या त्याच्या मनांत घोळत होत्या. तो आपल्याशींच ह्मणाला, ही आर्य **चाणक्या**ची मसलत मोठी विलक्षण आहे खरी. प्रथम दिसतांना ही फारच लहान दिसते; पण पुढें हिचा अतिशय विस्तार होतो. पुढें ही इतकी कृश होते कीं, तिचें स्वरूप मुळींच लक्षांत येत नाहीं. पुनः तिचें शरीर परिपूर्ण भरलें आहे असें दिसतें. गरज लागली ह्मणजे पुनः अत्यंत कृश होते. आणखी कांहीं वेळानें पहावें, तों हिचें बीज देखील नाहीं असें दिसतें, पण पुनः बहुत फळांनीं ओथंबल्यासारखी दिसते. नीतिशास्त्र जाणणाऱ्या ह्या आर्य **चाणक्या**ची नीति दैवासारखी विचित्र आहे!

**भासुरका**ला ह्मणाला, 'बाबा **भासुरका**, मीं अगदीं शेवटच्या चौकीवर जाऊन बसावें, असा विचार केला होता, पण कुमार **मलयकेतु** मला क्षणभर देखील दूर होऊं देत नाहीं. याकरितां ह्या त्याच्या तंबूच्या जवळच ही राहुटी दिली आहे, येथें माझें आसन ठेव.'

**भागुरायणानें** असें सांगितल्यावरून **भासुरकानें मलयकेतूच्या** तंबूच्या जवळच्या राहुटींत त्याच्याकरितां एक गालिचा हांतरला, व तक्के वगैरे ठेविले. तेव्हां **भागुरायण** आपल्या आसनावर बसून **भासुरकाला** ह्मणाला, 'अरे, असें कर कीं जो कोणी छाप घेण्याकरितां माझ्या भेटीस येईल, त्याला तूं लवकर घेऊन ये.'

याप्रमाणें सांगितल्यावरून, 'हुकुमाप्रमाणें करतों' असें सांगून **भासुरक** बाहेर गेला. इकडे **भागुरायण** मनांत ह्मणाला, अरेरे! आह्मी कपटानें अशी मसलत करीत आहों, तरी हा बिचारा भाबडा **मलयकेतु** माझ्यावर फारच स्नेह ठेवतो; आणि असें असून त्याचाच नाश करावयाचा, ही गोष्ट मोठी वाईट आहे खरी, पण त्याविषयीं उपाय काय? बोलून चालून आपण दुसऱ्याचे ताबेदार आहों, तेव्हां हुकुमाप्रमाणें काम केलेंच पाहिजे. दुसऱ्याचा चाकर झालेल्या मनुष्याला आपलें कुलशील, लाजलज्जा, तसाच नांवलौकिक, व मानमान्यता, यांच्याकडे अगदीं पाठ केली पाहिजे, आणि ह्या क्षणिक शरीराला केवळ लोभानें द्रव्यवान् पुरुषाला विकलें पाहिजे. आणि असें झालें, ह्मणजे त्यांच्या हुकुमाप्रमाणें वागणाऱ्या सेवकाला, हित आणि अहित यांचा मुळींच विचार न करितां, धनी सांगेल तें काम केलें पाहिजे. तात्पर्य, परतंत्र झालेल्या मनुष्याला विचार अगदीं दूर ठेवावा लागतो.

**भागुरायण** याप्रमाणें विचार करीत आहे, इतक्यांत **मलयकेतु** मुखप्रक्षालन वगैरे आटपून, जनानखान्यांतल्या चोपदारणीला बरोबर घेऊन, **भागुरायण** बसला होता तेथें येण्यास निघाला. **राक्षसाविषयीं भागुरायणानें** वर-

चेवर त्याच्या मनांत कांहीं विकल्प भरवून दिल्यामुळें तो गोंधळांत पडला होता, व सारावेळ त्याच गोष्टी त्याच्या मनांत घोळत होत्या. तो आपल्याशींच ह्मणाला, **राक्षसाच्या** संबंधानें वरचेवर माझ्या मनांत अनेक कल्पना येऊं लागल्यामुळें माझ्या मनाचा गोंधळ झाला आहे. एक निश्चय करणार असा प्रयत्न केला तरी तसें कांहींच घडत नाहीं. कारण, आपण **राक्षसाच्या** सांगण्यावर भरंवसा ठेवून आतां स्वारी करावयास निघालों आहों, पण पुढें काय होईल कोणास ठाऊक! **राक्षसाचा नंदाच्या** वंशावर जो विशेष अनुराग आहे, त्यानें त्याची भक्ति दृढ होऊन **चंद्रगुप्त** हा **नंदाच्या** सरळ वंशांतला जरी नाहीं, तरी पण त्याचा **नंदाच्या** वंशाशींच विशेष संबंध आहे, व **राक्षसाचा** मुख्य शत्रु **चाणक्य** हा त्याच्यापासून दूर झाला आहे. **नंदाच्या** वंशापैकीं कोणीच बाकी राहिलेलें नाहीं. यावरून राक्षस **चंद्रगुप्ताशीं** सख्य करील कीं काय अशी शंका येते. तसेंच तो सत्यप्रतिज्ञ आहे, व माझ्यावर त्याचें विशेष प्रेमही आहे, तेव्हां आपली प्रतिज्ञा खरी करण्याकरितां माझाच पक्ष घेऊन राहणार नाहीं असेंही ह्मणवत नाहीं. तात्पर्य, एकमेकांच्या विरुद्ध असे निरनिराळे तर्क मनांत येऊं लागल्यामुळें, कुंभाराच्या चाकावर बसल्याप्रमाणें, माझें चित्त एकसारखें फिरत आहे.

बरोबरची चोपदारीण **विजया** हिला ह्मणाला, '**विजये, भागुरायण** कोठें आहे?'

**विजया** ह्मणाली, 'सरकार, हा पहा फौजेच्या तळांतून बाहेर जाण्याची इच्छा करणाराला खुणेचे छाप देत बसला

आहे.' असें सांगून तिनें, **भागुरायण** ज्या राहुटींत बसला होता, ती राहुटी त्याला दाखविली.

**मलयकेतु** **भागुरायणाशीं** अगदीं जिवलग मित्राप्रमाणें वागत होता. यद्यपि तो त्याचा चाकर होता, तरी **मलयकेतु** तें नातें मनांत मुळींच बाळगीत नव्हता. लंगोटीयार मित्राशीं वर्तन ठेवावें, त्याप्रमाणें तो **भागुरायणाशीं** ठेवीत होता. **भागुरायण** यावेळीं कांहीं काम करीत बसला आहे, तेव्हां पाठीमागून जाऊन हळूच त्याचे डोळे गच्च धरावे, असा विचार करून **मलयकेतूनें** **विजयेला** बाहेरच उभी राहण्यास सांगितलें, व आपण हळूच पुढें जाऊन त्याचे डोळे धरण्याचा त्यानें बेत केला.

**मलयकेतु** त्या राहुटीच्या आंत आला नव्हता, व तो पुढें तसें करणार, तो इकडे **भागुरायणानें** सांगितल्याप्रमाणें **भासुरक** आंत येऊन ह्मणाला, 'आर्या, हा क्षपणक **जीवसिद्धि** छाप घेण्याकरितां बाहेर आला असून आपल्या भेटीची इच्छा करीत आहे.'

हें ऐकून **भागुरायणानें**, 'त्याला आंत घेऊन ये,' असें सांगितलें, तेव्हां **भासुरक** **क्षपणकाला** तेथें घेऊन आला.

**भागुरायणाला** पाहून **क्षपणकानें**, 'श्रावकाला धर्मसिद्धि प्राप्त होवो,' असा आशीर्वाद दिला.

**क्षपणकाला** लक्षपूर्वक पाहून, हा **चाणक्याचा** परम मित्र **इंदुशर्मा** नांवाचा ब्राह्मण, असा क्षपणकाचा वेष घेऊन मुद्दाम **राक्षसाचा** मित्र बनलेला, तो हाच असें तो समजला. तेव्हां त्याला ह्मणाला, 'काय, तुह्मी बाहेर जाण्याची इच्छा करीत आहां? **राक्षसाच्याच** कांहीं कामाकरितां जावयाचें आहे का?'

**क्षपणक** ह्मणाला, 'शिव शिव, श्रावका, मला तेथें जावयाचें आहे, कीं जेथें राक्षसाचें किंवा पिशाचाचें नांव देखील ऐकावयास मिळावयाचें नाहीं.'

हें ऐकून **भागुरायण** ह्मणाला, 'यावरून तुमचा आपल्या मित्रावर ( **राक्षसावर** ) मोठा प्रणयकोप आहे, असें वाटतें. पण कायहो भदंतजी, **राक्षसानें** असा तुमचा अपराध तरी काय केला ?'

**क्षपणक** ह्मणाला, 'श्रावका, **राक्षसानें** माझा कांहीं एक अपराध केला नाहीं. कपाळफुटका दुर्दैवी मी आपल्याच कर्मांनीं आपल्या ठिकाणीं शरमतों आहें.'

**भागुरायण** ह्मणाला, 'भदंतजी, ह्या तुमच्या बोलण्याचें मला मोठें कौतुक वाटतें. तुमची हकीकत ऐकण्याची माझी इच्छा आहे.'

इकडे **मलयकेतु भागुरायणा**ची थट्टा करण्यास आला होता, पण क्षपणकाचा आणि त्याचा संवाद ऐकून, तो तेथल्या तेथेंच पडद्याच्या आड ऐकत उभा राहिला.

इकडे **क्षपणक** ह्मणाला, 'श्रावका, ऐकण्याला अयोग्य अशा गोष्टी ऐकून तुह्मांला काय करावयाचें आहे?'

**भागुरायण** ह्मणाला, 'तसें कांहीं नाहीं, तें जर गुप्त असलें तर सांगूं नका बापडे!'

**क्षपणक** ह्मणाला, 'छेछे, तें तसें कांहीं गुप्त नाहीं; पण मोठें कठोरपणाचें आहे.'

**भागुरायण** ह्मणाला, 'गुप्त नसेल तर मग सांगा.'

**क्षपणक** ह्मणाला, 'श्रावका, गुप्त तर नाहीं; पण तें मी सांगणार नाहीं.'

**भागुरायण** ह्मणाला, 'तर मग मीही तुह्मांला छाप देणार नाही.'

हें ऐकून **क्षपणक** मनांत ह्मणाला, बरोबर, माझें याच्याकडे काम आहे, तेव्हां यानें मला असें अडविलें हें ठीकच आहे. **भागुरायणाला** ह्मणाला, 'न सांगून काय परिणाम आहे? सांगतों महाराज. **राक्षस पाटलिपुत्र** नगरांत रहात होता, त्यावेळीं दुर्दैव्याची माझी त्याच्याशीं विशेष मैत्री झाली. त्यावेळीं **राक्षसानें**, गुप्तपणें विषकन्या उत्पन्न करून, **पर्वतराजाला** मारविलें.'

हें वाक्य ऐकून इकडे **मलयकेतूच्या** डोळ्यांतून अश्रुपात चालू झाला. तो मनांत ह्मणाला, एकून **राक्षसानेंच** बाबांना मारविलें तर, **चाणक्यानें** नाहीं. **चाणक्याच्या** नांवाचा उगीच पुकारा केला!'

**भागुरायण** ह्मणाला, 'भदंतजी, बरें मग पुढें काय झालें!'

**क्षपणक** ह्मणाला, 'नंतर मी **राक्षसाचा** मित्र आहें, ह्मणून **चाणक्यानें** माझी धिंड काढून मला शहरांतून बाहेर घालविलें. याप्रमाणें एक वेळ **राक्षसाच्या** मित्रत्वाचें फळ मला चांगलें मिळालें. असें असून आतां पुनः अनेक वाईट वाईट कामें करण्याच्या कामांत अत्यंत कुशल, असा **राक्षस** तसलेंच कांहीं वाईट काम करण्याला तयार झाला आहे. त्याच्या योगानें तर मला ह्या लोकांतूनच जाण्याचा प्रसंग येईल!'

हें ऐकून **भागुरायण** मुद्दाम ह्मणाला, 'भदंतजी, तुह्मी असें सांगतां, पण पूर्वी राज्याचा अर्धा भाग देण्याचें कबूल केलें होतें, त्याप्रमाणें तें द्यावें लागेल ह्मणून त्या दुष्ट

**चाणक्या**नेंच **पर्वतेश्वरा**ला मारविण्याचें वाईट काम केलें, असें आह्मीं ऐकलें होतें.'

हें ऐकून कानांवर हात ठेवून **क्षपणक** ह्मणाला, 'शिव शिव! **चाणक्यानें** त्या विषकन्येचें नांव देखील ऐकिलें नव्हतें.'

**भागुरायण** ह्मणाला, 'ठीक आहे. तुला छाप पाहिजे आहे तो मिळेल. माझ्याबरोबर येऊन हेंच वर्तमान कुमार **मलयकेतू**ला सांग.' असें बोलून **भागुरायण क्षपण**काला घेऊन **मलयकेतू**कडे जावयास निघाला.

इतक्यांत **मलयकेतु भागुरायणा**जवळ जाऊन ह्मणाला, 'श्रवणेंद्रियांचें विदारण करणारें वर्तमान या **क्षपणकानें** काय सांगितलें तें मी ऐकिलें, व त्याच्या योगानें माझ्या पित्याच्या वधाचें दुःख,—त्या गोष्टीला बहुत दिवस झाले आहेत तरी,— आज द्विगुणित झालें.'

हें ऐकून **क्षपणक** मनांत ह्मणाला, मी काय बोललों तें ह्या दुष्ट **मलयकेतूनें** ऐकिलें. आतां मी कृतकृत्य झालों. असें बोलून, तो **भागुरायणा**कडून छाप घेऊन, निघून गेला.

इकडे **मलयकेतु, राक्षस** आपल्या समोर उभा असल्याप्रमाणें, आकाशाकडे लक्ष्य लावून ह्मणाला, '**राक्षसा** अरे **राक्षसा**, चांगलें केलेंस! तुला आपला मित्र समजून विश्वासानें सर्व कार्यभार ज्यानें तुझ्यावर ठेवून, जो आपण बिनघोर राहिला होता, त्या माझ्या वडिलाला आप्तजनांच्या दुःखाश्रूंसहवर्तमान मारून टाकून, हे **राक्षसा**, तूं आपलें नांव खरोखर अन्वर्थ केलेंस! यावरून तूं खरोखरीचाच राक्षस आहेस, असें मला वाटतें!

**मलयकेतु** यावेळीं अतिशय संतापला होता, व रागा-

च्या आवेशांत कदाचित् तो **राक्षसाचा** प्राणदेखील घेईल, अशी त्याची मुद्रा उग्र झाली होती, तें पाहून **भागुरायण** मनांत ह्मणाला, **राक्षसाचे** प्राण रक्षण करावे, अशी आर्य **चाणक्याची** मला आज्ञा आहे. **मलयकेतूच्या** यावेळच्या मुद्रेवरून हा कदाचित् त्याचा घात देखील करील, असें वाटतें, तर आपण अंमळ याचा राग शांत केला पाहिजे. असा विचार करून **मलयकेतूला** ह्मणाला, 'असे आवेशावर येऊं नका. अंमळ आसनावर बसाल, तर कांहीं विनंति करावी अशी माझी इच्छा आहे.'

**मलयकेतु भागुरायणाला** सर्वस्वीं विकल्यासारखा झाला होता. त्याच्या सांगण्याबाहेर त्याचें एक पाऊल देखील पडत नव्हतें. तो इतका संतापला होता, तरी **भागुरायणानें** सांगतांच मुकाट्यानें आसनावर बसून ह्मणाला, 'आतां तुझ्या मनांत काय सांगायचें आहे तें सांग.'

**भागुरायण** ह्मणाला, 'कुमार **मलयकेतो**, माझ्या बोलण्याचा नीट विचार कर. राजव्यवहाराला अनुसरून वागणाऱ्या पुरुषांचे कार्यवशात् कोणी शत्रु होतात, तेच मित्र होतात, व पुनः तेच कदाचित् उदासीनही होतात. साधारण लोकांप्रमाणें, शत्रु ते शत्रु, मित्र ते मित्र, व उदासीन ते उदासीन, असा या राजव्यवहारांत नियम असत नाहीं, व आपल्या इच्छेप्रमाणें त्यांचा निश्चयही करवत नाहीं. स्वार्थ सिद्ध व्हावयाचा असला, तर शत्रूचा मित्र, व मित्राचा शत्रु, व्हावयाला वेळ लागत नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें **पर्वतेश्वराच्या** वधाच्या संबंधानें **राक्षसावर** विशेष दोष ठेवतां येत नाहीं. कारण, **पर्वतेश्वराचा** नाश झाला, त्यावेळीं **नंदांपैकीं** ज्ञातारा **सर्वार्थ**-

**सिद्धि** जिवंत होता, व त्याला पुनः राज्य द्यावें असा **राक्षसाचा** पूर्ण इरादा होता. आणि **चंद्रगुप्तापेक्षांही** मोठा बलवान् तुझा पिता **पर्वतेश्वर**, हाच त्यावेळीं मोठा शत्रु झाला होता. कारण, अर्धराज्याचा अधिकारी तो असल्यामुळें, **सर्वार्थसिद्धी**ला राज्य देण्याच्या कामीं **चंद्रगुप्तापेक्षां पर्वतेश्वर** विशेष आड येणार होता. तेव्हां आपल्या धन्याच्या कामाकरितां **राक्षसानें** कदाचित् **पर्वतेश्वराचा** घात करविला, तथापि त्यांत त्याचा कांहीं दोष आहे असें मला वाटत नाहीं. विचार करून पहा कीं, प्रयोजन हें मोठें विलक्षण आहे. त्या प्रयोजनाच्या संबंधानें, मित्राला शत्रुत्वाप्रत, व शत्रूला मित्रत्वाप्रत पावविलें जातें. पूर्वीच्या वृत्तांताचें स्मरण न होऊं देतां, ही राजनीति, जिवंत असून जन्मांतराला पोंचविल्याप्रमाणें, मनुष्याला रूपांतर देते. याकरितां मी असें ह्मणतों कीं, **पर्वतेश्वराच्या** वधाबद्दल तूं **राक्षसाला** दोष देऊं नको. **नंदाचें** राज्य तुझ्या हातीं येईपर्यंत तूं त्याच्याच तंत्रानें वाग, नंतर पाहिजे तर तूं त्याला आपल्याजवळ ठेव, किंवा नको ठेवूं, वाटेल तसें कर.'

हें **भागुरायणाचें** भाषण **मलयकेतूला** खरें वाटलें. तो ह्मणाला, 'तूं बरोबर सांगितलेंस. कारण, प्रधानाचा वध केला, तर इतर कामदार लोक क्षुब्ध होतात; व तसें झालें ह्मणजे विजय प्राप्त होण्याचा संदेहच असतो. तेव्हां यावेळीं तसें कांहीं करतां उपयोगी नाहीं. तूं ह्मणतोस त्याप्रमाणेंच वागलें पाहिजे.'

**सिद्धार्थक** हातावर छाप न मारून घेतां, तसाच छावणीच्या बाहेर जाण्यास निघाला होता हें पूर्वी सांगितलेंच

आहे. अशा रीतीनें आपण बाहेर गेलों, तर आपल्याला कैद करतील हें त्याला माहीत होतें. तरी आपणांला कैद करून **मलयकेतू**समोर न्यावें, ह्मणून तो मुद्दाम तसा गेला होता. तो युक्तिप्रयुक्तीनें एका चौकींतून कसातरी पार पडला, पण दुसऱ्या चौकीवर पाहरेकऱ्यांनीं त्याला पकडलें. त्या चौकीवरचा मुख्य जमादार **दीर्घरक्ष**, याला **सिद्धार्थका**नें, 'मी **राक्षसा**चा हुजऱ्या आहें, व त्यानें फार जरुरीच्या कामाकरितां मला पाठविलें आहे, असें असून तुह्मी मला अटकाव करितां हें चांगलें नाहीं,' अशा रीतीनें पुष्कळ दम दिला. तरी त्यानें त्याच्या हातांत खोडा घालून त्याला **भागुरायणा**जवळ हाजर केला. **भागुरायणा**चें **मलयकेतू**शीं भाषण चाललें आहे, इतक्यांत **भासुरक** आंत येऊन, **मलयकेतू**ला मुजरा करून ह्मणाला, 'महाराज, बाहेरच्या चौकीवरचा जमादार **दीर्घरक्ष** यानें, हातावर छाप न घेतां लखोटा घेऊन बाहेर जाऊं इच्छिणारा कोणी मनुष्य पकडून आणला आहे. तर सरकारांनीं त्याला पहावें अशी तो विनंती करितो आहे.'

हें ऐकून **भागुरायण** ह्मणाला, 'अरे, त्याला लवकर आंत घेऊन ये.'

**भागुरायणा**च्या आज्ञेप्रमाणें, थरथर कांपत असून भ्याल्याचें सोंग घेतलेल्या, **सिद्धार्थका**ला **भासुरका**नें उभयतांच्या पुढें आणून उभा केला.

**सिद्धार्थक** मनांत ह्मणाला, दोषापासून पराङ्मुख करून सर्व गुणांला मात्र पुढें दाखविणारी अशी, व आमच्यासारख्या मनुष्यांची जी केवळ जननी, अशा स्वामिभक्तीला नमस्कार असो!

**सिद्धार्थक** पुढें उभा राहिला, तेव्हां **भागुरायण भासुरकाला** ह्मणाला, 'बाबा, अरे हा ( **सिद्धार्थक** ) काय नवाच येथें आला आहे, किंवा आपल्यापैकींच कोणाचा चाकर आहे ?'

हें ऐकून **सिद्धार्थक** ह्मणाला, 'आर्या, मी अमात्य **राक्षसा**चा चाकर आहें.'

**भागुरायण** ह्मणाला, 'तर मग छाप घेतल्यावांचून गोटांतून कां बाहेर जात होतास ?'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'महाराज, तसेंच कांहीं जरुरीचें काम होतें, ह्मणून गडबडीनें निघालों होतों.'

**भागुरायण** ह्मणाला, 'अरे, सरकारचा हुकूम न मानण्यासारखें असें तुझें कसलें काम होतें ?'

**सिद्धार्थका**च्या हातांत मोहोर केलेला लखोटा होता, तो पाहून **मलयकेतु भागुरायणा**ला ह्मणाला, 'गड्या, आधीं याच्या हातांत तो लखोटा कसला आहे तो घे, मग पुढें बाकीची चवकशी.'

हें ऐकून **भागुरायणानें सिद्धार्थका**च्या हातांतून लखोटा हिसकावून घेतला, आणि त्याच्यावरची मोहोर पाहून **मलयकेतू**ला, ह्मणाला, 'हा पहा लखोटा. ही याच्यावर **राक्षसा**च्या नांवाची मोहोर केलेली आहे.'

**मलयकेतु** ह्मणाला, 'ती मोहोर न बिघडूं देतां हळूच तो लखोटा उघडून दाखीव बरें.'

हें ऐकून **भागुरायणा**नें त्याप्रमाणें लखोटा उघडून, त्यांतलें पत्र काढून तें **मलयकेतू**च्या हातांत दिलें, व **मलयकेतूनें** तें वाचून पाहिलें, त्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर होता

"यथास्थानीं सर्वांचें स्वस्तिक्षेम आहे. कोठून तरी कोणीतरी कोणातरी विशिष्ट पुरुषाला असें कळवीत आहे कीं, आमचा प्रतिपक्षी (**चाणक्य**), याला दूर करून सत्य भाषण करणाऱ्या आपण कांहीं गोष्टींची सत्यता करून दाखविली. सांप्रत, प्रथम आमच्याशीं सख्य करणाऱ्या ह्या आम्हांला, पूर्वी प्रतिज्ञा केल्याप्रमाणें त्यांला जें कांहीं द्यावयाचें आहे, तें देऊन सत्यसंध आपण त्यांची प्रीति संपादन करण्याला योग्य अहांत. हेही, याप्रमाणें त्यांच्यावर अनुग्रह केला असतां, आपल्या आश्रयाचा नाश करून उपकार करणाऱ्या तुमचा आश्रय करतील. याची आपल्याला आठवण नसेल असें नाहीं. तथापि, आह्मी ही पुनः आठवण देत आहों. त्यांमध्यें कित्येक, शत्रूचा खजिना व दंडाधिकार, यांची इच्छा करणारे आहेत. कित्येकांला मुलूख मिळावा अशी इच्छा आहे. आपण बहुमोल तीन दागिने पाठविले ते पोंचले. मीही आपण लिहिल्याप्रमाणें कांहीं पाठविलें आहे, त्याचा कृपा करून स्वीकार करावा, मुखजबानीनें विशेष हकीकत सांगावयाची आहे, ती पत्र घेऊन येणाऱ्या ह्या विश्वासू मनुष्याकडून ऐकून घ्यावी."

आपला सेवाभिलाषी,

कोणीतरी.

याप्रमाणें पत्र वाचून **मलयकेतु भागुरायणाला** ह्मणाला, 'सख्या, हा मजकूर कसा काय आहे?'

**भागुरायण सिद्धार्थकाला** ह्मणाला, 'कां, बाबा **सिद्धार्थका**, खरेंच सांग, हें कोणाचें पत्र?'

**सिद्धार्थकानें** बोलून चालून ही बतावणीच केली होती. तो ह्मणाला, 'मला काय ठाऊक?'

**भागुरायण** ह्मणाला, 'अरे धूर्ता, हें पत्र घेऊन तूं जात आहेस, आणि हें कोणाचें हें तुला ठाऊक नाहीं काय? बरें, तें सारें असो, तुझ्याकडून तोंडीं हकीकत कोणी ऐकायची होती तें तरी सांग ?'

हें ऐकून **सिद्धार्थक** भ्याल्यासारखें करून ह्मणाला, 'तुह्मी ऐकावयाची.'

**भागुरायण** त्याला दर्डावून ह्मणाला, 'काय! आह्मी ऐकावयाची, आणि ती कशी!'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'तुह्मी मला पकडलें आहे, तेव्हां काय बोलावें तें मला सुचत नाहीं.'

**भागुरायण** रागावून ह्मणाला, 'असें आहे काय? बरें हें पहा आतां समजेल तुला! **भासुरकाला** हाक मारून ह्मणाला, 'अरे, याला बाहेर घेऊन जा, आणि हा कबूल होई तोंपर्यंत याला खूप चांगला मार दे.'

याप्रमाणें हुकूम होतांच **भासुरकानें सिद्धार्थकाला** बाहेर नेलें. त्यानें कोरडा लगावतांच **सिद्धार्थक** सांगण्यास कबूल झाला; व इतक्यांत त्याच्या काखेंतून एक थैली बाहेर पडली. ती थैली घेऊन **सिद्धार्थकासहवर्तमान भासुरक** आंत येऊन **भागुरायणा**ला ह्मणाला, 'आर्या, मोहोर केलेली ही थैली त्याच्या काखेंतून खालीं पडली. ही पाहून घ्या.'

**भागुरायणानें** ती थैली पाहून, हिच्यावर देखील ही **राक्षसाची** मोहोर आहे ती पाहून घे, असें सांगून, ती **मलयकेतूच्या** हातीं दिली.

थैली पाहून **मलयकेतु** ह्मणाला, 'सख्या **भागुरायणा**, त्या पत्रांत कांहीं पाठविलें आहे ह्मणून लिहिलें **आहे**, तें

जिना मिळण्याची आशा करीत आहे. तर **चाणक्याला** दूर करून तूं (**चंद्रगुप्तानें**) जशी माझी प्रीति संपादन केलीस, तशीच आणखीं एक गोष्ट करावीस. हे पांच राजे माझे मित्र आहेत. त्यांना मी, त्यांच्या मनांत असलेलें देण्याचें कबूल केलें आहे. तें त्यांचें त्यांस देऊन त्यांला खुष करावें, एवढाच काय तो माझ्या मनांतील इष्ट हेतु आहे.' असें सांगून **सिद्धार्थक** ह्मणाला, 'झालें, महाराज, त्यांचा निरोप काय तो एवढाच होता.'

हें ऐकून **मलयकेतु** मनांत ह्मणाला, अरे! पण **चित्रवर्मा** इत्यादि पांच राजे देखील माझ्याशीं कसा द्वेष करतात! अथवा ते असे द्वेष्टे आहेत, ह्मणूनच **राक्षसावर** त्यांची विशेष प्रीति आहे. बरोबर, हें आतां मला समजलें.

**सिद्धार्थका**कडून जें कांहीं ऐकावयाचें होतें तें ऐकलें. तो जाण्याची गडबड करीत होता; पण त्याला तसाच ठेवून **मलयकेतूनें**, **विजया** नांवाच्या आपल्या चोपदारणीला **राक्षसाला** लवकर बोलावून आणण्यास सांगितलें, तेव्हां, 'आज्ञेप्रमाणें करतें,' असें सांगून ती त्याला बोलवायाला गेली.

इकडे **राक्षस** अनेक मसलती करीत असून, **मलयकेतूच्या** मनांत ज्या गोष्टी आल्या, त्या त्याच्या ध्यानीं-मनींही नव्हत्या. तो केवळ निष्कपटपणानें **मलयकेतूशीं** वागत असून, पुढें त्याला जय कसा प्राप्त होईल याविषयीं त्याचे सर्व विचार चालले होते. तो आपल्या मनांत ह्मणाला, माझ्या कानांवर असें वर्तमान आलें आहे कीं, **चंद्रगुप्ताच्या** फौजेंतले बहुतेक सर्व लोक आमच्या फौजेंत भरले आहेत; पण त्याविषयीं माझें मन शुद्ध नाहीं.

साध्य अर्थाविषयीं निश्चयानें अनुकूल असून, त्याच्या पक्षानें असणारें व विरुद्ध पक्षाकडे नसणारें, असें जें साधन असतें, तेंच कार्यसिद्धीला समर्थ होतें. आणि जें दोहोंकडेही सारखेंच असतें, त्या साधनाचा स्वीकार केल्यानें प्रसंगीं धन्याचा पराभव होतो.

अथवा **भद्रभट** इत्यादि हे **चंद्रगुप्तावर** नाराज होऊनच आपल्याला येऊन मिळाले आहेत, ह्मणून त्यांच्याविषयीं फारसे विकल्प घेण्याचें कांहीं कारण नाहीं.

**प्रियंवदक** नांवाच्या हुजऱ्याला हाक मारून ह्मणाला, 'अरे, माझ्या सांगण्यावरून कुमार **मलयकेतूबरोबरच्या** सर्व राजाला सांग कीं, सांप्रत दिवसेंदिवस **कुसुमपुर** अगदीं जवळ जवळ येत आहे. याकरितां नीट बंदोबस्त केला पाहिजे, तर तुह्मी आपापल्यांत फौजेच्या निरनिराळ्या तुकड्या करून मोठ्या हुषारीनें पुढें चला.'

आपसांत कसे विभाग करावे ते तुह्मांला सांगतों. सर्वांच्या पुढें **खस*** आणि **मगध** या दोन देशांतील वीरांनीं माझ्या सभोंवतीं वेढा देऊन, फौजेच्या आघाडीस जावें. **गांधार**† देशांतले वीर आणि यवन राजे, यांनीं मधल्या तुकडींत राहून प्रयत्न चालवावा, आणि मागच्या भागांत,

* **खस** या नावानें पूर्वकाळीं काहीं लोक प्रसिद्ध होते. हे **काश्मीरच्या** आसपास असणाऱ्या पहाडांत रहात असत. असें **प्रोफेसर विलसन साहेब** ह्मणतात.

† **गांधार** या नावानें एक देश प्रसिद्ध असल्याचें प्राचीन ग्रंथांत आढळतें. **धृतराष्ट्राची** स्त्री ही **गांधार** देशच्या राजाची मुलगी होती. ह्मणून तिला **गांधारी** ह्मणत असत. सांप्रत **कंदाहार** असें ज्याला ह्मणतात तेंच **गांधार** होय. त्याच्या आसपासच्या प्रदेश याला **गांधारदेश** व राजधानीचें शहर **कंदाहार** याला **गांधार** ह्मणत होते असें वाटतें.

**शक** राजे, **चीन** राजे; आणि **हूण*** सरदार, यांनीं व **कौलूत** **चित्रवर्मा** इत्यादि राजांनीं, कुमार **मलयकेतु** याच्या भोंवतीं असून, प्रयत्न चालवावा असें त्यांला सांग.'

हें ऐकून **प्रियंवदक**, 'हुकमाप्रमाणें करतों,' असें सांगून बाहेर गेला. इतक्यांत **मलयकेतू**ची चोपदारीण **विजया** आंत येऊन ह्मणाली, 'अमात्याचा जयजयकार असो! कुमार **मलयकेतु** आपल्या भेटीची इच्छा करीत आहेत.'

**राक्षस** यावेळीं कामाच्या गडबडीत होता. तो **विजये**ला ह्मणाला, 'बाई, अंमळ थांब.' आपल्या चाकराला उद्देशून ह्मणाला, 'अरे, बाहेर कोण आहे?' हें ऐकून एक हुजऱ्या आंत येऊन ह्मणाला, 'जी काय हुकूम आहे!'

**राक्षस** त्याला ह्मणाला, 'अरे, **शकटदासा**ला सांग कीं,

* सुमारें अडीचशें वर्षांपूर्वी **चौल** देशात **व्यंकटाध्वरि** नावाचा प्रख्यात कवि झाला होता. त्याणें **विश्वगुणादर्श चंपू** नावाचें काव्य केलें आहे. त्यांत **मद्रास** शहराचें वर्णन करताना त्यावेळी व्यापारी स्थितींत असलेल्या **इंग्लिश** लोकांचेंही वर्णन केलें आहे त्यात तो **इंग्लिशाना हूण** या शब्दानें निर्दिष्ट करतो. पण **प्रोफेसर विलसन्** वगैरे पश्चिमेकडील विद्वान लोक तें मान्य करीत नाहीत. त्याच्या मतें **हूण** नावाचे काही जंगली लोक **असाम** व **दार्जिलिंग** वगैरे प्रदेशात पूर्वकाळीं रहात होते हें त्यांचें वर्णन पुष्कळ अंशी प्रमाण मानण्यासारखें आहे कारण, प्रकृत ग्रंथाचें मूळ **मुद्राराक्षस** नाटक हें फार प्राचीन ह्मणजे **इंग्लिश** लोकास **हिंदुस्थान** नावाचा देश आहे किंवा नाही, याची कल्पना देखील नव्हती अशा वेळी झालेलें आहे व या ग्रंथात हूण शब्दाचा निर्देश आहे, इतकेंच नव्हे, तर **महाभारता**सारख्या अतिप्राचीन ग्रंथात देखील हा शब्द मिळतो. या शिवाय प्रसिद्ध कवि **बाणभट्ट** याणें **हर्षचरित** नावाचें जें काव्य केलें आहे. त्यात **हर्षराजा**चा वडीलबधु **राजवर्धन** याणें **हूण** लोकावर स्वारी केली होती. व ते लोक **दार्जिलिंगा**च्या पुढें व **कैलासा**च्या आसपास रहात होते असें सिद्ध होतें. एकदरीत **हूण** ह्मणजे **इंग्लिश** लोक अशी जी समजूत आहे, तिला काही आधार आहे असें दिसत नाही

मी आपल्या अंगावर मुळींच दागिने घालीत नाहीं, त्या दिवशीं ह्मणून कुमार मलयकेतूनें मुद्दाम माझ्या अंगावर ते दागिने घातले होते. तेव्हां आतां अलंकार घातल्यावांचून त्याच्या समोर जाणें उचित नाहीं. तसा गेलों तर कदाचित् त्याला वाईट वाटेल. त्यानें जे अलंकार पाठविले होते, ते तर आह्मीं सिद्धार्थकाला दिले. तरी कांहीं चिंता नाहीं. परवां आपण तीन दागिने विकत घेतले आहेत, त्यांपैकीं कोणतातरी एक दागिना दे ह्मणजे झालें.'

हरहर! भोळ्या माणसाची कशी फसगत होते, याचें हें एक उदाहरण आहे. मलयकेतूनें मोठ्या प्रेमानें आपल्याला अलंकार पाठविले असून, ते अंगावर न घालतां आपण अगदीं उघडा त्याच्याजवळ गेलों तर त्याला खेद वाटेल, ह्मणून राक्षसानें ही गोष्ट मनांत आणिली, व त्याप्रमाणें शकटदासानें एक दागिना त्याच्याकडे पाठविला तो त्यानें अंगावर घातला, पण त्याचा परिणाम फारच प्रतिकूळ झाला. जो दागिना त्यानें, मलयकेतूला वाईट न वाटावें ह्मणून, अंगावर घातला होता, तोच, मलयकेतूला—राक्षस हा आपला पुरा शत्रु आहे असें वाटण्याला, [illegible] झाला! असो.

हुजऱ्यानें शकटदासाकडून दागिना आणला, तो अंगावर धारण करून राक्षस विजयेसहवर्तमान मलयकेतूकडे गेला. मलयकेतु समोर बसला आहे असें पाहून तो मनांत ह्मणाला, काय असेल तें असो. राज्याचा अधिकार ज्या मनुष्याकडे असतो, तो अगदीं निर्दोष असला, तरी आपल्या धन्यासमोर जातांना त्याचें मन शंकित असतें. कारण, भय ह्मणून जो कांहीं पदार्थ आहे, तो धन्यापासूनच

सेवकाला प्राप्त होतो असें आहे; ह्मणून सेवक आपल्या यजमानाजवळ गेला, कीं त्याच्या पोटांत भय शिरतें. याकरितां अधिकारी पुरुष योग्यरीतीनें आपला अधिकार बजावूं लागले, ह्मणजे त्यापासून दुष्टांचा त्यांच्याशीं द्वेष होतो. एकंदरींत फार मोठ्या अधिकारावर असलेल्यांची, 'उंच वाढेल तो पडेल,' अशीच स्थिति असते.

**मलयकेतु** यावेळीं **राक्षसाला** गिळूं किं खाऊं असें करायाला, तयार झाला असून तो आतां, केवळ आपल्या अज्ञानानें व मतलबी मनुष्यांच्या फुसलावणीनें उत्पन्न झालेल्या क्रोधरूपी अग्नीच्या ज्वाळा त्याच्यावर सोडणार होता. तथापि **राक्षसाच्या** मनांत कांहीं विकल्प नसल्यावरून त्याचें मन पूर्वीसारखेंच स्थिर होतें

तो प्रेमानें **मलयकेतूकडे** पाहून ह्मणाला, 'हा येथें कुमार बसला आहे. यावेळीं आपल्या पायाच्या आंगठ्यावर यानें एकसारखी दृष्टि लावली आहे. जवळ कोणी गेलें, तरी हा त्याच्याकडे पहात नाहीं. यानें डाव्या हातांत आपलें मुख धरलें असून, मोठ्या कार्यभारानें जणुं काय नम्रच झाला आहे असा, हा मान खालीं घालून कांहीं विचार करीत बसला आहे.'

याप्रमाणें त्यानें वर्णन करीत **मलयकेतूच्या** अगदीं जवळ जाऊन **राक्षसानें** त्याला आशीर्वाद दिला. तेव्हां **मलयकेतु** आसनावरून उठून, **राक्षसाला** नमस्कार करून आसनावर बसण्याविषयीं त्यानें विनंती केली. **मलयकेतु** अतिशय संतापला होता, तरी **राक्षसाशीं** तशा नम्रपणानेंच वागण्याचा मूळपासून परिपाठ असल्यामुळें,

व स्वतः **राक्षस** मोठा तेजस्वी असल्याकारणानें, **मलयकेतु** त्याचा कोणत्याही प्रकारें अपमान करूं शकला नाहीं. दोघेही आपआपल्या आसनांवर बसले, तेव्हां **मलयकेतु** म्हणाला, 'आर्या, आपले दर्शन होऊन फार दिवस झाले, ह्मणून आमचे मन उद्विग्न झालें आहे.'

**मलयकेतूचें** हें मानभावीपणाचे बोलणें होतें, तरी **राक्षस** मोकळ्या मनानें ह्मणाला, 'हो, आतां स्वारींत कशी काय व्यवस्था करावयाची त्याचा बंदोबस्त करण्याच्या कामांत गुंतल्यामुळें, तुझ्याकडून हा मला टपका घ्यावा लागला.'

**मलयकेतु** ह्मणाला, 'आर्या, स्वारीचा बंदोबस्त आपण कसा काय केला आहे तो ऐकावा अशी इच्छा आहे.'

हें ऐकून **राक्षसानें** पूर्वी सांगितल्याप्रमाणें काय काय व्यवस्था केली होती तें सांगितलें. त्यांत **चित्रवर्मा** इत्यादि पांच राजे यांनीं **मलयकेतूबरोबर** असावें असें सांगण्यांत आले, त्यामुळें **मलयकेतुला** फारच वाईट वाटलें. नुकतीच **सिद्धार्थकानें** **राक्षसाचा** तोंडीं निरोप ह्मणून **मलयकेतूला** जी हकीकत सांगितली होती, तींत **चित्रवर्मा** इत्यादि पांच राजे **मलयकेतुचा** नाश करण्याची इच्छा करीत आहेत, असें त्याच्या ऐकण्यांत आलें होतें; व त्यामुळें त्या राजांला तो आपले शत्रु असें समजत होता. **राक्षसाचें** भाषण ऐकून तो आपल्या मनांत ह्मणाला, जे माझा नाश करून **चंद्रगुप्ताची** प्रीति संपादन करण्यास तयार झाले आहेत, त्याच पांच राजांना मला वेढून राहण्याची यानें कशी व्यवस्था ठेविली! यावरून एकंदरींत **सिद्धार्थकानें** सांगितलें तें खरें आहे यांत कांहीं शंका नाहीं. बरें असो; आपण ते पाहून घेऊं! तो **राक्षसाला**

ह्मणाला, 'आर्या, सांप्रत **कुसुमपुराला** जाणारा अथवा तिकडून येणारा कोणी जासूद आहे का?'

बिचाऱ्या **राक्षसाला** या प्रश्नाचा हेतु काय तें समजलें नव्हतें. तो निष्कपटपणानें ह्मणाला, 'आतां **कुसुमपुराकडे** जासूद जाण्यायेण्याचें कांहीं काम राहिलें नाहीं. थोड-क्याच दिवसांत स्वतः आह्मीच तेथें जाऊन पोंचणार आहों.'

'आह्मीच पोंचणार आहों' या वाक्याचा अर्थ **मल-यकेतूनें** उलट घेतला. तो मनांत ह्मणाला, हंहं समजलों. आतां आपण तेथें **चंद्रगुप्ताचे** दिवाण होऊन जाणार आहां! कांहीं चिंता नाहीं. तो **राक्षसाला** ह्मणाला, 'असें आहे तर मग आपण हा लखोटा देऊन जासूद पाठविला होता, याचें कारण काय?' असें बोलून त्यानें, लखोटा व दागिन्यांची थैली यांसहवर्तमान, **सिद्धार्थकाला राक्षसाच्या** पुढें आणून उभा करविला.

**राक्षसानें सिद्धार्थकाजवळ** पत्र वगैरे कांहींच दिलें नव्हतें, व त्याला **कुसुमपुराकडे** जाण्याविषयींही सांगि-तलें नव्हतें. तेव्हां त्याला त्याची माहिती कोठून असणार? **सिद्धार्थकाला** पाहून **राक्षस** ह्मणाला, 'बाबा **सिद्धार्थका**, हें काय आहे तुझ्या हातांत?'

**सिद्धार्थकानें** बोलून चालून सर्व कुभांडच रचलेलें होतें, व त्याची बतावणी कशी करावी या कामांत तो पक्का अनुभवलेला होता, तेव्हां त्यानें **राक्षसाचा** प्रश्न ऐकून डोळ्यांत अश्रु आणले, आणि भ्याल्यासारखें करून ह्मणाला, 'धनीसाहेब, क्षमा करा, मला यांनीं पुष्कळ मार दिला, ह्मणून मी ती गोष्ट गुप्त राखण्यास समर्थ झालों नाहीं.'

हें ऐकून **राक्षस** मोठ्याच अचंब्यांत पडला. त्याच्याजवळ आपण कधीं कांहीं मसलतीची गोष्ट सांगितल्याचें **राक्षसाला** मुळींच आठवत नव्हतें. तो ह्मणाला, 'अरे बाबा, खरें सांग. कसली गुप्त गोष्ट ? ती माझ्या मुळींच लक्षांत येत नाहीं.'

**सिद्धार्थकाला** स्पष्ट असें कांहीं बोलतां कामा नये होतें. कारण स्पष्ट बोलला, कीं आपलें कपट बाहेर पडण्याची त्याला भीति होती. तो पुनः भ्याल्यासारखें करून ह्मणाला, 'धनीसाहेब, मी सांगितलेंना ? मला मारल्यामुळें ती गोष्ट उघड करावी लागली.' असें बोलून, भयभीत होऊन, त्यानें मान खालीं घातली.

**सिद्धार्थक** हा **राक्षसाचा** चाकर होता. तेव्हां धन्यासमोर त्याच्यानें उघड बोलवणार नाहीं असें समजून, **मलयकेतु भागुरायणाला** ह्मणाला, 'गड्या, आपल्या धन्यापुढें भय वाटल्यामुळें किंवा लाज वाटत असल्यावरून या **सिद्धार्थकाच्यानें** खरी हकीकत सांगवणार नाहीं. तर यानें आपल्याजवळ काय काय सांगितलें तें तूंच सांग ह्मणजे झालें.'

हें ऐकून **भागुरायण** ह्मणाला, 'तुमच्या आज्ञेप्रमाणें सांगतों.' तो **राक्षसाला** ह्मणाला, 'दिवाणसाहेब, हा असें सांगतो कीं, मला आपण (**राक्षसानें**) हा लखोटा देऊन व तोंडीं कांहीं निरोप सांगून **चंद्रगुप्ताकडे** पाठविलें होतें.'

हें ऐकून **राक्षसाला** मोठेंच आश्चर्य वाटलें. तो **सिद्धार्थकाला** ह्मणाला, 'अरे, तूं असें सांगितलेंस हें खरें काय ?'

**सिद्धार्थक** खालीं मान घालून लाजत ह्मणाला, 'हो तसें सांगूं नये, पण यांनीं मला पुष्कळ मार दिला, ह्मणून मीं तें सांगितलें.'

**राक्षस** ह्मणाला, 'छत्. अगदीं खोटें. एकाद्या माणसाला उगीच मारूं लागलें, तर तो पाहिजे तें बोलेल; पण त्यांत काय अर्थ आहे?'

हें ऐकून **भागुरायणानें** लगेच तो लखोटा **राक्षसाच्या** हातांत दिला.

**राक्षसानें** तें पत्र वाचून पाहिलें, तों त्यांत सगळाच मजकूर विलक्षण होता. त्यावरून कदाचित् शत्रूनेंच हा प्रयोग केला असावा, असें त्याच्या मनांत आलें. तो ह्मणाला, 'मी खरोखर सांगतों, यापैकीं एक अक्षर देखील माझ्या हातचें नाहीं, हें सर्व शत्रूनें मुद्दाम रचलें असावें असें वाटतें.'

**चाणक्याची** तयारीच कांहीं विलक्षण होती. ही गोष्ट मुळापासून सर्व खोटी होती, तरी ज्याला आंतील हकीकत ठाऊक नाहीं, त्याला तसें वाटण्यासारखें मुळींच नव्हतें. त्यानें एकाला एक असे पुरावे सारखे लावून ठेविले होते. **सिद्धार्थकानें** तोंडीं जी हकीकत सांगितली, ती कदाचित् कोणी खोटी ह्मणेल, तर त्याच्याजवळचें पत्र त्याबद्दल खात्री करून देणारें होतें. पत्रही कदाचित् कोणी खोटें ह्मणेल, तर दागिन्यांची थैली खातरी पटविण्यास तयारच होती. **राक्षसानें** हा शत्रूचा प्रयोग ह्मटलें, तें ऐकून **मलयकेतु** ह्मणाला, 'आपण ह्मणतां त्याप्रमाणें कदाचित् मानतां येईल, पण पत्रांत लिहिल्याप्रमाणें बरोबर ही दागिन्यांची थैली आहे. तेव्हां हा शत्रूचाच प्रयोग असें कसें ह्मणतां येईल?' असें बोलून त्यानें दागिन्यांची थैली **राक्षसाच्या** हातांत दिली.

**राक्षस** ते दागिने पाहून **मलयकेतूला** ह्मणाला, 'हे दा-

गिने तूंच मला पाठविले होतेस, ते, ह्या **सिद्धार्थकानें** मला अतिशय आनंद होईल अशा प्रकारचें कांहीं कृत्य केल्याचें वर्तमान समजल्यावरून, याला मीं इनाम दिले होते.'

**भागुरायण** वरचेवर **मलयकेतूच्या** बुद्धीला विपर्यास होण्यासारखें बोलण्यास तयारच होता. तो ह्मणाला, 'असले दागिने, आणि त्यांतूनही कुमार **मलयकेतूनें** प्रत्यक्ष आपल्या अंगावरचे उतरून दिलेले, ते ह्या **सिद्धार्थकासा**रख्याला इनाम द्यायचे काय?'

**मलयकेतु राक्षसाला** ह्मणाला, 'आर्या, आपण ह्या पत्रांत **सिद्धार्थकाकडून** तोंडीं कांहीं निरोप ऐकण्याविषयीं लिहिलें आहे?'

हें ऐकून **राक्षस** गोंधळल्यासारखा होऊन ह्मणाला, 'कुठला निरोप, आणि कुठलें काय? निरोप सांगितला होता कोणीं? मुळीं हें पत्रच माझें नव्हे, मग निरोपाचा माझ्याशीं काय संबंध?'

यावर **मलयकेतु** ह्मणाला, 'सगळेंच उडवून टाकूं नका. हें पत्र तुमचें नव्हे, तर लखोटयावर केलेली मोहोर ही कोणाची?'

**राक्षसानें** मोहोर पाहिली, तों ती आपल्याच नांवाची आहे असें त्याला दिसलें, तरी तो ह्मणाला, 'मोहोर माझ्या नांवाची असली ह्मणून काय झालें? शत्रु अशा बनावट मोहोरा देखील करूं शकणार नाहीं काय? धूर्त लोक पाहिजे तें करूं शकतात.'

**भागुरायणाला** एकसारखें **राक्षसाच्या** विरुद्ध बोलतां येत नव्हतें. कारण, त्यानें, आपण मोठा निःपक्षपाती व प्रामाणिक असल्याबद्दल, **मलयकेतूची** खातरी केली

होती. **राक्षसाचें** बोलणें ऐकून तो **मलयकेतु**ला ह्मणाला, 'दिवाणसाहेब ह्मणताहेत तें खरें. धूर्त मनुष्य अशी बनावट मोहोर करणार नाहीं असेंही ह्मणवत नाहीं. तें असो.' तो **सिद्धार्थका**ला ह्मणाला, 'बाबा **सिद्धार्थका,** हें पत्र कोणाच्या हातचें, हें कांहीं तुला ठाऊक आहे का?'

**सिद्धार्थकानें** आणलेल्या सोंगाची बतावणी अगदीं पुरती केली होती. तो, डोळे कावरेबावरे करून, **राक्षसा**च्या तोंडाकडे पाहून, **भागुरायणा**च्या प्रश्नाचें कांहींएक उत्तर न देतां खालीं मान घालून, उभा राहिला. तेव्हां **भागुरायण** ह्मणाला, 'हूंहूं, काय तें सांग बाबा. उगीच पुनः आमच्याकडून आपल्याला मारवून घेऊं नकोस.'

तें पत्र कोणीं लिहिलें होतें, हें **सिद्धार्थका**ला माहीतच होतें. कारण, **चाणक्यानें** केवळ मसुदा मात्र करून दिला होता, व **सिद्धार्थकानें**च **शकटदासा**कडून त्याची नक्कल करून आणली होती. **भागुरायणानें** माराचें भय दाखविलें, तेव्हां अडखळत अडखळत **सिद्धार्थक** ह्मणाला, '**शकटदासानें**.'

हें ऐकून **राक्षस मलयकेतु**ला ह्मणाला, 'जर **शकटदासानें** हें पत्र लिहिलें असेल, तर तें प्रत्यक्ष मींच लिहिलें असें ह्मटलें पाहिजे.'

हावेळपर्यंत **राक्षसावर** एकेक गोष्टीचा पुरावा होत गेला. तथापि प्रत्येक गोष्टीवर त्याचें कांहींतरी उत्तर होतें. **शकटदासानें** लिहिलें असलें तर आपणच लिहिलें हें त्याचें बोलणें ऐकून **मलयकेतु** ह्मणाला, 'आतां अधिक पंचाईत कशाला पाहिजे?' जवळ चोपदारीण होती तिला ह्मणाला, 'अग, लवकर जा आणि **शकटदासाला** बोलावून

घेऊन ये.' याप्रमाणें हुकूम होतांच, चोपदारीण **शकट**-**दासाला** बोलवायास निघाली. हें पत्र **शकटदासाच्याच** हातचें आहे किंवा काय, याविषयीं **भागुरायणाला** कांहींच माहीत नव्हतें. तो मनांत ह्मणाला, **सिद्धार्थक** हा आर्य **चाणक्याचा** हेर आहे. तो खोटी गोष्ट कधींही बोलणार नाहीं. पण हें पत्र **शकटदासाच्या** हातचें असण्याचा कांहीं संभव दिसत नाहीं. तरी **सिद्धार्थक** ह्मणतो यावरून त्याच्याच हातचें असेल, यांत कांहीं संशय नाहीं.

**शकटदास** हा **राक्षसाचा** खानगी चिटणीस होता. बहुतेक सर्व पत्रव्यवहार त्याच्याच हातचा असे. **भागु**-**रायण मलयकेतूला** ह्मणाला, 'हा **सिद्धार्थक** सांगतो, त्याप्रमाणें हें पत्र **शकटदासाच्याच** हातचें असलें, तरी तो आपल्या धन्याच्या ( **राक्षसाच्या** ) समोर तसें कधींही सांगणार नाहीं. याकरितां **शकटदासाच्या** हातचीं दुसरीं पत्रें आणून पाहिलीं ह्मणजे झालें. दोहोंचें अक्षर परस्पर मिळालें, तर हा ह्मणतो तें खरें आहे, असें अर्थात् सिद्ध होईल.'

वस्तुतः यावेळीं **शकटदासाला** तेथें आणला असता तर दुसरीच कांहीं गोष्ट निष्पन्न झाली असती. कारण, ज्या पत्राच्या संबंधानें तूर्त इतकें विवेचन चाललें आहे, तें जरी त्यानेंच लिहिलें होतें, तरी प्रत्यक्ष **सिद्धार्थकानें**च, 'आर्य **चाणक्य** याची प्रत करून मागतो,' असें सांगून **चाण**-**क्याच्या** नांवानें तें त्याच्याकडून लिहून आणविलें होतें. यद्यपि त्या पत्रांत कोणाचें नांव गांव वगैरे कांहीं नव्हतें, तथापि त्यांतील मजकूर **शकटदासाच्या** स्मरणांतून गेला असेल असें ह्मणतां येत नाहीं; व त्यावरून हें पत्र बनावट

आहे असें कदाचित् त्यानें सांगितलें असतें. इतकें झालें असतें तरी अडाणी **मलयकेतू**ला तें खरें वाटलें असतें किंवा नाहीं, याचा संशयच आहे. तथापि घटकाभर भवति न भवति करण्यास जागा झाली असती.

पण **भागुरायणा**नें तसा प्रसंगच येऊं दिला नाहीं. अक्षर ताडून पाहण्याची त्यानें कल्पना काढली ती **मलयकेतू**ला मान्य झाली; तेव्हां त्यानें **विजयेला**, त्याच्या हातचीं पत्रेंच घेऊन ये, असा हुकूम केला.

**विजया** ही मोठी चतुरच होती. ती ह्मणाली, 'नुसतीं पत्रेंच आणूं किंवा मोहोर देखील आणूं?'

**मलयकेतु** ह्मणाला, 'दोन्हीही घेऊन ये.'

याप्रमाणें हुकूम होतांच, **विजया शकटदासा**कडे जाऊन तिनें त्याच्या हातचीं पत्रें व **राक्षसा**च्या नांवाची मोहोर, हीं दोन्हीही **मलयकेतू**पुढें आणून हजर केलीं. तेव्हां **सिद्धार्थका**जवळचें पत्र व नुकतेंच **शकटदासा**नें पाठविलेलें पत्र हीं दोन्हीही एकमेकांशीं जुळवून पाहून, **मलयकेतू**नें 'या दोन्हीही पत्रांचें अक्षर जुळतें का पहा,' असें ह्मणून तीं **राक्षसा**च्या हातीं दिलीं.

त्या पत्रांचे अक्षर अगदीं एकसारखें आहे, असें पाहून **राक्षस** मनांत ह्मणाला, हीं अक्षरें तर जुळतात; पण **शकटदास** माझा परम मित्र आहे. त्यानें कपट केलें असेल, असें ह्मणणें हें मात्र जुळत नाहीं. अथवा **शकटदासा**नें स्वामिभक्तीला विसरून आपल्या बायकापोरांचें स्मरण केलें असेल, व अचल अशा कीर्तीला सोडून चंचल द्रव्याचा लोभ धरला असेल काय? अथवा यांत काय संदेह! ही माझ्या नांवाची मोहोरेची आंगठी त्याच्याच बोटांत होती.

हा **सिद्धार्थक** त्याचाच परम मित्र. हा सर्व कपटी मजकूर ज्या पत्रांत लिहिला आहे तें पत्र त्याच्याच हातचें. तेव्हां भेद करण्याविषयीं परम कुशल अशा शत्रूशीं सख्य करून, स्वामिभक्तीला पराङ्मुख होऊन केवळ वांचण्याची इच्छा करणारा जो **शकटदास**, त्याचेंच हें सारें कृत्य असावें यांत संशय नाहीं!

त्या पत्रांत, तुह्मीं पाठविलेले तीन दागिने पोंचले, असा मजकूर होता. तो पाहून **मलयकेतु राक्षसाला** ह्मणाला, 'आर्या, तीन दागिने पोंचले असें लिहिलें आहे, त्यांपैकीं आपण ह्यावेळीं गळ्यांत घातलेला हा एक दागिना काय?' पुनः लक्षपूर्वक पाहून दागिना ओळखून म्हणाला, 'हा तर आमच्या बाबांनीं आपल्या अंगावर धारण केलेल्यांपैकीं असावा असें वाटतें!' **राक्षसाला** ह्मणाला, 'आर्या, हा दागिना कोठून आपल्याकडे आला?'

**राक्षस** ह्मणाला, 'व्यापाऱ्याकडून विकत घेतला.'

**मलयकेतु विजयेला** ह्मणाला, 'तूं हा दागिना ओळखलास काय?'

चोपदारीण नीट न्याहाळून पाहून, डोळ्यांत अश्रु आणून ह्मणाली, 'महाराज, कसा न ओळखीन! थोरले महाराज **पर्वतेश्वर** यांच्या अंगावर असलेला हा नेहमीं मी पहात होतें.'

हें ऐकून **मलयकेतु** डोळ्यांवाटे टपटपां अश्रु टाकून म्हणाला, 'हाय! हाय! बाबा, तुला दागिन्यांची फार आवड होती. हे कुलभूषणा ताता, तुझ्या अवयवाजोगताच हा दागिना मुद्दाम करवून घेऊन तूं आपल्या अंगावर धारण करीत होतास. ह्या दागिन्यांच्या योगानें तुझा

मुखचंद्र, आसमंतात् बसलेले राजे हेच कोणी एक नक्षत्रें, त्यांसहवर्तमान शरदृतूंतील पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें शोभत होता.'

**राक्षसा**ला खरोखरच याची कांहीं माहिती नव्हती. **चंद्रगुप्ता**नें लोकांच्या डोळ्यांना पाणी लावण्याकरितां मुद्दाम **पर्वतराजा**ची उत्तरक्रिया करण्याचें निमित्त करून, कांहीं दानधर्म केला. त्यांत **विश्वावसु** व त्याचे दोघे बंधु यांना ते तीन दागिने दिले, व त्यांनीं, **चाणक्या**च्या सांगण्यावरून जवाहिऱ्यांच्या वेषानें, ते **राक्षसा**ला आणून विकले. **राक्षसा**च्या श्रीमंती थाटाप्रमाणें त्यानें त्या जवाहिऱ्यांचें तोंड देखील पाहिलें नव्हतें. त्याचा परम विश्वासू **शकटदास** यानेंच तो सवदा केला होता. ते दागिने **पर्वतरा**जाचे आहेत, हें **राक्षसा**ला समजण्याचा मुळींच संभव नव्हता. **मलयकेतू**चें भाषण ऐकून तो जागच्या जागीं विरल्यासारखा झाला. तो मनांत ह्मणाला, हे दागिने **पर्वतराजा**चे असें हा ह्मणतो, त्यापेक्षां त्याचेच असतील. तो **मलयकेतू**ला ह्मणाला, 'हे दागिने देखील **चाणक्या**नेंच मुद्दाम पाठविलेल्या जवाहिऱ्याकडून आमच्याकडे आणून विकले.'

**मलयकेतु** ह्मणाला, 'आर्या, बाबांनीं आपल्या अंगावर घातलेले, आणि त्यांतूनही **चंद्रगुप्ता**च्या हातीं लागलेले, हे दागिने वाण्यानें विकले, हें ह्मणणें संभवत नाहीं; अथवा नाहीं तरी कां ह्मणावें ? कदाचित् अशा रीतीनें संभवेल. कारण, हे दागिने विकून यापासून पुष्कळ लाभ व्हावा अशी इच्छा करणाऱ्या **चंद्रगुप्ता**ला, क्रूर स्वभावाचा जो तूं त्या त्वां आह्मांला त्यांचें मूल्य कल्पना

केलें असावें; ह्मणजे या दागिन्यांच्या लोभानें विश्वासघात करून, आमचे प्राण **चंद्रगुप्ता**च्या हातीं देण्याचा बेत तुह्मीं केला असावा असें दिसतें.'

हें ऐकून **राक्षस** मनांत ह्मणाला, एकूण शत्रूनें केलेली मसलत अगदीं परस्परांला जुळण्यासारखी आहे खरी. कारण, हें पत्र माझें नव्हे असें जर मीं ह्मटलें, तर तें कांहीं त्याचें योग्य उत्तर होत नाहीं. कारण, त्याच्यावर प्रत्यक्ष माझी मोहोर आहे. **शकटदासा**नें माझा विश्वासघात केला असें म्हणावें, तर तें तरी लोकांला कसें खरें वाटेल? **चंद्रगुप्ता**नें दागिने विकले ही गोष्ट कोणाला तरी खरी वाटणार आहे का? तेव्हां ह्या सर्व गोष्टी आपण कबूल कराव्या, हेंच योग्य आहे. येथें उगीच मुळमुळीत उत्तर देण्यांत कांहीं हांशिल नाहीं.

**मलयकेतु** ह्मणाला, 'आर्या, आपल्याला ही एक गोष्ट विचारतों ती सांगा.'

**राक्षस** डोळ्यांत अश्रु आणून ह्मणाला, 'कुमारा, जो कोणी आर्य असेल त्याला विचार; आह्मीं यावेळीं अनार्य झालों आहों!'

**मलयकेतु** ह्मणाला, 'मौर्य **चंद्रगुप्त** हा तुमच्या यजमानांचा मुलगा आहे, आणि मी, तुमची सेवा करण्याविषयीं तत्पर, अशा तुमच्या मित्राचा मुलगा आहें. **चंद्रगुप्ता**च्या मताप्रमाणें वागाल, तर तो तुह्मांला पुष्कळ धनदौलत देणारा आहे. आणि मला तर ती तुह्मीच देत आहां. तुमची दिवाणगिरीची नोकरी **चंद्रगुप्ता**जवळ मोठी सन्मानाची आहे. आणि आमच्याइकडे तर तुह्मी स्वतःच मालक आहां. असें असून याहून कोणता अधिक स्वार्थ

तुह्मीं पाहिला आहे, कीं जो आर्य असलेल्या तुह्मांला अनार्य करतो?'

**राक्षस** ह्मणाला, 'कुमार **मलयकेतो**, तूं बोलतोस यापैकीं एका अक्षराचा देखील मजकडे संबंध नाहीं. असें अयोग्य भाषण करतोस, या योगानें तूं जो प्रश्न केलास त्याचा निर्णय तुझ्याकडूनच झाला. असो; त्यांत तुझा काय दोष आहे!'

**मलयकेतु**, तो लखोटा आणि ती दागिन्यांची थैली दाखवून, **राक्षसाला** ह्मणाला, 'हें यावेळीं काय आहे बरें?'

**राक्षस** अतिशय दुःखित होऊन ह्मणाला, 'हा माझ्या दुर्दैवाचा विलास आहे, कारण, ज्यांचा मी चाकर असल्यामुळें सांप्रत प्रत्येक वेळीं धिक्काराला पात्र होतों, व ते माझे धनी असतांही ज्यांनीं पुत्रापेक्षां मला अधिक मानलें, त्यांच्या कारकीर्दीत आह्मी कधीं शत्रूला फितूर झालों नाहीं. लोकांची स्थिति जाणण्याच्या कामांत मोठे चाणक्ष असे राजे, अर्थात् नंद, यांला ज्या दुष्ट दैवानें नाहींसे केलें, त्याचा पुरुषयत्न हाणून पाडणाऱ्या दैवाचें हें सारें कृत्य आहे.'

हें ऐकून रागावून **मलयकेतु** म्हणाला, 'काय, अद्यापि आपलें कृष्ण कारस्थान छपविण्याचाच प्रयत्न करतोस! हें कृत्य दैवाचें कीं तुझ्या लोभाचें? दुष्टा, कृतघ्ना, तूं, तीव्र विषाचा प्रयोग केलेल्या कन्येला पाठवून, केवळ तुझ्यावर विश्वास ठेवून वागणाऱ्या माझ्या पित्याचा घात केलास. असें असूनही अजाणतेपणीं आह्मी तुझें मोठें गौरव करून तुझ्या सांगण्याप्रमाणें वागूं लागलों. असें असतां तूं शत्रूला आमचेंच मांस विकण्याला तयार झाला आहेस! तर

यापरतें दुसरें कोणतेंही अधमपणाचें कृत्य असेल असें वाटत नाहीं.'

हें ऐकून **राक्षस** मनांत ह्मणाला, हा एक दुसरा मर्मस्थानावर फोडच उठला आहे असें ह्मटलें पाहिजे. **मलयकेतू**चें भाषण ऐकून कानांवर हात ठेवून ह्मणाला, 'शिवशिव! मीं **पर्वतेश्वरा**चा घात करण्याकरितां विषकन्येचा मुळींच प्रयोग केला नाहीं.'

**मलयकेतु** ह्मणाला, 'तर मग बाबांला कोणीं मारलें?'

**राक्षस** ह्मणाला, 'याविषयीं दैवालाच प्रश्न केला पाहिजे.'

**मलयकेतु** दांतओंठ खाऊन ह्मणाला, 'काय, दैवाला विचारलें पाहिजे! आणि क्षपणक **जीवसिद्धि** याला विचारायाला नको म्हणतां!'

हें ऐकून **राक्षस** फारच घाबरल्यासारखा झाला. कारण, **जीवसिद्धि** हा फार दिवसांपासून त्याच्या पूर्ण विश्वासाला पात्र झाला होता; व तो मोठा धर्मिष्ठ आहे, अशी **राक्षसा**ची समजूत झाली होती. त्याचें नांव ऐकून **राक्षस** मनांत म्हणाला, अरेरे! **जीवसिद्धि** देखील **चाणक्या**चा हेर! तर मग शत्रूंनीं माझें हृदय देखील व्यापून सोडलें असें ह्मटलें पाहिजे!

**मलयकेतु** हा जातीचा यवन *असून विशेष सुशिक्षित नव्हता. तशांतून त्याचें वय अल्प असल्याकारणानें त्याच्या अंगीं पोक्तपणा व विचारीपणाही नव्हता. त्यानें

* सांप्रत 'यवन' या शब्दानें मुसलमान इत्यादि परधर्मी लोक असें मानण्याचा परिपाठ आहे. पण **यवन** हा शब्द फार प्राचीन आहे. आर्यलोक आपल्याहून इतर लोकांला अनार्य, यवन, म्लेंच्छ इत्यादि नांवांनीं

**राक्षसा**च्या ह्मणण्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं, व त्याच्या वर्तनाविषयीं बारीक विचारही केला नाहीं. त्या बनावट पत्रांतील मजकूर, **सिद्धार्थका**नें तोंडीं सांगितलेला निरोप, **जीवसिद्धी**चें बोलणें, आणि **भागुरायणा**चा कोटिक्रम, यांवर पूर्ण भरंवसा ठेवून त्याणें अविचारानें रागाच्या आवेशांत भलतेंच कृत्य केलें. त्याचा तरी त्यांत काय अन्याय? तो **राक्षसा**च्या सांगण्याप्रमाणें चालता, तर कदाचित् त्याला पुढें मोठी पदवी प्राप्त झाली असती; पण ती त्याच्या नशिबीं नव्हती! ह्मणूनच दुर्दैवानें प्रेरणा केलेला तो मूर्ख **मलयकेतु** **भासुरका**ला हाक मारून ह्मणाला, 'अरे **भासुरका**, माझ्या आज्ञेनें सेनापति **शेखरसेन** याला असा हुकूम कर कीं, **राक्षसा**शीं परम स्नेह करून, आमच्या शरीराचा द्रोह करणारे, व त्या योगानें **चंद्रगुप्ता**ला प्रसन्न करून घेण्याची इच्छा करणारे **चित्रवर्मा**, **सिंहनाद**, **पुष्कराक्ष**, **सुषेण** आणि **मेघनाद**, हे पांच राजे आमचे शत्रु आहेत; त्यांपैकीं पहिले तिघे, माझें राज्य घ्यावें, अशी इच्छा करताहेत, तेव्हां त्यांच्या इच्छेप्रमाणें मोठे खळगे काढून त्यांत त्या तिघांला घालून मातीनें गाडून टाकावें! बाकीचे दोघे आमच्या हत्तींची व घोड्यांची इच्छा करीत आहेत, तर त्यांना हत्ती आणि घोडे यांच्याकडूनच मारवावें! आणि हा हुकूम विशेष विचार न करतां आतांच्या आतां अमलांत आणावा.'

हें ऐकून **भासुरक**, सेनापतीला त्याप्रमाणें आज्ञा करण्याकरितां, निघून गेला. सेनापति **शेखरक** याला **भद्रभट** इत्यादिकांहीं आपलासा करून ठेविलाच होता. **मलयकेतू**चा हुकूम होतांच, त्यानें तत्काल ते पांच राजे व त्यांचे संबंधी यांचा फडशा पाडला!

इकडे **मलयकेतु** दांतओंठ चावून **राक्षसाला** ह्मणाला, '**राक्षसा**, अरे **राक्षसा**, प्रथम विश्वास देऊन घात करणारा **राक्षस** मी नव्हें. मी **मलयकेतु** आहें. यावेळीं तुझे प्राण माझ्या हातांत आहेत, तरी मी तुझा नाश करीत नाहीं. जा येथून तोंड काळें कर, आणि **चंद्रगुप्ताचाच** आश्रय कर. तूं असें समजूं नकोस कीं, तो **विष्णुगुप्त** आणि **चंद्रगुप्त** हे दोघेही तुला बरोबर घेऊन आले तरी तुह्मां तिघांचाही एकदम समाचार घेण्यास मी असमर्थ आहें. जसा अन्याय हा धर्म, अर्थ आणि काम यांचा एकसमयावच्छेदें नाश करतो त्याप्रमाणें, तुह्मां तिघांचाही नाश करण्यास मी समर्थ आहें.'

ज्यानें केवळ संशयावरून आपले परम साह्यकर्ते अशा **चित्रगुप्त** इत्यादि पांच राजांला मारविलें, तो अविचारी **मलयकेतु**, आपल्या मतें पहिल्या प्रतीचा विश्वासघातकी ठरलेला असा जो **राक्षस**, त्याला जिवंत सोडता असें मुळींच झालें नसतें. पण त्याला सल्लामसलत देणारा पडला **भागुरायण**. त्याला **राक्षसाचा** जीव घ्यावयाचा नव्हता; ह्मणून त्यानें युक्तिप्रयुक्तीनें **मलयकेतूची** समजूत करून धिक्कारपूर्वक **राक्षसाला** तेथून घालवून दिला.

**मलयकेतूनें** आपल्या शौर्याचा जो मोठा बडेजाव वर्णन केला, त्यांत कांहींच अर्थ नव्हता. तो सामान्यतः शूर होता, तरी त्याजवळ अकलेचें भांडवल बेताबाताचेंच असल्याकारणानें, ती त्याची केवळ बडबड होती. लवकरच मुसक्या बांधून आपल्याला **चंद्रगुप्ताजवळ** हजर करतील, हें त्या वेड्यापिराच्या लक्षांत मुळींच आलें नाहीं.

वर सांगितल्याप्रमाणें **राक्षसाला** अपमानपूर्वक **मल-**

**यकेतूनें** घालवून द्यावा, व ज्यांच्या बळावर तो नाचत होता त्या **चित्रवर्मा** इत्यादि पांच राजांना ठार करावें, हें **चाणक्याच्या** मसलतीचें पूर्वार्ध पुरें झालें. आतां **मलयकेतूचा** सर्वस्वी मोड करून, त्याला कैद करून **चंद्रगुप्तासमोर** आणावयाचा, हें उत्तरार्ध सिद्ध होण्यास सुरवात झाली. **भागुरायण** ह्मणाला, 'कुमार **मलयकेतो,** आतां फार वेळ लावण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आपण यावेळीं **कुसुमपुराच्या** अगदीं जवळ आलों आहों. तेव्हां सर्व सैन्य त्या नगराला वेढा घालण्याच्या कामीं योजावें. आपले सैनिक त्या शहराला वेढा घालूं देत. लोध्रवृक्षाचे रज ज्यांनीं आपल्या गालांना लाविले आहेत, अशा **गौडदेशीय** स्त्रियांच्या गालांना मळकट करणारा, व भ्रमरासारखे काळे असून कुरळ अशा त्यांच्या केंसांना क्लेश देणारा, आमच्या सैन्यांतील घोड्यांच्या खुरांपासून उधळलेला जो धुरळा, तो एकदांचा शत्रूंच्या मस्तकावर जाऊन पडूं दे!

**भागुरायणानें** अशी मसलत देतांच, **मलयकेतूला** ती खरी वाटली; व त्यानें थोड्याशा फौजेला आपल्याबरोबर ठेवून घेऊन बाकी सारी फौज **कुसुमपुराला** वेढा घालण्याकरितां पुढें पाठवून दिली, व स्वतः तो मागें राहिला! **मलयकेतूचा** सेनापति **शेखरक,** याला **भद्रभटादिकांनीं** अगदीं अनुकूळ करून घेतला होता, हें वर सांगितलेंच आहे. त्याशिवाय स्वतः **भद्रभटादिक** हे मोठमोठ्या अधिकारांवर होते. त्यांनीं बहुतकरून सारी फौज फितवून ठेविली होती. विनाकारण मनुष्यांची कत्तल करावी, असा त्यांचा मुळींच हेतु नव्हता. जे कोणी त्याला अनुकूळ नव्हते, त्यांचा युक्तिप्रयुक्तीनें नाश क-

रून, त्यांनीं आपला मतलब सिद्धीस नेण्याचा प्रयत्न चालविला. वर सांगितल्याप्रमाणें जी फौज पुढें रवाना केली, ती फितूर झाली असल्याकारणानें **कुसुमपुराला** वेढा वगैरे कांहीं न घालतां, खुशाल शत्रूला जाऊन मिळाली!

इकडे **मलयकेतूनें** **चित्रवर्मा** इत्यादिकांला फार निर्दय रीतीनें मारविल्यावरून, बाकी राहिलेली त्याची फौज बिथरली होती. बहुतेक सरदार, मानकरी व मांडलिक राजे, हा फार अविचारी व क्रूर आहे असें समजून, त्याच्या बरोबर शत्रूशीं लढण्यास नाखुष झाले होते. त्यांतून **भद्रभट** वगैरे **चाणक्याच्या** पक्षाचे लोक, त्यांला भर देऊन अधिक नाराज करण्याचा प्रयत्न करीतच होत. यामुळें त्या सरदारांनीं **मलयकेतूच्या** निरोपाची देखील वाट पाहिली नाहीं. ज्यानें त्यानें आपापल्या बरोबरचा परिवार घेऊन तडक आपापल्या घराची वाट धरली, यामुळें राहतांपैकीं फारच थोडे लोक बाकी राहिले. ते देखील फितूर झालेले, व त्यांत **भद्रभट** इत्यादि शत्रुपक्षीय लोक प्रमुख होते, मग काय विचारतां. त्यांनीं मागें पुढें न पहातां त्या दुर्दैवी **मलयकेतूला** एकदम कैद केलें! त्यांचा जमाव पुष्कळ असल्याकारणानें बिचारा **मलयकेतु**, कांहीं हालचाल न करितां, मुकाट्यानें त्यांच्या स्वाधीन झाला. **चाणक्यानें** नेमलेले **भागुरायण, भद्रभट** इत्यादि चतुर पुरुष, यांनीं याप्रमाणें त्याची मसलत फत्ते करून, **मलयकेतूला** चतुर्भुज करून, मोठ्या हर्षानें ते **कुसुमपुराकडे** यावयाला निघाले.

इकडे **मलयकेतूनें** धिःक्कारपूर्वक घालवून दिलेला **राक्षस** मोठा कष्टी होऊन म्हणाला, 'हाय हाय! बिचारे

माझे मित्र चित्रवर्मादि राजेही मारले गेले. तेव्हां एकं-दरींत हा राक्षस शत्रूच्या नाशाकरितां यत्न करीत नसून, मित्राच्याच नाशाकरितां यत्न करितो आहे, असें झालें. म्यां दुर्दैव्यानें आतां काय करावें? तपोवनाला जाईन, तर हवें तसें उग्र तप केल्यानेंही माझ्या मनांतला वैरभाव नाहींसा होणार नाहीं. आपले यजमान नंद यांच्याकडे जाईन अर्थात् मरेन, तर शत्रु जिवंत असतां मरणें हें बायकांना योग्य आहे. आपली तरवार घेऊन शत्रूच्या फौजेवर तुटून पडेन ह्मटलें, तर एकटयानें एवढ्या असंख्य फौजेवर जाऊन पडणें हेंही युक्त नाहीं. बरें, कांहींच न करावें, तर केवळ आपल्याकरितां एवढ्या संकटांत पडलेल्या चंदन-दासाला सोडवून घेण्याविषयीं तत्पर झालेलें माझें चित्त, कृतघ्न होऊन, नेहमीं अस्वस्थ राहील !'

---

## भाग सहावा.

पूर्वभागांत सांगितल्याप्रमाणें सिद्धार्थकानें आपलें काम बजावलें. मलयकेतूनें दागिन्यांची थैली त्याची त्याला परत दिली होती. मलयकेतूला कैद वगैरे करण्याचें पुढचें काम भागुरायण व भद्रभट इत्यादिकांकडे होतें. तेव्हां त्यांची वाट न पाहतां तो, आपल्याला सांगितलेलें काम आपण कोणत्या रितीनें बजावलें, तें आर्यचाण-क्याला कळविण्याकरितां थेट कुसुमपुराकडे निघाला.

चाकरलोकांना बहुतकरून धन्यानें सांगितलेलें काम योग्य रितीनें बजाविलें असतां मोठा आनंद होतो, व तें वर्त-मान यजमानाला केव्हां सांगेन असें होतें. सिद्धार्थका-

चीही अशीच अवस्था झाली होती. तो यावेळीं मोठ्या आनंदांत होता. वाटेंत अनेक कल्पना त्याच्या मनांत व-रचेवर येत होत्या. **शकटदासाला** वांचविल्याचें वर्तमान कळवून **राक्षसा**कडून इनाम मिळीव, असें **चाणक्यानें** त्याला सांगितलें होतें, व त्याप्रमाणें इनामही त्याला मि-ळालें होतें. म्हणून तो आपल्याशींच ह्मणाला, ही दागि-न्यांची पिशवी अशीच बरोबर घेण्यांत काय अर्थ आहे ? आर्य **चाणक्या**च्या हुकुमाप्रमाणें आपण हे दागिने इनाम मिळविले आहेत; तर आतां ते अंगावर घालावे. असा विचार करून त्यानें ते सर्व दागिने अंगावर घातले, व मोठ्या डौलानें **चाणक्या**च्या घरीं जाऊन त्याला मुजरा केला.

**चाणक्य** यावेळीं बाह्यात्कारें कारभार पहात नव्हता, तरी अंतस्थ रितीनें त्याच्या सल्लयावांचून एक पान देखील हालत नव्हतें. **सिद्धार्थकानें**, त्याला जें काम सांगितलें होतें, तें आपण कसकसें केलें याबद्दलची सर्व हकीकत मु-ळापासून त्याणें **चाणक्या**ला सांगितली. ती ऐकून, 'लवक-रच ह्या कामगिरीच्या योग्य असें तुला बक्षीस मिळेल.' असें सांगून, **चाणक्यानें** हें वर्तमान **चंद्रगुप्ता**ला कळवायाला त्याला सांगितलें; व अंमळ विश्रांति घेऊन आपली सूचना येतांच त्याला दुसरें एक काम करावयास सांगितलें होतें. त्याचें वर्णन पुढें येईलच. असो.

**सिद्धार्थक चाणक्या**चा निरोप घेऊन तेथून निघाला, तो आपला प्रिय मित्र, **समिद्धार्थक**, याला भेटण्याक-रितां त्याच्या घराकडे चालला होता. **चाणक्या**च्या कारस्थानांचें स्मरण करून त्याला मोठें आश्चर्य वाटत होतें. तो आपल्याशींच ह्मणाला, सजल मेघासारखा

नीलवर्ण, **केशिदैत्याचा** नाश करणारा, आणि माझें इष्टदैवत, असा जो भगवान् **कृष्ण** त्याचा जयजयकार असो ! प्रजेच्या दृष्टीला चंद्रासारखा प्रिय वाटणारा महाराज **चंद्रगुप्त**, याचा जयजयकार असो ! तसेंच लोकांचें सर्व कार्य करून शत्रुपक्षाचा नाश करणारी आर्य **चाणक्याची** नीति, हिचा सार्वकाल जयजयकार असो ! माझें काम उत्तम प्रकारें शेवटास गेल्यामुळें माझ्या डोक्यावरचा एक मोठा भार उतरलासा झाला आहे. यद्यपि मला आणखीं दुसरें एक कार्य करावयाचें आहे, तथापि त्याला फार वेळ लागावयाचा नाहीं; व तें तितकें कठीणही नाहीं. माझा प्रियमित्र **समिद्धार्थक** याची भेट होऊन पुष्कळ दिवस झाले, व पुढच्या कार्यांत त्याची आपल्याला गरज आहेच. तेव्हां आधीं त्याच्या घरीं जाऊन मित्रदर्शनसुखाचा थोडा वेळ अनुभव घ्यावा.

**सिद्धार्थक** असा विचार करीत मित्राच्या घराकडे चालला आहे, तों वाटेंतच **समिद्धार्थक**ही त्याला भेटला. उभयतांची अतिशय मैत्री असल्याकारणानें, **सिद्धार्थक** आल्याचें वर्तमान ऐकून तो त्याच्याच भेटीला निघाला होता. तो आपल्याशींच ह्मणाला, शरीराला संताप झाला असतां चंद्राच्या दर्शनावांचून तापाची शांति होत नाहीं. घरांत कांहीं कार्यप्रयोजन असलें तर मित्रावांचून त्याला शोभा येत नाहीं. नेहमीं मनांत ज्याचें आपण चिंतन करतों अशा मित्रावांचून, मोठें ऐश्वर्य असलें तरी, त्याचा कांहीं उपयोग नाहीं. तेव्हां आपला प्रियमित्र **सिद्धार्थक** हा **मलयकेतूच्या** स्वारींतून आला आहे असें समजलें आहे, तर आपण आधीं त्याची भेट घ्यावी.

याप्रमाणें परस्परांच्या भेटीविषयीं उत्कंठित झालेले ते दोघेही अकस्मात् परस्परांला भेटले. दोघेही स्नेहातिशयानें एकमेकांला मिठी मारते झाले. **सिद्धार्थक** ह्मणाला, 'मित्रा तुझें कुशल आहेना?'

**समिद्धार्थक** ह्मणाला, 'माझें कोठून कुशल असेल? इतक्या दिवसांनीं प्रवासांतून परत आला असतांही तूं माझ्या घराकडे आला नाहींस. तेव्हां मित्रसमागमावांचून कुशल तें कसलें?'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'गड्या, याबद्दल माझ्यावर रागावू नकोस. मी या शहरांत पाय ठेवतांच, आधीं आर्य **चाणक्याला** भेटून त्याला सर्व हकीकत सांगितली. तेथून तुझ्याकडे यावयाचें, पण लगेच, हें वर्तमान महाराज **चंद्रगुप्ताला** स्वतः तूंच जाऊन सांग असें ह्मणून, त्यांनीं मला तिकडे पाठविलें. त्याप्रमाणें त्यांना सर्व हकीकत सांगून, महाराजांची मर्जी खुष करून, आतां तुला भेटण्याकरितां तुझ्याच घराकडे निघालों आहें.'

**समिद्धार्थक** म्हणाला, 'मित्रा, जर मी ऐकण्यासारखें असेल, तर महाराज **चंद्रगुप्ताला** खुष करण्यासारखें असें कोणतें वर्तमान तूं त्याला सांगितलेंस तें सांग.'

**सिद्धार्थक** म्हणाला, 'गड्या, असें काय म्हणतोस? तुला देखील न सांगायाचें असें कांहीं वर्तमान आहे का? महाराजांस मी काय सांगितलें तें तुला सांगतों ऐक. अरे, **चाणक्याच्या** विलक्षण मसलतीनें मोहित झालेल्या त्या अधम **मलयकेतूनें राक्षसाला** हाकलून दिलें, व **चित्रवर्मा** इत्यादिक मोठे शूर असे पांच राजे मोठ्या क्रूर रितीनें मारले. त्यावरून हा क्रूर व अविचारी आहे, असें समजून बाकी

राहिलेले सर्व सैनिक **मलयकेतूला** सोडून आपापल्या देशाला निघून गेले. याप्रमाणें सरदार व इतर सैनिक निघून गेल्यावर **भद्रभट, पुरुषदत्त, डिंगिरात, बलगुप्त, राजसेन, भागुरायण, रोहिताक्ष, विजयवर्मा** इत्यादि आपल्या सरदारांनीं **मलयकेतूच्या** मुसक्या बांधल्या !'

**समिद्धार्थकाला चाणक्याच्या** गुप्त मसलतीपैकीं विशेष हकीकत माहीत नव्हती. **भद्रभट** इत्यादिकांनीं **मलयकेतूला** बांधला, हें वर्तमान ऐकून तो चकित होऊन **सिद्धार्थकाला** ह्मणाला, 'अरे, तूं हें काय सांगतोस ? **भद्रभट, डिंगिरात** इत्यादि वीर हे तर, महाराज **चंद्रगुप्त** यांच्यावर नाराज होऊन, **मलयकेतूच्या** आश्रयाला जाऊन राहिले आहेत, असें येथें सर्व लोक बोलतात. आणि तूं सांगतोस त्यांणींच **मलयकेतूला** कैद केलें म्हणून; तेव्हां एखाद्या कुत्सित कवीनें केलेल्या नाटकांत जसे दोन प्रकार असतात, तसें तोंडानें बोलायचें एक, व हातानें दुसरेंच करावयाचें, असें कां ? '

हें ऐकून **सिद्धार्थक** ह्मणाला, 'मित्रा' तुला काय सांगूं ! दैवगति जशी कोणाला कळत नाहीं, तशा त्या **चाणक्याच्या** मसलतीला नमस्कार असो ? ती कोणालाही कळत नाहीं.'

**समिद्धार्थक** म्हणाला, 'असो, आपल्याला त्या थोरांच्या गोष्टी कशाला पाहिजेत ? पुढें काय झालें तें सांग, ह्मणजे झालें.'

**सिद्धार्थक** म्हणाला, ' नंतर हें वर्तमान ऐकून **आर्य चाणक्यानें**, ती म्लेंच्छांची फौज परत जात होती, तींतल्या प्रमुख प्रमुख सरदारांचें मन वळवून, तें सर्व सैन्य आपल्याला अनुकूळ करून घेऊन इकडे आणलें.'

**समिद्धार्थक** ह्मणाला, 'तर मग ती फौज कोठें आहे?'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'ते तिकडे शहराच्या बाहेर आहेत. अतिशय मोठ्या मदस्रावानें उन्मत्त झालेले व सजल मेघांसारखे काळेभोर हत्ती तेथें मोठ्यानें गर्जना करीत आहेत. तसेच, अंगावर चाबूक बसेल ह्मणून भिऊन वाऱ्यासारखे धांवणारे घोडे खेंकाळताहेत, ते त्याच फौजेंतले.'

**समिद्धार्थक** ह्मणाला, 'अरे, पण सर्व लोकांदेखत आपण प्रधानगिरी सोडली असें सांगून स्वस्थ बसलेला आर्य **चाणक्य** पुनः प्रधानकी करणार आहे का?'

हें ऐकून **सिद्धार्थक** हंसून ह्मणाला, 'अरे, तूं वेडा आहेस असें यावेळीं मला वाटतें. कारण, मोठा मी मी ह्मणणारा अमात्य **राक्षस** याला देखील ज्याची मसलत समजली नाहीं, त्या आर्य **चाणक्याच्या** गोष्टी समजून घेण्याचा तूं प्रयत्न करीत आहेस, हा तुझा वेडेपणा नव्हे काय?'

**समिद्धार्थक** ह्मणाला, 'बरोबर, तूं ह्मणतोस तें खरें, त्या पुरुषाच्या गोष्टी तशाच विलक्षण आहेत. बरें, पण, अमात्य **राक्षस** सांप्रत कोठें आहे?'

**सिद्धार्थक** ह्मणाला, '**मलयकेतूनें** याप्रमाणें त्याचा धिक्कार केल्यावरून अमात्य **राक्षस** कांहींसा भयभीत होऊन, **मलयकेतूच्या** छावणींतून निघाल्यावर त्याची **उदुंबर** नामक आमच्याकडच्या एका हेराशीं गांठ पडली. आणि त्या सहवर्तमान तो याच शहरांत आला आहे. हें वर्तमान नुकतेंच त्या **उदुंबरानें** आर्य **चाणक्याला** जाऊन सांगितलें.'

**समिद्धार्थक** ह्मणाला 'गड्या, अमात्य **राक्षस, नं**दाचें गेलेलें राज्य पुनः आणून देण्याविषयीं इतका मोठा

प्रयत्न करण्याकरितां येथून निघून गेला, आणि त्याप्रमाणें कांहीं कार्यभाग न होतां एकून पुनः येथें परत आला ह्मणायचा. तर मग तो गेला होता तरी कशाला ?'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'एऱ्हवीं तो आला नसता; पण आपला मित्र **चंदनदास** याच्या लोभानें त्याला यावें लागलें असेल.'

**समिद्धार्थक** ह्मणाला, 'अरे, तर मग **चंदनदास** सुटेल असें वाटतें.'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'अरे, त्या दुष्टाची कोठून सुटका होणार? आर्य **चाणक्याची** तुला आणि मला अशी आज्ञा झाली आहे कीं, त्याला सुळीं देण्याच्या ठिकाणीं नेऊन आपण उभयतांनीं त्याला मारून टाकावा.'

हें ऐकून **समिद्धार्थकाला** राग आला. तो ह्मणाला, 'वाहवा! फार चांगलें. एकून आर्य **चाणक्यानें** आह्मांला फार चांगलीच कामगिरी सांगितली ह्मणायची. त्याच्याजवळ दुसरे कोणी मारेकरी नव्हतेका? त्यानें अशा अत्यंत क्रूर कामगिरीवर आह्मांला कां ह्मणून नेमिलें ?'

**चाणक्यानें सिद्धार्थकाला** दुसरें एक काम सांगितलें होतें, असें वर ह्मटलें आहे, तें हेंच काम. वस्तुतः **चंदनदासाचा** प्राण घ्यायचा नव्हता. **राक्षस** आपल्या हातीं येण्याकरितां ती एक युक्ति लढवायाची होती. ही गोष्ट **सिद्धार्थकाला** माहीत होती. तो म्हणाला, 'मित्रा, उगीच कशाला भलत्याच कल्पना काढतोस? अरे, ह्या जीवलोकांत ज्याला कांहीं दिवस वांचण्याची इच्छा असेल, असा कोण मनुष्य आर्य **चाणक्याचा** हुकूम अमान्य करूं शकेल? तर चल, अंमळ विश्रांति घेऊन, मांगाचा वेष घे.

ऊन, **चंदनदासाला** सुळीं द्यायच्या ठिकाणीं घेऊन जाऊं या.' असें बोलून दोघेही **समिद्धार्थकाच्या** घरीं जाऊन पुढच्या तयारीस लागले.

**उदुंबरक** नांवाच्या **चाणक्याच्या** हेरानें **राक्षसाला** हळूहळू **कुसुमपुराजवळ** आणून सोडला, हें वर सांगितलेंच आहे. गांवाच्या जवळ पोंचतांच **उदुंबरकानें**, आपण आपल्या घरीं जातों असें सांगून, **राक्षसाचा** निरोप घेतला, आणि शहरांत येऊन **चाणक्याला** ती खबर दिली.

**राक्षस** आतां बहुतकरून **चंदनदासाला** सोडवून घेण्याचा प्रयत्न करील असें समजून, **चाणक्यानें** दुसरीच एक युक्ति योजून ठेविली. ती अशी, आपल्या गळ्याला फांस लावून घेण्याकरितां भली लांब दोरी हातांत घेऊन, **राक्षस** ज्या ठिकाणीं बसला असेल, त्या ठिकाणीं जाऊन गळफांस लावून घेण्यास एका मनुष्यास सांगितलें. त्याप्रमाणें **दीर्घशृंग** नांवाचा एक मनुष्य हातांत दोरी घेऊन शहराच्या बाहेर येऊन पोंचला. तो **चाणक्याच्या** मसलतीचा विचार करून आपल्याशींच ह्मणाला, '**चाणक्याची** नीति हीच कोणी एक दोरी, जी शत्रुनिग्रहाविषयीं निपुण आहे, तिचा जयजयकार असो!'

पुनः ह्मणाला, 'उदुंबरकानें, **राक्षसाला** आपण ज्या ठिकाणीं सोडला आहे, म्हणून सांगितलें, तो प्रदेश कोणता असेल बरें ? **राक्षसाची** भेट घ्यायची ती जागा आपल्याला समजली पाहिजे.'

**दीर्घशृंग** याप्रमाणें आपल्या मनांत विचार करीत आहे तों, इतक्यांत डोक्यावरून पांघरूण घेतलेला **राक्षस** त्याच्या समोरच येत होता. त्याला पाहून ह्मणाला, 'हाच तो

**राक्षस.** लोकलज्जेनें डोक्यावरून बुरखा घेऊन इकडेच येत आहे. तर आतां आपण ह्या झाडाच्या आड उभें राहून हा कोठें बसतो तें पहावें.'

इतक्यांत हातांत तरवार घेतलेला व डोक्यावरून बुरखा घेतलेला **राक्षस** त्याच्या अगदीं जवळ आला. **राक्षस** डोळ्यांतून अश्रु टाकीत होत्साता ह्मणाला, 'हाय! हाय! हें फार मोठें दुःख. नवऱ्याचा आश्रय सुटला, ह्मणजे जारिणी स्त्री परपुरुषाचा आश्रय करते, तशी आमची राजलक्ष्मी सांप्रत दुसऱ्याच्या आश्रयाला राहिली आहे. प्रजा तरी आपल्या राजावर अनुरक्त असतील असें म्हणावें, तर गतानुगतिक मार्गाला अनुसरून त्यांनींही लक्ष्मीबरोबर दुसऱ्याचा आश्रय केला, व आपल्या यजमानावरचा अनुराग सोडला. आप्तसंबंधी वगैरे लोकांनीं आपापल्यापरी पुष्कळ खटपट केली खरी; पण त्यांच्या कृत्याचें त्यांला चांगलें फळ मिळेनासें झालें, तेव्हां त्यांचीही उमेद खचली. पण त्यांनीं तरी काय करावें! बाकी सर्व अवयव असून मुख्य मस्तकच जर नाहींसें झालें, तर बाकीच्या अवयवांकडून काय होणार!'

आणखी दुसरें असें आहे कीं, सत्कुलांत उत्पन्न झालेला व सर्व भुवनांचा पति, असा जो महाराज **नंद**, ह्याचा त्याग करून, एकादी अविनीत शूद्री असावी त्याप्रमाणें, लहानसें छिद्र पाहून राजलक्ष्मीनें जातीचा शूद्र अशा **चंद्रगुप्ता**चा आश्रय केला. ती त्याच्याजवळ गेली एवढेंच नाहीं, तर तेथें अगदीं स्थिर झाली. आतां याविषयीं काय करावें! आह्मी चांगला मजबूत प्रयत्न केला, तरी शत्रूप्रमाणें दैव आमच्या त्या प्रयत्नांला निष्फल करतें!

वस्तुतः माझ्याकडून मी प्रयत्न करण्यांत कांहीं कमी केलें होतें का? महाराज नंदाला तसा अयोग्य रितीनें मृत्यु आला असतां, त्या पर्वतराजाला हातीं धरून मी एक सारखा प्रयत्न चालविला होता. दुर्दैवानें तो पर्वतराजही मारला गेला. तथापि मी त्याच्या मुलग्याला हातीं धरून प्रयत्न केला. पण शेवटीं कांहींच सिद्ध झालें नाहीं. तेव्हां एकंदरींत हें बेटें दैवच नंदकुळाचें शत्रु आहे. तो भटोबा **चाणक्य** कांहीं शत्रु नव्हे!'

**मलयकेतूनें** जी अविचाराची गोष्ट केली तिची आठवण काढून ह्मणाला, त्या म्लेंच्छाच्या (**मलयकेतूच्या**) मूर्खपणाला काय करावें? जो नाश पावलेल्याही आपल्या यजमानांची अद्याप चाकरी करीत आहे, तो मी **राक्षस** शत्रूशीं कसा सख्य करीन? पण त्या मूर्खाला ही गोष्ट खरी वाटली! त्या विवेकशून्य म्लेंच्छानें या गोष्टीचा नीट विचार करावयाचा होता. पण त्याच्याकडे तरी काय दोष? दैव एकदां कोणाच्याही पाठीस लागलें, ह्मणजे त्याच्या साऱ्या बुद्धीलाच विपर्यास पडतो.

इतकें झालें तथापि हा **राक्षस** शत्रूच्या हातीं सांपडून पाहिजे तर मरून जाईल, पण त्यांच्याशीं सख्य ह्मणून कधींही करावयाचा नाहीं. पाहिजे तर मला कोणी असत्यसंध ह्मणोत, पण शत्रूंनीं फसवून माझा पराभव केला, असें मात्र मी कधींही लोकांकडून ह्मणवून घेणार नाहीं!'

**राक्षस** यावेळीं ज्या ठिकाणीं आला होता, तो प्रदेश नेहमींचा त्याच्या परिचयांतला असून, आपल्या पहिल्या यजमानासह तो कित्येकदां तेथें आला होता. त्या प्रदेशाकडे पाहून म्हणाला, 'महाराज नंदाच्या पादस्पर्शानें

पवित्र झालेले असे तेच हे कुसुमपुराच्या जवळचे प्रदेश. येथें, धनुष्य आकर्षण करण्याकडे हात अडकल्यामुळें ज्याचा लगाम सैल झाला आहे, अशा घोड्याला भरधांव सोडून महाराज नंदानें हजारों बाण सोडले होते. आसमंतात् शेंकडों राजे ज्याच्या दृष्टीकडे पहात आहेत असा आमचा महाराज ह्याच बागेंत संचार करीत होता. त्याच ह्या कुसुमपुराच्या जवळच्या भूमि आतां पाहिल्या म्हणजे दुःखाश्रूंनीं माझे डोळे भरून येतात!

बरें पण, आतां दुर्दैवी मी कोठें जाऊं? हो, बरें झालें; ही जुनी बाग दृष्टीस पडली. येथें बसून चंदनदासाचा समाचार कांहीं कळेल तर पहातों. प्रत्येक मनुष्यावर निरनिराळ्या वेळीं बरेवाईट प्रसंग येऊन त्यांचीं अनेक रूपांतरें होतात. माझ्याचकडे पहाना. ह्या कुसुमपुरांतून बाहेर निघायाचें झालें, ह्मणजे माझ्याबरोबर शेंकडों सरदार, राजे व मानकरी चालत असत. नगरवासीजन प्रतिपदेच्या चंद्राकडे जशी टक लावून पहातात, तसें माझ्याकडे अंगुलिनिर्देश करून पहात असत. आणि अशा थाटांत, एखाद्या राजासारखा, मी या नगरांतून बाहेर निघत होतों. तोच मी सांप्रत त्याच नगरांत, आपले सर्व प्रयत्न व्यर्थ गेल्यामुळें लाजेनें चोरासारखा कोणाच्या दृष्टी पडूं नये ह्मणून भीत भीत, ह्या जीर्णोद्यानांत प्रवेश करीत आहें!

अथवा, ज्यांच्या कृपेनें मीं तेवढ्या मोठ्या ऐश्वर्यावर होतों, तेच सांप्रत नाहींसे झाले आहेत; तेव्हां माझी अशी अवस्था झाली यांत काय विशेष आहे!' असें बोलून त्या जुन्या बागेंत प्रवेश करून तिच्या शोभेकडे पाहून म्हणाला, 'ह्या बागेची काय स्थिति झाली आहे पहा. एखादें

मोठें वैभवशाली कूळ जसें दुर्दशेच्या फेऱ्यांत सांपडून बिघडून जावें, तसे येथील मोठमोठे बंगले अस्ताव्यस्त झाले आहेत. आपल्या मित्राच्या नाशानें सत्पुरुषाचें हृदय सुकून जातें, त्याप्रमाणें यांतील सरोवर अगदीं शुष्क होऊन गेलें आहे. दुर्गुणी राजाच्या योगानें मसलती निष्फळ होतात, त्याप्रमाणें येथील वृक्ष फलहीन झाले आहेत. अविद्वान् मनुष्याची बुद्धि वाईट वाईट गोष्टींनीं जशी झांकून जाते, तशी या बागेंतील सारी जमीन गवतानें झांकून गेली आहे !

तसेंच, येथील झाडांवर तीक्ष्ण कुऱ्हाडींचे प्रहार झाल्यामुळें, वर बसलेल्या पक्ष्यांच्या किलबिलाटाच्या द्वारें हे वृक्ष, आपल्याला ती वेदना सहन होत नाहीं म्हणून, जणुंकाय, रडताहेत असें वाटतें. तसेंच आपल्या अंगावरच्या कांती टाकणारे सर्प, प्राप्त झालेल्या क्लेशानें पीडित झाल्यामुळें, दुःखाचे सुस्कारे टाकीत आहेत कीं काय, असें वाटतें.

तसेच हे बिचारे वृक्ष, अंतर्गत अग्नीनें आपल्या शरीरांतल्या रसाचा शोष झाला तरी तें सहन करताहेत. व किडे त्यांना जीं भोंकें पाडीत आहेत, त्यांच्या द्वारानें बाहेर निघणाऱ्या चिकाच्या मिषानें ते जणुंकाय अश्रूच टाकीत आहेत. ज्यांच्या फांद्या तोडल्यामुळें छाया नाहींशी झाली आहे, व स्वतः मोठ्या संकटांत पडले आहेत, असे हे वृक्ष दुःखाचा शेवट करण्याकरितां स्मशानांत जाण्याला अगदीं तयार झाले आहेत कीं काय असें वाटतें !'

याप्रमाणें वर्णन करीत करीत एका फुटक्या शिळेजवळ आला, आणि तिच्याकडे पाहून ह्मणाला, 'अशा विप-

त्तीच्या काळांत असलेंच आसन बसायाला मिळावयाचें. तेव्हां या फुटक्या शिळेवर बसून घटकाभर विश्रांति घ्यावी, इतक्यांत कोणीतरी मनुष्य भेटेलच. त्याच्याकडून चंदनदासाची खबर समजून घ्यावी.' असा विचार करून राक्षस त्या शिळेवर बसला. इतक्यांत एकाएकीं वाद्यांचा गजर व मंगलघोष त्याच्या कानांवर आला. तो ऐकून ह्मणाला, 'या वेळीं हे मृदंग वाजताहेत; शंखाचे आवाज होताहेत; हलग्या वाजताहेत; जयजयकार चालला आहे; हें काय असावें बरें! हा शब्द फार मोठा असल्या कारणानें ऐकणारांचे कान भरून सोडतो आहे. हजारों बंगल्यांत हा नाद मावेनासा झाल्यामुळें त्यांनीं पाहिजे तेवढा घेऊन बाकीचा सोडून दिला, तो हा नादी शब्द दिशांची लांबी पहाण्याकरितां कौतुकानें दूर जात आहे, असें वाटतें.'

अंमळ विचार करून ह्मणाला, 'हं समजलों. हा दुसरा कसला शब्द नाहीं. त्या दुर्दैवी मलयकेतूला कैद करून शहरांत आणिला, त्या संबंधानें आनंदप्रदर्शनार्थ राजवाड्यांत हा जयघोष चालला आहे!' डोळ्यांत पाणी आणून ह्मणाला, 'हाय हाय! दुष्टा दैवा, शत्रूचें ऐश्वर्य तूं मला ऐकविलेंस इतकेंच नाहीं, तर येथें आणून प्रत्यक्ष दाखविलेंस देखील! आणि आतां त्याचा चांगला अनुभव द्यावा, ह्मणून तुझा यत्न चालला असावा असें वाटतें!'

इकडे दीर्घशृंग झाडाच्या आड उभा राहून, राक्षस काय करतो, तें पहात होता. तो शिळेवर बसला आहे असें पाहिल्यावर, हा आतां येथेंच कांहीं वेळ बसेल असें समजून, चाणक्यानें त्याला सांगितलें होतें त्याप्रमाणें राक्षसाच्या दृष्टी पडेल अशा रितीनें त्याच्याकडे आपण न पहातां

**दीर्घशृंगानें** एका झाडाला दोरी बांधून ती आपल्या गळ्याला बांधली, आणि गळफांस लावून घेऊन प्राण देण्याची तयारी केली.

**राक्षस** अगदीं जवळ होता तरी **दीर्घशृंगानें** त्याजकडे मुळींच पाहिलें नाहीं. त्यानें आपल्या गळफांसाची तयारी केली. तथापि इकडे **राक्षस,** तो काय करतो आहे, तें सारखा पहात होता. त्यानें गळ्याला फांस लावून घेतला, हें पाहून **राक्षस** म्हणाला, 'अरे हें काय? हा आपल्या गळ्याला आपणच फांस लावून घेतो आहे. बहुतकरून हा बिचारा माझ्यासारखाच कोणी दुःखी असावा. तें कांहीं असो, पण हा असें कां करतो हें आपण याला विचारून पहावें.' असा विचार करून तो **दीर्घशृंगाला** ह्मणाला, 'अरे बाबा, तूं हें काय करतोस?'

**दीर्घशृंग** डोळ्यांत आसवें आणून ह्मणाला, 'प्रियमित्राच्या वियोगानें दुःखित झालेल्या माझ्यासारख्या दुर्दैवी मनुष्यानें जें करायाला योग्य, तेंच मी करतों.'

हें ऐकून **राक्षस** मनांत ह्मणाला, बरोबर, हा कोणी तरी माझ्यासारखाच दुःखित असावा असें मी आधींच समजलों होतों. तो **दीर्घशृंगाला** ह्मणाला, 'बाबा, जर कांहीं गुह्य नसेल किंवा फार खोल नसेल, तर तूं जिवावर उदार होण्याचें कारण काय तें मी ऐकण्याची इच्छा करतों.'

**दीर्घशृंग** म्हणाला, 'महाराज, तें कांहीं तसें गूढ आहे असेंही नाहीं, आणि फार महत्वाचें आहे, असेंही नाहीं. पण प्रियमित्राच्या नाशानें हृदय दुःखित झाल्यामुळें, तुम्हांला ती हकीकत सांगेपर्यंत जो वेळ लागणार, तेवढा वेळ जो मरण्याला विलंब होणार तो माझ्यानें सहन करवत नाहीं!'

हें ऐकून **राक्षस** दुःखाचा सुस्कारा सोडून आपल्याशींच म्हणाला, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे! माझा प्रियमित्र **चंदनदास** याच्यावर संकट आलें असून मी अद्याप त्याविषयीं उदासीन राहिलों आहें, त्याबद्दल हा मनुष्य जणुं-काय माझा धिक्कार करितो आहे **राक्षस दीर्घशृंगाला** ह्मणाला, 'भल्या माणसा, तें तसें गूढही नाहीं व फार महत्त्वाचेंही नाहीं, तर मग मला कां सांगत नाहींस?'

**दीर्घशृंग** म्हणाला, 'महाराज, तुम्ही तर फारच आग्रह केलात, तरी पण काय उपाय? सांगतों महाराज. ह्या नगरांत **विष्णुदास** नांवाचा एक जव्हेरी आहे.'

हें ऐकून **राक्षस** मनांत ह्मणाला, 'होय, आहे खरा. आपल्या **चंदनदासा**चा तो परममित्र आहे. तो **दीर्घशृंगाला** ह्मणाला, बरें मग, त्याचें काय झालें!'

**दीर्घशृंग** ह्मणाला, 'तो माझा प्रियमित्र आहे.'

हें ऐकून **राक्षस** हर्षानें मनांत ह्मणाला, यानें **विष्णुदासाला** आपला प्रियमित्र असें ह्मटलें, तेव्हां **चंदनदासा**शींही याचा निकट संबंध असेल. ओहो. आतां याच्याकडून **चंदनदासा**ची देखील आपल्याला खबर समजेल. तो **दीर्घशृंगाला** ह्मणाला, 'अरे, त्या तुझ्या **विष्णुदासा**चें काय झालें!'

**दीर्घशृंग** ह्मणाला, 'त्यानें आपल्या घरांत जें काय होतें नव्हतें तें चटसारें लोकांला वांटून, सांप्रत तो अग्निप्रवेश करण्याकरितां नगरांतून बाहेर निघाला आहे. ह्मणून मीही, त्याचें वाईट वर्तमान कानावर येण्यापूर्वींच, गळफांस लावून घेऊन जीव देण्याकरितां ह्या जुन्या बागेंत आलों आहें.'

हें ऐकून **राक्षस** ह्मणाला, ‘ बाबा, अग्निप्रवेश करण्यांत त्या तुझ्या मित्राचा काय हेतु आहे ? औषधांनीं परिहार न होण्यासारखा एखादा महारोग त्याला झाला आहे काय ?’

**दीर्घशृंग** ह्मणाला, ‘नाहीं नाहीं, तसें कांहीं झालें नाहीं.’

**राक्षस** ह्मणाला, ‘तर काय ? अग्नि किंवा विष, यांसारखा अत्यंत भयंकर असा राजाचा त्याच्यावर राग झाला आहे काय ?’

**दीर्घशृंग** ह्मणाला, ‘ महाराज, शिवशिव ! अशा गोष्टी बोलूं नका. ह्या **चंद्रगुप्ताच्या** राज्यांत तसें क्रूरकर्म व्हावयाचें नाहीं.’

**राक्षस** ह्मणाला, ‘ तर काय ? एखाद्या सुंदर अलभ्य अशा स्त्रीवर त्याचें मन आसक्त झालें आहे का ?’

**दीर्घशृंग** कानांवर हात ठेवून ह्मणाला, ‘ शिवशिव ! त्या माझ्या मित्राच्या हातून अशी अयोग्य गोष्ट कधींही व्हावयाची नाहीं.’

**राक्षस** ह्मणाला, ‘तर काय ? जसा तूं मित्रनाशाबद्दल दुःखित झाला आहेस, तसा त्याच्यावरही मित्रनाशदुःखाचा प्रसंग कोसळला आहे का ?’

**दीर्घशृंग** म्हणाला, ‘ महाराज, हेंच त्याच्या दुःखाचें कारण.’

हें ऐकून **राक्षस** घाबरल्यासारखा झाला. कारण, स्वतः **विष्णुदास** हा त्याचा परममित्र नव्हता, तरी **चंदनदासाचा** तो परममित्र होता, हें त्याला माहीत होतें. **विष्णुदास** हा मित्रवियोगदुःखानेंच अग्नींत प्रवेश करायाला तयार झाला आहे, असें **दीर्घशृंगानें** सांगितल्यावरून **राक्षस** मनांत ह्मणाला, यावरून **चंदनदासावरच** कांहीं संकट आलें

आहे असें वाटतें. तो **दीर्घशृंगाला** म्हणाला, तुझ्या मित्राचा विनाश आणि त्याच्या मित्राचा नाश, यांची हकीकत अंमळ विस्तारपूर्वक सांगशील का? ती ऐकण्याची इच्छा आहे.'

**दीर्घशृंग** म्हणाला, 'महाराज, क्षमा करा. दुर्दैवी मी यापेक्षां मरणाला अधीक विलंब करून घेण्याविषयीं समर्थ नाहीं.'

**राक्षस** म्हणाला, 'बाबा, असें काय म्हणतोस? ऐकण्याला योग्य असलेली गोष्ट अवश्य सांगावी.'

**दीर्घशृंग** म्हणाला, 'बरें! न सांगून तरी काय करणार? तुमच्यापुढें करावें तरी काय? तुमचा फारच आग्रह. सांगतों ऐका. ह्या शहरांत **चंदनदास** नांवाचा एक मोठा प्रसिद्ध जवाहिऱ्या आहे.'

**चंदनदासाचें** नांव ऐकतांच विषादानें **राक्षस** मनांत म्हणाला, हेंच तें, दैवानें आमच्या शोकाचें द्वार आतां उघडें केलें असें वाटतें. मना, अंमळ स्थिर हो. अतिशय कष्टकारक असें कांहीं वर्तमान तुला आतां ऐकायाचें आहे! तो **दीर्घशृंगाला** म्हणाला, 'बाबा, होय. तो मोठा मित्रवत्सल आणि सत्पुरुष आहे, असें लोक सांगतात. बरें पण, त्याचें काय झालें?'

**दीर्घशृंग** म्हणाला, 'तो ह्या आमच्या **विष्णुदासाचा** प्रियमित्र आहे.'

हें ऐकून **राक्षस** मनांत म्हणाला, हा शोकरूपी वज्रपात आतां अगदीं जवळ आला असें वाटतें!

**दीर्घशृंग** म्हणाला, 'तेव्हां **विष्णुदासानें** आपल्या मित्राच्या स्नेहाला अनुसरून आज महाराज **चंद्रगुप्ताला** विनंती केली.'

राक्षस ह्मणाला, 'काय ह्मणून विनंती केली ती?'

दीर्घशृंग ह्मणाला, 'त्यानें अशी विनंती केली कीं, महाराज, माझ्या घरांत कुटुंबाच्या पोषणापुरतें द्रव्य आहे; तर माझ्या पेढीवर जितकी कांहीं मालमत्ता असेल, तितकी सारी घेऊन माझा प्रियमित्र चंदनदास याला आपण सोडा.'

हें ऐकून राक्षसाला फार संतोष वाटला. तो मनांत ह्मणाला, शाबास विष्णुदासा, शाबास. तूं मित्रस्नेह दाखविलास खरा. नाहीं तर पुत्राला बाप व बापाला पुत्र ज्या द्रव्याकरितां मारण्याची इच्छा करितात, ज्याच्याकरितां मित्र मित्रांचा स्नेह सोडतात, अशा द्रव्याला जेव्हां तूं एखाद्या संकटाप्रमाणें तात्काल सोडण्याला तयार झालास तेव्हां—जरी तूं जातीचा वाणी आहेस तरी—तुझें तें द्रव्य सफळ झालें. राक्षस दीर्घशृंगाला ह्मणाला, 'मग तुझ्या मित्रानें याप्रमाणें विनंती केली असतां राजानें काय सांगितलें?'

दीर्घशृंग ह्मणाला, 'याप्रमाणें विनंती केल्यावर महाराज चंद्रगुप्तानें विष्णुदास शेटजीला असें सांगितलें कीं, मी केवळ द्रव्याकरितां चंदनदासाला कैदेंत ठेविलें नाहीं. तर त्यानें अमात्य राक्षसाचें कुटुंब छपवून ठेविलें ह्मणून ठेविलें आहे. आम्ही पुष्कळ वेळां त्याला तें आमच्या हवालीं करण्याविषयीं हुकूम केला असून त्यानें तसें केलें नाहीं. तेव्हां, जर तो राक्षसाच्या कुटुंबाला आमच्या हवालीं करील, तर आतां या क्षणीं त्याची सुटका होईल. नाहीं तर त्याला प्राणांतिक दंड होणार. असें सांगून चंदनदासाला सुळीं देण्याच्या ठिकाणीं नेवविलें. तेव्हां जोंपर्यंत त्याचें वाईट वर्तमान आपल्या

कानांवर आलें नाहीं तोंपर्यंत मी अग्निप्रवेश करीन, असें सांगून माझा मित्र **विष्णुदास** हा अग्निप्रवेश करावयाला निघाला. आणि मीही त्याचें वाईट वर्तमान ऐकण्यापूर्वी प्राण सोडावा, ह्मणून गळ्याला फांस लावून जीव देण्याकरितां या बागेंत आलों.'

**राक्षस** ह्मणाला, 'अरे, अद्याप **चंदनदासाचा** प्राण घेतला नाहींना?'

**दीर्घशृंग** ह्मणाला, 'नाहीं नाहीं. अद्याप त्याला मारला नाहीं. आज मारणार आहेत. त्याच्याजवळ वरचेवर अमात्य **राक्षसाचें** कुटुंब दे ह्मणून मागत असतात. पण मित्रस्नेहानें तो देत नाहीं, म्हणून त्याचा आतां प्राण जाणार आहे. बरें महाराज, आतां पुरे करा. माझ्यानें हा वेळ फुकट घालवत नाहीं. मी आतां लवकर प्राणत्याग करणार.'

हें ऐकून **राक्षस** हर्षानें मनांत ह्मणाला, शाबास मित्रा **चंदनदासा**, तुझी धन्य आहे. पूर्वी **शिबिराजानें** शरणागताचें रक्षण करून जें यश संपादन केलें, तें तूं मित्राचें कुटुंब वांचवून संपादन करीत आहेस. तो **दीर्घशृंगाला** ह्मणाला, 'बाबा, असें करूं नको. तूं आपल्या गळ्याला लावलेला हा फांस सोडून दे, आणि लवकर धांवत जाऊन त्या **विष्णुदासाला** अग्नींत प्रवेश करूं देऊं नको. आणि मीही **चंदनदासाला** मृत्यूपासून सोडवून घेतों.'

**दीर्घशृंग** म्हणाला, 'महाराज, आपण त्याला सोडवून घेणार ह्मणता; पण तें कोणत्या उपायानें घेणार? कारण, त्याच्यावरची पाळी चुकणें कठीण आहे.'

हें ऐकून **राक्षस** तरवार हातांत घेऊन ह्मणाला, 'माझ्या

उद्योगाला साह्य करणाऱ्या ह्या तरवारीनें त्याला सोडवून घेईन. ही तरवार, सजल मेघांनीं आच्छादित झालेल्या आकाशासारखी दिसत असून, युद्ध करण्याच्या आनंदानें हिच्या अंगावर रोमांच उभे राहिले आहेत काय असें दिसतें. तसाच, माझ्या हाताप्रमाणें हा खड्गही बलशाली आहे. शत्रूंनीं संग्रामरूपी कसोटीवर याची परीक्षा पाहिली आहे. मित्राच्या स्नेहानें पराधीन झालेल्या अशा मला हा खड्ग हें साहस करण्याविषयीं प्रवृत्त करीत आहे.'

**दीर्घशृंग** ह्मणाला, 'आर्या, याप्रमाणें शेट **चंदनदास** याला जीवदान करणारे व मोठ्या संकटांतून त्याला सोडविणारे असे आपण आहां तरी कोण? आपलें नांव गांव वगैरे समजल्यावांचून मी हें खरें समजणार नाहीं. बरें, मी आपल्याला असें विचारतों कीं, **चंदनदासाला** प्राणसंकटांतून सोडवून घेण्यास आपण ज्या अर्थी तयार झालां, त्या अर्थी आपण त्याचे परममित्र आहां असें वाटतें व ज्या अमात्य **राक्षसाच्या** कुटुंबाकरतां त्याच्यावर असें संकट आलें, ते अमात्य **राक्षस** आपणच आहां काय?' लक्ष्यपूर्वक पाहून म्हणाला, 'होहो. आपणच ते.' असें बोलून **राक्षसाच्या** पायांवर पडला.

**राक्षस** म्हणाला, 'ऊठ ऊठ. आतां फार वेळ लावूं नकोस. **विष्णुदासाला** जाऊन सांग कीं, हा **राक्षस चंदनदासाला** मरणाच्या संकटांतून सोडवीत आहे. तर आतां तिकडे लवकर जा.' असें बोलून **राक्षस** पुनः पुनः तरवार हालवून मोठ्या आवेशांत आला.

**दीर्घशृंग** म्हणाला, 'महाराज माझ्यावर अनुग्रह करा,

आणि मला जो कांहीं आपल्याविषयीं संशय आहे, त्याचा खुलासा करा.'

**राक्षस** म्हणाला, 'अरे बाबा, वरचेवर काय विचारतोस? तोच मी. आपल्या धन्याच्या नाशाचें दुःख ज्यानें अनुभवलें आहे, व मित्रांवर विपत्ति आणण्याला जो कारण झाला आहे असा अनार्य तोच मी खरोखरीचाच **राक्षस** आहें.'

**दीर्घशृंग** हें ऐकून, आनंदानें पुनः त्याच्या पायांवर मस्तक ठेवून म्हणाला, 'अरे बापरे! दैवानें तुमचें दर्शन झालें. दिवाणसाहेब, मजवर अनुग्रह करा. त्या दुष्ट **चंद्रगुप्तानें** आधीं **शकटदासाला** सुळावर देण्याचा हुकूम केला होता, पण त्याला तेथून कोणी सोडवून घेऊन देशांतराला नेलें. मांगांनीं असा हा प्रमाद कां केला म्हणून आर्य **शकटदासावर** जो त्या **चंद्रगुप्ताचा** क्रोधाग्नि पेटला होता, त्यानें त्या बिचाऱ्या मांगांला जाळून भस्म केलें. त्या दिवसापासून ते मांग, हातांत शस्त्र घेतलेला मनुष्य आसपास त्यांच्या दृष्टीस पडला तर, तत्काल अप्रमत्तपणानें कैद्याला लवकरच मारून टाकतात. तेव्हां, आपण शस्त्र घेऊन **चंदनदासाच्या** जवळ जाल तर त्या बिचाऱ्याला घटका दोन घटकांनीं मरण यावयाचें तें लवकरच येईल!'

हें ऐकून **राक्षस** मनांत म्हणाला, 'अरे, ह्या **चाणक्य**बटूचा नीतिमार्ग मोठा दुर्बोध आहे! कारण, **शकटदासाला** माझ्याकडे येण्याची सवडच मिळाली नसती. तेव्हां **चाणक्यानें शकटदासाला** मुद्दाम कोणाकडून तरी सोडवून घ्यावयाला लावून माझ्याकडे पाठवून दिला असावा.

'पण तशी गोष्ट असली, तर रागाच्या आवेशानें मांगांला मारलें याचें काय कारण? मुद्दाम तशा प्रकारचे कष्ट त्यांला कसे देईल हेंही लक्षांत येत नाहीं. एकंदरींत मनांत अनेक तर्क येऊं लागल्यामुळें निश्चय म्हणून कांहींच होत नाहीं!

ज्यापेक्षां मुद्दाम किंवा खरोखर त्यानें मांगांला मारविलें आहे, त्यापेक्षां आपण तरवार घेऊन तेथें जाणें हें योग्य नाहीं. कोणतीही युक्ति कालांतरानें सफल होत असते. पण येथें तिला घेऊन काय करायचें आहे? असें समजून औदासिन्यही धरून उपयोगाचें नाहीं. कारण, तो माझा प्रियमित्र चंदनदास माझ्याच करितां प्राणसंकटांत पडला आहे; तेव्हां ही तरवार ही ठेवून द्यावी आणि चंदनदासाबद्दल आपण सुळावर चढून त्याला सोडवून घ्यावा, व आपलें शरीर हीच त्याच्या प्राणाची किंमत द्यावी!'

हें ऐकून दीर्घशृंगाला फारच आनंद झाला. आपण आपली कामगिरी योग्य रितीनें बजावली असें समजून, तो राक्षसाचा निरोप घेऊन विष्णुदासाला त्याचा निरोप सांगण्याकारितां ह्मणून तेथून शहरांत आला, व झालेली सर्व हकीकत त्यानें चाणक्याला कळविली.

राक्षस हा जसा मसलती होता, तसा मोठा शूरही होता. तो हातांत शस्त्र घेऊन उभा राहील, तर चंदनदासाला सोडवून घेऊन जाईल, हें चाणक्य पुरतेपणीं समजून होता; ह्मणूनच त्यानें ही युक्ति केली. शूर पुरुष बहुतकरून भोळे असतात व त्यांचें मन मोकळें असतें.

चंदनदासानें, याप्रमाणें आपला नाश झाला तरी पुरवला

पण **राक्षसाचें** कुटुंब शत्रूच्या स्वाधीन करावयाचें नाहीं, असा जो निश्चय केला, त्याबद्दल **राक्षस** त्याचा अतिशय आभारी झाला होता. व त्या उपकाराच्या भरांत त्याला एक प्रकारचें वेड लागलें होतें, असें ह्मटलें तरी चालेल. हातांत शस्त्र न घेतां **राक्षसानें** आपल्या स्वाधीन व्हावें असा **चाणक्याचा** हेतु असल्यामुळें, त्यानें **शकटदास** ज्यांच्या हातून सुटून गेला त्या मांगांला मारल्याचें, व त्या दिवसापासून कोणी शस्त्रधारी पुरुष कैद्याच्या जवळ आला तर मांग कैद्याला झटपट मारून टाकतात, हें वर्तमान **दीर्घशृंगाकडून राक्षसाला** मुद्दाम ऐकविलें होतें. मित्रस्नेहानें वेडावलेल्या **राक्षसाला** त्याविषयीं कांहींच विवेक राहिला नाहीं. शूर पुरुष, प्राण गेले तरी पुरवले पण शस्त्र सोडण्यास, कधींही तयार व्हायचे नाहींत; असें असून **राक्षसानें** त्या शस्त्राचा देखील त्याग केला, ही गोष्ट मोठी चमत्कारिक आहे. पण एकदां दैव प्रतिकूळ झालें ह्मणजे मनुष्याच्या बुद्धीला देखील विपर्यास होतो!

---

## भाग सातवा.

पूर्वीच्या भागांत सांगितल्याप्रमाणें **दीर्घशृंगाच्या** सांगण्यावरून **राक्षसानें** आपल्या हातांतील तरवार एका बाजूला ठेवून, **चंदनदासाबद्दल** आपण मरायाचें असा निश्चय केला. **दीर्घशृंगानें** हें वर्तमान **चाणक्याला** कळवितांच, त्यानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें **सिद्धार्थक** आणि **समिद्धार्थक** या दोघांला सूचना केली.

**चाणक्याच्या** आज्ञेप्रमाणें त्या उभयतांनीं मांगांचा वेष घेऊन **चंदनदासाला** सुळावर चढविण्याकरितां त्याला तु-

रुंगांतून बाहेर काढला. ज्याला सुळावर द्यावयाचा असेल, त्याचा पोषाख वगैरे मोठा चमत्कारिक असतो. **चंदनदासाच्या** सर्वांगावर रक्तचंदनाचे पंजे मारले होते. त्याच्या गळ्यांत लाल जासवंदीच्या व कण्हेरीच्या फुलांच्या माळा घातल्या होत्या. ज्या सुळावर त्याला चढवायाचा होता, तो सूळ त्याच्या खांद्यावर दिला होता. **चंदनदासाची** बायको, त्याचा मुलगा, व इतर आप्त इष्टमित्र यांचा घोळका त्याच्याबरोबर चालला होता. त्याच्या दोन्ही दंडांला काढण्या बांधून, मांग बनलेल्या, **सिद्धार्थक** आणि **समिद्धार्थक**, या दोघांनीं त्या हातांत धरल्या होत्या. याप्रमाणें **चंदनदासाची** स्वारी तुरुंगांतून बाहेर निघाली.

ठिकठिकाणीं थाळी पिटवून ते मांग, **चंदनदासानें** राजद्रोह केल्यामुळें त्याला ही शिक्षा झाली आहे, असें लोकांला जाहिर करीत होते. **चंदनदास** हा मोठा श्रीमान व प्रतिष्ठित असून लोकप्रिय असल्यामुळें, त्याच्याबद्दल हळहळणाऱ्या हजारों लोकांचा त्याच्या सभोंवती गराडा पडला होता. मंडळीची गर्दी पाहून मांगाचा वेष घेणारा **सिद्धार्थक** ह्मणाला, 'बाबांनो, पलिकडे व्हा. पलिकडे व्हा. चला. जर तुह्मांला आपले प्राण, आपली धनदौलत, आपला वंश, बायकापोरें, यांचें रक्षण करण्याची इच्छा असेल, तर राजद्रोहाला अगदीं दूर टाका. आणखीं असें आहे कीं, कांहीं अपथ्य केल्यानें मनुष्याला रोग होतो व त्यापासून मरण येतें. पण राजाचें अपथ्य (राजद्रोह) हें फार विलक्षण आहे. हें करणाऱ्या पुरुषाचें सर्व कूल नाश पावतें. जर माझ्या सांगण्यावर तुमचा विश्वास नसेल, तर

राजद्रोह करणाऱ्या ह्या **चंदनदास** शेटजीकडे पहा. याचीं पोरेंबाळें चटसारीं वध्यस्थानाकडे नेलीं जात आहेत!'

हें ऐकून याला सोडविण्याचा कांहीं उपाय आहे का, ह्मणून लोकांनीं विचारिलें. तेव्हां **सिद्धार्थक** ह्मणाला, 'हो उपाय नसायाला काय झालें! अमात्य **राक्षसाचें** कुटुंब हा सरकारच्या हवालीं करील, तर याचे प्राण वांचतील!'

हें ऐकून लोक ह्मणाले, 'शिवशिव! हा शरणागतवत्सल आहे. हा आपल्या प्राणाकरितां असें अकार्य कधींही करणार नाहीं.'

**सिद्धार्थक** ह्मणाला, 'तर मग हा आतां अक्षय्य सुखांत ( मरणांत ) राहील असें समजावें. मग याला सोडविण्याचा उपाय आहे का ह्मणून तुह्मी विचारतां, त्यांत तरी काय अर्थ आहे?'

हें ऐकून **चंदनदास** डोळ्यांत पाणी आणून ह्मणाला, 'आपल्या हातून वाईट गोष्ट होऊं नये याविषयीं रात्रंदिवस मोठें भय बाळगणाऱ्या आमच्यासारख्याला देखील चोरासारखें मरण प्राप्त होतें, याला काय ह्मणावें? बा कृतांता, काळा, तुला नमस्कार असो! अत्यंत क्रूर अशा पुरुषांला, अपराधी किंवा निरपराधी, यांच्यांत कांहीं फरक वाटत नसेल. कारण, मांस भक्षण करायाचें सोडून केवळ जीव वांचण्याकरितां गवतावर निर्वाह करून राहणाऱ्या निरपराधी हरिणाला पारधीलोक मारतात, त्यांत त्यांचा काय हेतु असतो? तोच आमच्या सारख्यांला मारण्यांत त्यांचा हेतु असेल!' चहूंकडे पाहून आपला प्रियमित्र **विष्णुदास** याला हांक मारून ह्मणाला, 'गड्या **विष्णु**-

दासा, मला उत्तर देखील देत नाहींस हें काय? पण, यांत तुझा तरी काय अन्याय? अशा संकटाच्या वेळीं दृष्टीसमोर उभे राहणारे मनुष्य फार दुर्लभ आहेत!' आसमंतात् आपल्या मित्रांकडे पाहून ह्मणाला, 'हे आमचे प्रियमित्र, डोळ्यांतून निघणाऱ्या अश्रुपाताच्या मिषानें जणुंकाय माझें तर्पणच करून, मोठ्या संकटानें मागें फिरले आहेत, व शोकानें दीनवदन होऊन दुःखाश्रुभरित दृष्टीनें वरचेवर माना वांकड्या करून माझ्याकडे पाहत आहेत.'

इतक्यांत **चंदनदास** वध्यस्थानांत येऊन पोंचला, तेव्हां ते मांग ह्मणाले, 'आर्या **चंदनदासा**, मारायाच्या ठिकाणीं तूं येऊन पोंचलास. आतां या बरोबरच्या लोकांला निरोप दे कसा.'

हें ऐकून **चंदनदास** आपल्या बायकोला ह्मणाला, 'ह्या मुलाला घेऊन तूं आतां मागें फीर. यापुढें तूं माझ्या बरोबर येणें योग्य नाहीं.'

हें ऐकून त्याची बायको रडत रडत ह्मणाली, 'आपण कोठें देशांतराला निघालां असतां, तर मीं मागें फिरलें असतें. पण जेथें गेलें असतां पुनः दर्शन व्हावयाचें नाहीं अशा परलोकाला आपण जात आहां, तेव्हां मी कशी मागें फिरूं!'

**चंदनदास** ह्मणाला, 'प्रिये, मित्रकार्याकरितां हा माझा नाश होत आहे. मी कांहीं अपराध केल्यावरून मला ही शिक्षा झाली असें नाहीं. ह्याकरितां माझ्या ह्या मरणाच्या संबंधानें विषाद मानण्याचें कांहीं कारण नाहीं!'

बायको ह्मणाली, 'असें असेल तर यावेळीं कुलस्त्रियेनें मागें फिरावें हें अगदीं अयोग्य आहे.'

**चंदनदास** ह्मणाला, 'घरकरणी, तर मग तूं आतां काय निश्चय केला आहेस?'

बायको ह्मणाली, 'भर्त्याच्या चरणांबरोबर गेलें असतां आपल्यावर मोठा अनुग्रह होईल, असा मी विचार केला आहे.'

हें ऐकून **चंदनदास** ह्मणाला, 'हा तूं फार वाईट विचार केला आहेस. पहा, हा मुलगा अगदीं लहान असून लोकव्यवहाराची याला अद्याप कांहींच माहिती झालेली नाहीं. याला चांगल्या मार्गाला लावणें हें तुझें काम आहे.'

बायको ह्मणाली, 'सर्व देवता प्रसन्न होऊन याच्यावर अनुग्रह करोत! मी काय करणार आहें?' पुत्राच्या हनवटीला हात लावून ह्मणाली, 'माझ्या लाडक्या, आतां आपल्या बापाला शेवटचा नमस्कार कर!'

मुलगा फारच लहान होता. त्याला चाललेल्या गोष्टीपैकीं कांहींच माहीत नव्हतें. तो हें आईचें भाषण ऐकून, घाबरा होऊन, बापाला नमस्कार करून ह्मणाला, 'बाबा, आपल्यावांचून मी एकटयानेंच मागें राहून काय करावें?'

**चंदनदासाला चाणक्याचें** अतिशय भय वाटत होतें. तो ह्मणाला, 'पुत्रा, जेथें **चाणक्य** नसेल अशा ठिकाणीं जाऊन रहा!'

यांचा याप्रमाणें संवाद चालला आहे तों, खळगा खणून मांगांनीं सूळ रोंवला; आणि ते **चंदनदासाला** ह्मणाले, 'आर्य **चंदनदासा**, आतां उगीच वेळ लावूं नको. हा सूळ रोंवून तयार केला आहे, तर आतां मरायला तयार हो कसा.'

हें ऐकून **चंदनदासाची** स्त्री मांगांला ह्मणाली, 'आर्यांनो, कृपा करा, कृपा करा, अंमळ दम धरा !'

**चंदनदास** बायकोला ह्मणाला, 'अग, येथें आरडून काय उपयोग आहे ? ह्या निर्दय दरबारांत कितीही आरडून कंठशोष केलास तरी कांहीं उपयोग होणार नाहीं. माझ्यासारखे जे निरपराधी लोक मरतात, त्यांला अवश्यमेव स्वर्गप्राप्ति होते. व तो स्वर्गास गेला ह्मणजे दुःखित झालेल्या त्याच्या आप्तांचें प्रत्यक्ष देव येऊन समाधान करतात. मित्राच्या कार्यामुळें मला मृत्यु प्राप्त झाला आहे; कांहीं अपराधामुळें प्राप्त झाला नाहीं. तेव्हां एकंदरींत हें माझें मरण हर्ष मानण्यासारखें असून तूं उगीच रडतेस हें कां!'

**सिद्धार्थक** आणि **समिद्धार्थक** यांनीं मांगांचा वेष घेतल्यानंतर आपलीं नांवेंही बदललीं होतीं. **सिद्धार्थकानें** आपल्याला **वज्रलोमा** असें नांव घेतलें होतें, व **समिद्धार्थकानें बिलपत्र** असें नांव घेतलें होतें.

**सिद्धार्थक समिद्धार्थकाचें** नांव घेऊन ह्मणाला, 'अरे **बिलपत्रका**, या **चंदनदासाला** तूं धर; ह्मणजे याच्या बरोबरचे लोक आपोआप जातील. नाहीं तर ही यांची रडारड संध्याकाळपर्यंत सरायाची नाहीं.'

**समिद्धार्थक** ह्मणाला, 'अरे **वज्रलोम्या**, हा पहा मी याला धरतों.' असें बोलून तो **चंदनदासाला** धरायला गेला.

तेव्हां **चंदनदास** ह्मणाला, 'बाबा, क्षणभर थांब. मी एक वेळ आपल्या पुत्राला भेटतों.' असें बोलून त्यानें पुत्राला मिठी मारली. आणि त्याचें मस्तक हुंगून ह्मणाला,

'मरण हें केव्हांतरी येणारच आहे. तेव्हां मित्रकार्याच्या निमित्तानें सांप्रत मी मरतों आहें, हें चांगलेंच आहे!'

हें ऐकून पुत्र ह्मणाला, 'बाबा, हें देखील काय सांगितलें पाहिजे! मित्राकरितां प्राण देणें हा आपला कुलधर्मच आहे.' असें बोलून तो **चंदनदासाच्या** पायां पडला. इतक्यांत एक मांग आपल्या सोबत्याला ह्मणाला, 'अरे पुरे आतां. या **चंदनदासाला** घे लवकर.'

इतक्यांत **बिलपत्रानें चंदनदासाला** धरला, तें पाहून त्याची बायको ऊर बडवून घेत होत्साती,—'बाबांनो, रक्षण करा, याचें रक्षण करा! असें करूं नका,' ह्मणून मोठ्यानें ओरडूं लागली. इतक्यांत, डोक्यावरून पांघरूण घेतलेला **राक्षस** अकस्मात् तेथें येऊन, **चंदनदासाच्या** बायकोला, 'भिऊं नको,' असें सांगून मांगाला ह्मणाला, 'अहो सुळावरच्या मुख्य अधिकाऱ्यांनो, ह्या **चंदनदासाला** मारूं नका. कारण, ज्यानें शत्रुकुलाप्रमाणें आपल्या यजमानांचें कूळ नाश पावत असतां आपल्या स्वतः डोळ्यांनीं पूर्वी पाहिलें, आपले मित्र मोठ्या संकटांत पडले असतांही एकाद्या महोत्सवांत स्वस्थ मनानें असावें त्याप्रमाणें जो स्वस्थपणें राहिला, व ज्याचा प्रत्यक्ष आत्मा तुह्मी सांप्रत मारायला काढला आहे, असा दुर्दैवी मी स्वतःच मरायाला तयार झालों आहें. सुळीं देण्याला काढलेल्या मनुष्याच्या गळ्यांत घालायची माळ माझ्या गळ्यांत घाला!'

**राक्षस** एकाएकीं पुढें आला. त्याला पाहून **चंदनदास** डोळे पुसून ह्मणाला, 'अमात्य **राक्षसा**, आपण हें काय करतां!'

**राक्षस** ह्मणाला, 'तूं जें उत्तम वर्तन केलेंस, त्याच्या एकदेशाचें हें केवळ अनुकरण आहे.'

**चंदनदास** ह्मणाला, 'अमात्य **राक्षसा,** हावेळपर्यंत मी जो सर्व प्रयत्न केला, व तूंही अनेक प्रयत्न केलेस, त्यांला निष्फळ करून टाकणारें हें असें काय करतोस?'

**राक्षस** ह्मणाला, 'मित्रा **चंदनदासा,** हा मी स्वार्थच केलेला आहे. तुझें रक्षण होणें हें माझ्या रक्षणापेक्षांही श्रेयस्कर आहे. आतां माझा उपालंभ करूं नकोस.' मांगाला ह्मणाला, 'बाबा, त्या दुरात्म्या **चाणक्याला** जाऊन सांग.'

**वज्रलोमा** ह्मणाला, 'महाराज, काय सांगायचें तें?'

**राक्षस** ह्मणाला, 'असें सांग कीं, ह्या सांप्रतच्या दुष्ट काळामध्यें, कलियुगांत सर्व प्राणिमात्र असत्याचरण करण्याविषयीं तत्पर असतांही, आपले प्राण खर्चून दुसऱ्याचें रक्षण करण्याविषयीं तत्पर झालेल्या ज्या यशस्वी पुरुषानें त्रेतायुगांत झालेल्या **शिबिराजाचेंही** यश तुच्छ केलें, परहिताविषयीं तत्पर अशा **बौद्धांचें** आचरण ज्यानें आपल्या शुद्ध चरित्रानें मागें टाकलें, व जो हा मनुष्य अतिशय सत्कार करण्याला योग्य असतांही ज्या माझ्या संबंधानें तुझा शत्रु झाला आहे, तोच मी राक्षस आहें, असें त्या तुझ्या **चाणक्याला** सांग.'

हें ऐकून **वज्रलोमा** बिलपत्रकाला ह्मणाला, 'अरे, तूं अंमळ ह्या **चंदनदासाला** धरून येथेंच या श्मशानवृक्षाच्या सावलींत घटकाभर बैस. तोंपर्यंत मी, आर्य **चाणक्याला** अमात्य **राक्षस** सांपडला हें वर्तमान कळवून येतों.'

हें ऐकून **बिलपत्रकानें चंदनदासाला** धरून बसण्याचें

कबूल केलें, व **वज्रलोम्याला** जाण्यास सांगितलें. तेव्हां **बिलपत्र**, **चंदनदासाचा** मुलगा व बायको आणि **राक्षस** यांसहवर्तमान **चंदनदासाला** घेऊन त्या झाडाखालीं जाण्यास निघाला. तो चोहोंकडे पाहून ह्मणाला, 'अरे, येथें कोणी मनुष्य आहे का? **नंदकुलरूपी** पर्वताचा नाश करण्याच्याकामीं केवळ वज्र, आणि **मौर्यकुलाची** प्रतिष्ठा करणारा, असा जो आर्य **चाणक्य** त्याला हें वर्तमान कोणी सांगेल काय?'

हें ऐकून **राक्षसाला** फार वाईट वाटलें. तो मनांत ह्मणाला, एकूण हेही शब्द मला ऐकण्याचा प्रसंग आलाना! असो; काय करणार? दैवाचा फेरा सर्वांवर सारखाच असतो. तें ठेवील त्याप्रमाणें वागलें पाहिजे!

पुनः चांडाल ह्मणाला, 'आर्य **चाणक्याच्या** मसलतीनें ज्याच्या बुद्धीचा प्रसार जखडून टाकला आहे, असा हा अमात्य **राक्षस** सांप्रत पकडला गेला आहे.'

**चाणक्य** यावेळीं आपल्या घरीं बसला होता. तिकडे कायकाय गोष्टी चालल्या आहेत त्यांकडे त्याचें लक्ष्य एकसारखें वेधलें होतें. **वज्रलोमा** (**सिद्धार्थक**) यानें, शस्त्राचा त्याग केलेला **राक्षस** आपल्या हातांत सांपडला, हें वर्तमान सांगतांच **चाणक्य** मोठ्या आनंदानें श्मशानाकडे निघाला. यावेळीं तो सर्वतोपरी विजयी झाला होता. तरी **राक्षसाच्या** मनाला खेद होऊं नये ह्मणून त्यानें डोक्यावरून बुरखा घेतला होता. तो, **चंदनदासाला** सुळीं देण्याला उभा केला होता, त्या ठिकाणीं येऊन **वज्रलोम्याला** ह्मणाला, 'अरे, तूं काय सांगितलेंस तें? **राक्षसाला** पकडलास काय? पण हें असलें अशक्य कार्य कोणीं बरें

केलें ? रसरसीत ज्वाळा ज्यापासून निघताहेत असा अग्नि धोतराच्या पदरांत कोणीं बरें बांधला ? सतत वाहणाऱ्या वाऱ्याला दोऱ्यांनीं कोणीं बंधन केलें ? हजारों मदोन्मत्त हत्तींचीं गंडस्थळें फोडणारा सिंह पिंजऱ्यांत कोणीं घातला ? किंवा अनेक मासे, सुसरी इत्यादिकांनीं भयंकर अशा समुद्राला पोहून कोण पार गेला ?'

**वज्रलोमा** ह्मणाला, 'नीतीमध्यें परम निपुण अशा आपणच हें कार्य केलें.'

**चाणक्य** ह्मणाला, 'छे छे, असें ह्मणूं नको. नंदकुलाचा द्वेष करणाऱ्या दैवानें हें काम केलें, असें ह्मण.'

**चाणक्य** तेथें आला असें पाहून **राक्षस** मनांत ह्मणाला, हा दुष्ट—अथवा याला दुष्ट तरी कां ह्मणावें ? महात्माच ह्मटलें पाहिजे—जसा सर्व रत्नांचा आकर समुद्र तसा, सर्व शास्त्रांचा आकर आहे. आह्मी याचे द्वेष्टे आहों, तथापि याचे गुण ऐकून आह्मांला पुरेसें होत नाहीं.'

**चाणक्य राक्षसा**कडे पाहून हर्षानें मनांत ह्मणाला, अमात्य **राक्षस** ह्मणतात तो हाच. ज्या महात्म्यानें रात्रंदिवस अनेक प्रकारच्या कल्पना करण्याचे क्लेश देणारी, व निद्रेचा विच्छेद करणारी, अशी चिंता लावून आज इतके दिवस **चंद्रगुप्ता**ची सेना आणि माझी बुद्धि, यांला विशेष श्रम दिले तो हाच. असो; आतां हा आपल्या हातांत सांपडला आहे, तथापि याला सत्कारपूर्वक भेटावें. असा विचार करून डोक्यावरचें पांघरूण काढून त्याला ह्मणाला, 'अमात्य **राक्षसा**! हा **विष्णुगुप्त** मी तुला नमस्कार करतों.'

त्याला पाहून **राक्षस** मनांत ह्मणाला, यावेळीं अमात्य हें विशेषण मला मोठें लज्जास्पद आहे. **चाणक्याला** ह्मणाला,

'**विष्णुगुप्ता**! मांगांच्या स्पर्शानें विटाळलेल्या मला तूं यावेळीं शिऊं नको.' हें ऐकून **चाणक्य** हंसून ह्मणाला, 'अमात्य **राक्षसा**, कोणाला मांग ह्मणतोस ! **चंदनदासाला** सुळावर चढविणारे जे हे दोघे ते मांग नसून तुझ्या माहितींतलेच आहेत. ज्याला **वज्रलोमा** ह्मणतात तो हा कांहीं दिवस तुझ्या चाकरींत असलेला **सिद्धार्थक** नांवाचा कामदार आहे. बिचाऱ्या त्या **शकटदासानें** अजाणतेपणीं तें पत्र लिहिलें होतें, किंवा मीच त्याच्याकडून तसें लिहविलें ह्मटलें तरी चालेल.'

**शकटदासानें** फितूर होऊन आपला विश्वासघात केला असें **राक्षस** हावेळपर्यंत समजत होता! पण **चाणक्यानें** या वेळीं त्याचा खुलासा केल्यावरून **राक्षस** मनांत ह्मणाला, एकून **शकटदासानें** आपला विश्वासघात केला नाहीं हें एक बरें झालें.

**चाणक्य राक्षसाला** ह्मणाला, 'आतां तुला फार काय सांगूं? थोडक्यांत सर्व सांगतों. **भद्रभटादिक** सेवक **सिद्धार्थकाजवळ** असलेला तो लेख, तसेच ते तीन दागिने, तो तुमचा मित्र भदंत **जीवसिद्धि**, तसेंच नुकताच तुह्मांला त्या जुन्या बागेंत भेटलेला मनुष्य **दीर्घशृंग**, ह्या **चंदनदासाला** दिलेले क्लेश हें सर्व, **चंद्रगुप्ताशीं** तुझा योग जडवून द्यावा अशी इच्छा करणारा जो मी, त्या माझें कारस्थान आहे. आतां तें असो. हा राजा **चंद्रगुप्त** तुझ्या भेटीची इच्छा करीत आहे पहा.'

अशा स्थितींत **चंद्रगुप्ताला** भेटावें हें **राक्षसाला** योग्य वाटलें नाहीं. तरी तो मनांत ह्मणाला, आपला निरुपाय आहे आतां न भेटून कसा परिणाम लागेल !

**चाणक्य राक्षसाशीं** असें बोलत आहे, इतक्यांत राजकीय परिवारासह **चंद्रगुप्त**ही तेथें प्राप्त झाला. **राक्षसाला** पाहून **चंद्रगुप्त** मनांत ह्मणाला, हें सर्व आर्य **चाणक्या**च्या बुद्धीचें फल आहे. मलातर या गोष्टीची मोठी लाज वाटते. फळ प्राप्त होण्याची वेळ आली असून दैवयोगानें शत्रुत्वाला पावलेले बाण, अधोमुख होऊन, आपल्या भात्यांत जणूंकाय शोक करीत बसले आहेत, असें त्यांला राहुंदेणें हें चांगलें वाटत नाहीं.

अथवा, मी धनुष्याला दोरी देखील न लावतां स्वस्थ बसला, तरी ज्याला जिंकायाचें असेल त्याचा जय करण्यास मी समर्थच होत आहें. कारण, स्वतः निरपेक्ष असून माझ्या हिताविषयीं जपणारा महाबुद्धिमान् माझा गुरु (**चाणक्य**) रात्रंदिवस जागृत आहे, तेव्हां त्याच्या बुद्धीपुढें काय अशक्य आहे ! असें बोलून **चाणक्या**च्या जवळ येऊन **चंद्रगुप्ता**नें मोठ्या नम्रतेनें त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें.

**चाणक्याला**, **राक्षसा**च्या हातीं प्रधानगिरी देऊन, आपण मोकळें व्हायचें होतें. ह्मणून तो **चंद्रगुप्ताला** ह्मणाला, 'तुझे सर्व मनोरथ परिपूर्ण झाले. तर आतां ह्या आपल्या अमात्य **राक्षसाला** नमस्कार कर.'

हें ऐकून **राक्षस** मनांत ह्मणाला, वाहवा, एकूण यानें आमचें नातें देखील जुळवून दिलें !

**चाणक्य चंद्रगुप्ता**चा हात धरून ह्मणाला, 'हा पहा अमात्य **राक्षस** येथें प्राप्त झाला आहे. याला आधीं नमस्कार कर.'

**चंद्रगुप्त** मोठा शहाणा व धोरणी होता. त्यानें तत्काळ मोठ्या नम्रतेनें **राक्षसाला** नमस्कार केला.

त्याला पाहून **राक्षस** मनांत ह्मणाला, हा मुलगा सार्वभौमपदवीला योग्य आहे खरा. अगदीं लहान असतांनाच याचा पुढें मोठा उदय होईल, अशीं याचीं लक्षणें दिसत होतीं, त्याप्रमाणें, अनुक्रमानें हा, हत्ती जसा यूथपति होतो तसा, सार्वभौमपदवीचा अधिकारी झाला. **चंद्रगुप्ता**ला ह्मणाला, 'राजा तुझा विजय असो!'

हें ऐकून **चंद्रगुप्त** ह्मणाला, 'आर्या, ह्या जगांतलें मी काय काय जिकलेले नाहीं, याचा आपण विचार करून पहा बरें. माझा गुरु आर्य **चाणक्य** राज्यकारभार पहात असतां, व तुह्मी मजवर अनुग्रह करीत असतां, मी सर्व कांहीं जिकलें आहे, असें समजतों.'

हें ऐकून **राक्षस** मनांत ह्मणाला, शाबास! कौटिल्याचाच शिष्य आहेस तूं. स्वामिसेवकाचें नातें लावलेंस खरें, पण तेंही नाहीं. तुझ्या आंगचा हा स्वाभाविकच विनय असावा. माझी बुद्धि द्वेषानें कलुषित झाल्यामुळें मी दुसरीच कल्पना करीत होतों. तुझ्यासारखा शिष्य मिळाल्यामुळें **चाणक्य** विजयी झाला, हें योग्यच आहे. कारण, शत्रूचा जय करण्याला उद्युक्त झालेला अधिकारी योग्य असून तो बुद्धिमंद असला, तरी त्याचा जो कोणी सूत्रधार असेल त्याला जय प्राप्त होईल; पण **मलयकेतू**सारख्या एकाद्या वेडचाच्या हिताकरितां झटणाऱ्या प्रत्यक्ष बृहस्पतीसारख्या शहाण्यालाही अपयश आल्यावांचून रहाणार नाहीं. नदीकिनाऱ्यावरच्या वृक्षासारखा तो कधींना कधीं उलथूनच पडणार!

**चाणक्य राक्षसाला** ह्मणाला, 'अमात्य **राक्षसा**, तुला **चंदनदासा**चे प्राण रहावे हें इष्ट आहे का?'

**राक्षस** ह्मणाला, 'होहो. यांत काय संदेह?

**चाणक्य** ह्मणाला, ' पण हातांत शस्त्र न घेतां तूं **चंद्रगुप्तावर** अनुग्रह करीत आहेस, ह्मणून संदेह वाटतो. जर तुला **चंदनदासाचे** प्राण पाहिजे असतील, तर ही तरवार हातांत घे.' असें बोलून थोडचा दिवसांपूर्वी **चंद्रगुप्ताशीं** भांडण करून जी तरवार त्यानें खालीं ठेवली होती तीच दुसऱ्या मनुष्यांकडून **राक्षसाच्या** हातांत देऊं लागला.

हें पाहून **राक्षस** लाजल्यासारखा होऊन ह्मणाला, '**विष्णुगुप्ता**, असें करूं नको. हें शस्त्र हातांत घेण्याविषयीं आह्मी अयोग्य आहों. विशेषत: तूं धारण केलेलें शस्त्र आह्मी घ्यावें, इतकी आमची योग्यता नाहीं.'

**चाणक्य** ह्मणाला, '**राक्षसा**, मी योग्य आहें, आणि तूं योग्य नाहींस, असा उगीच वाद करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पहा, नेहमीं ज्याला लगाम चढविला आहे व खोगीर घालून सिद्ध केला आहे, अशा घोडचासहवर्तमान, स्नान, आहारविहार, खाणेंपिणें, निजणें, स्वेच्छेनें हिंडणें-फिरणें, हें सर्व सोडून तुझ्या पराक्रमाच्या माहात्म्यानें, हे बुद्धिमान् पुरुषा, ही आमची फौज हा वेळपर्यंत रात्रंदिवस अगदीं जय्यत राहिली आहे. हे हत्ती आणि घोडे तुझ्या भयास्तव नेहमीं आह्मांला तयार ठेवावे लागले. बरें पण, इतकें कशाला? तूं हातांत तरवार न घेशील, तर **चंदनदास** जिवंत राहील असें मात्र समजूं नकोस.'

हें ऐकून **राक्षस** मनांत ह्मणाला, काय करावें ? **नंदराजाचा** स्नेह, ह्याच कोणी दोऱ्या त्या माझ्या हृदयाला वेष्टिताहेत. आणि सांप्रत मी त्या **नंदाच्या** शत्रूचा सेवक

होत आहे. यावरून, जे वृक्ष आपण पाणी घालून वाढवावे तेच आपल्या हातानें तोडल्यासारखें होणार आहे. तथापि हा माझा मित्र **चंदनदास**, याचें शरीर रक्षण करण्याकरितां मला शस्त्र धारण केलेंच पाहिजे. प्रसंग असे कांहीं वि-लक्षण आहेत कीं, ते प्रत्यक्ष दैवाला देखील आपले चाकर करतात. **चाणक्याला** ह्मणाला, '**विष्णुगुप्ता**, सर्व कार्यांच्या प्राप्तीला हेतु अशा मित्रस्नेहाला नमस्कार असो! तुझें सांगणें न ऐकून काय उपाय! हा पहा शस्त्र घेण्याला मी तयार झालों आहें.' असें बोलून **राक्षसानें** तरवार हा-तांत घेतली.

हें पाहून **चाणक्य** मोठ्या हर्षानें **चंद्रगुप्ताला** ह्मणाला, अरे, अमात्य **राक्षसानें** सर्व प्रकारें तुझ्यावर अनुग्रह केला आहे. आतां चहूंकडून तुझा उत्कर्ष झाला.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'हें सर्व आपल्या पायांच्या प्रसादाचें फळ हा **चंद्रगुप्त** अनुभवीत आहे.'

इकडे **मलयकेतूला भद्रभटादिकांनीं** कैद करून आणला होता, त्याचें आतां काय करावें ह्मणून विचारण्याक-रितां त्यांनीं **उदुंबरकाला चाणक्याकडे** पाठविलें होतें.

**उदुंबरक चाणक्याला** नमस्कार करून ह्मणाला, 'आ-र्यांचा जयजयकार असो! **भद्रभट, भागुरायण**, इत्यादि-कांनीं **मलयकेतूच्या** मुसक्या बांधून त्याला कैद करून आणला आहे. तर त्याचें आतां काय करावें तो हुकूम व्हावा.'

हें ऐकून **चाणक्य** ह्मणाला, 'तें आतां मला कांहीं वि-चारूं नको. ह्या अमात्य **राक्षसाला** काय तें विचार आणि त्याच्या हुकुमाप्रमाणें व्यवस्था कर.

**चाणक्याच्या** ह्या भाषणाचें **राक्षसाला** मोठें नवल वाटलें. तो ह्मणाला, मला यानें चहूंकडून घेरून यावेळीं आपला चाकर बनविला आहे, आणि आतां मला हुकूम करायाला सांगतो. तरी पण उपाय काय? तो **चंद्रगुप्ता**ला ह्मणाला, 'राजा **चंद्रगुप्ता**, ही गोष्ट तुला माहीतच असेल कीं, कांहीं दिवस आह्मी **मलयकेतू**च्या आश्रयानें राहिलों होतों. तेव्हां त्याचे प्राण रक्षण करावे अशी माझी इच्छा आहे.'

**राक्षसानें चंद्रगुप्ता**ला विनंति केली खरी, पण **मलयकेतू**ला वांचविणें अथवा मारणें याविषयीं हुकूम देण्याची **चद्रगुप्ता**ची छाती नव्हती. तो **चाणक्याच्या** तोंडाकडे पाहूं लागला. तेव्हां **चाणक्य** ह्मणाला, 'राजा **चंद्रगुप्ता**, अमात्य **राक्षसा**ची ही पहिलीच विनंति आहे. तेव्हां हिला मान द्यावा. उदुंबरकाला ह्मणाला, 'अरे, माझ्या सांगण्यावरून **भद्रभट** इत्यादिकांना जाऊन सांग कीं, अमात्य **राक्षसानें** विनंति केल्यावरून महाराज **चंद्रगुप्त मलयकेतू**ला जीवदान देत आहेत इतकेंच नव्हे, तर त्याचें वडिलोपार्जित राज्यही त्याला त्यांनीं बक्षीस केलें आहे. तर सत्कारपूर्वक तुह्मी त्याला त्याच्या राजधानीला घेऊन जाऊन, मोठ्या समारंभानें त्याला राज्याभिषेक करून परत या.'

हें ऐकून **उदुंबरक** 'हुकमाप्रमाणें करतों,' असें सांगून निघून गेला. **चंद्रगुप्ता**च्या आज्ञेप्रमाणें **भद्रभटादि**कांनीं **मलयकेतू**च्या मुसक्या सोडून, त्याला कांहीं वेळ विश्रांति देऊन, त्याला परत त्याच्या राजधानीकडे नेलें. **चाणक्यानें**, यावेळीं आनंदप्रदर्शनार्थ शहर रक्षण करण्याच्या कामावर नेमलेल्या मुख्य अधिकाऱ्याला चोपदाराच्या

हातीं निरोप सांगून पाठविला, तो असा. 'अमात्य **राक्ष-साची** प्राप्ति झाल्यामुळें अतिशय संतुष्ट झालेला महाराज **चंद्रगुप्त** असा हुकूम करित आहे कीं, आज शेट **चंदनदास** याला सर्व राज्यांत मुख्य नगरशेट करावा, आणि आपलीं वाहनें हत्ती वगैरे यांवांचून जे कोणी कैदी बंदिशाळेंत असतील, त्यांना सोडून द्यावें. अरे हो, पण अमात्य **राक्षस** आतां मुख्य दिवाण झाला आहे, तेव्हां आह्मांला ही उठाठेव करण्याची काय गरज आहे ! तथापि, वाहनें आणि हत्ती यांवांचून जे कोणी बंधनांत असतील त्यांना सोडून द्या. माझी प्रतिज्ञा पूर्ण झाल्या-मुळें मी केवळ आपल्या शेंडीला गांठ मारतों ह्मणजे झालें ! '

**चाणक्या**च्या आज्ञेप्रमाणें पुढची सर्व व्यवस्था कर-ण्याकरितां चोपदार मुजरा करून निघून गेला. **चा-णक्य** ह्मणाला, 'राजा **चंद्रगुप्ता**, अमात्य **राक्षसा**, आ-णखीं तुमचें मी काय प्रिय करावें तें सांगा.'

**चंद्रगुप्त** ह्मणाला, 'यापेक्षां आणखी दुसरें काय प्रिय असायाचें? ह्या **राक्षसा**शीं आमची मैत्री करून दिली, मला राज्यावर बसविलें, व सर्व **नंदां**चा निःपात केला, तेव्हां याहून आणखी कर्तव्य काय राहिलें आहे ! '

**राक्षस** ह्मणाला, 'तथापि हें होवो. वराहरूप धारण करणाऱ्या भगवंताच्या दाढेवर राहिलेली ही भूतधात्री पृथ्वी, म्लेंच्छापासून भयभीत होत्साती ज्या **चंद्रगुप्त**रूपी **विष्णू**च्या भुजांचा सांप्रत आश्रय करून राहिली आहे, तो महाभाग्यशाली राजा **चंद्रगुप्त**, आपले आप्त, इष्ट, मित्र, सेवक, यांसहवर्तमान चिरकाल त्या पृथ्वीचें रक्षण करो!'

हें ऐकून **चाणक्यानें** तसा आशीर्वाद दिला, व सर्व मंडळींचा तेथल्यातेथें योग्य सत्कार केला. **राक्षसाला** प्रधानकीचीं वस्त्रें देऊन त्याचा सर्व परिवार तेथें आणविला, व **चंदनदासाला** उत्तम पोषाख देऊन सर्व लोक आपआपल्या योग्यतेप्रमाणें थाटामाटानें शहरांत प्रवेश करण्यास सिद्ध झाले. त्यावेळीं प्रत्यक्ष बापाप्रमाणें, ज्याचा वियोग सहन करण्याविषयीं असमर्थ झालेला अशा **चंद्रगुप्ताचें** समाधान करून, त्याला **राक्षसाच्या** हातांत देऊन, आपल्या पूर्वींच्या कृत्यांत ज्यांनीं ज्यांनीं उत्तम प्रकारें कामगिरी बजावली त्यांच्या योग्यतेप्रमाणें **चंद्रगुप्ता**कडून त्यांचा सत्कार करवून, **चाणक्य**, आपला प्रियशिष्य **शार्ङ्गरव** यासहवर्तमान, त्याच वाटेनें तपोवनाला निघून गेला.




BOMBAY: PRINTED AT THE EDUCATION SOCIETY'S PRESS, BYCULLA.

# पोतदारांचीं

## अतिस्वस्त शालोपयोगी व इतर पुस्तकें

### यांविषयीं महत्वाची सूचना.

पोतदारांचीं सर्व प्रकारचीं शालोपयोगी व इतर पुस्तकें विक्रीस तयार आहेत. टपालखर्चसुद्धां रोख पैसा पाठविला असता पुस्तकें ताबडतोब रवाना करूं किंवा 'व्हॅल्युपेएबल पार्सल' नें मागविलीं असतां तशीं पाठवूं. 'व्हॅल्युपेएबल पार्सल' नें मागविलीं असता बंगीवर जो किमतीचा आकडा लिहिला असेल तो पाहून तितके पैसे टपालांत भरले ह्मणजे झालें. 'व्हॅल्युपेएबल पार्सल' बद्दल मनीआर्डरचा जो खर्च, तोच सरकार घेतें. वाटेल त्या रीतीनें पुस्तकें मागवावीं. पुस्तकें उधार पाठविलीं जाणार नाहींत. 'व्हॅल्युपेएबल पार्सल' मागविलें असतां तें परत घेतलें जाणार नाहीं. अगोदरच विचार करून 'व्हॅल्युपेएबल पार्सल' मागवावें. तें परत आलें असतां त्याचा कायदेशीर रीतीनें बंदोबस्त करिता येतो. याकरितां अगोदरच खबरदारी घेतली तर बरें. 'बुकपोस्टानें' बंगी पाठविली असतां ती रजिस्टर करीत जाऊं. रजिस्टर करण्याबद्दल दोन आणे चार्ज जास्त पडेल. रजिस्टर न करिता तशीच पाठवा असें लिहून आल्यास ती गहाळ झाली असतां त्याची जबाबदारी आह्मांवर नाहीं.

**विशेषसूचना**—पोतदारांचीं शालोपयोगी पुस्तकें फारच स्वस्त, सुबक, लहान मुलांस फारच उपयुक्त, लोकप्रिय व सुलभ अशीं असल्याबद्दल सर्वत्र प्रसिद्धि आहे. पुस्तकांचा कागद व छापणी हीं विशेष मोहरेदार असतात. सारांश, जेणेंकरून विषयाची दुर्बोधता घालवून सुबोधता आणवेल व पुस्तकें शाळांतील मुलांस अत्युपयोगी होतील अशी तजवीज केली आहे. पुस्तकांच्या किमतीच्या स्वल्पतेनें तर सर्व पुस्तकास हटविलें आहे. एकदम पुष्कळ पुस्तकें घेणाऱ्या व्यापाऱ्यास भरपूर कमिशन मिळेल. कमिशनचे दर व पुस्तकाच्या वगैरे माहितीकरितां अर्धे आण्याचें तिकिट पाठविलें असतां आमचा छापी क्याटलाग पाठवून देऊं.

# बृहत्कथासागर.

प्रसिद्ध महाकवि श्रीगुणाढ्य यानीं केलेल्या बृहत्कथा नावाच्या ग्रंथाच्या आधारानें हें पुस्तक तयार केलें आहे. यात सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी आपल्या देशांत राजकीय स्थिति, धर्मसंबंधानें लोकांच्या समजुती, सामाजिकस्थिति व विद्येचा प्रसार वगैरे गोष्टी कशा व कोणत्या स्थितींत होत्या तें, अनेक मनोरंजक व नीतिपर निरनिराळ्या कथांच्या द्वारें व्यक्त केलें आहे. सामान्य मनाची करमणूक होऊन नीतिमार्गाकडे त्याची प्रवृत्ति होण्यास व अनेक विषयांची माहिती होण्यास आणि पूर्वीची आपल्या देशाची स्थिति समजण्यास या पुस्तकासारखें उपयुक्त दुसरें कोणतें नाहीं. ग्रंथाचीं सुमारें चारशें पृष्ठें होतील असे ह्याचे एकंदर दहा भाग केले आहेत. पहिला भाग विक्रीस तयार आहे

**भाग पहिला. किं. १। रु. ट. ख. ३ आणे.**

**भाग दुसरा (छापत आहे). किं. १। रुपये.**

## पोतदारांची शालोपयोगी पुस्तकमाला.

| नं० | पुस्तकाचीं नांवें | आ | पे |
|---|---|---|---|
| १ | अंकगणित (पोतदार यांचें, आवृत्ति १४वी) | ६ | ० |
| २ | मराठीवाचनसार भाग पहिला .. | ३ | ० |
| ३ | मराठीवाचनसार भाग दुसरा . ... | ३ | ० |
| ४ | मराठीवाचनसार भाग तिसरा | ५ | ० |
| ५ | मराठीवाचनसार भाग चौथा . | ७ | ० |
| ६ | मुंबई इलाख्याचें संक्षिप्त वर्णन | ० | ९ |
| ७ | हिंदुस्थानाचें सं० वर्णन | १ | ० |
| ८ | एशिया व युरोप खंडाचें संक्षिप्त वर्णन | १ | ० |
| ९ | आफ्रिका व अमेरिका खं० सं० वर्णन | १ | ६ |
| १० | महाराष्ट्रदेशाच्या इतिहासाचें संक्षिप्त वर्णन | १ | ६ |
| ११ | हिंदुस्थानाचा संक्षिप्त इतिहास (इतिहाससार) . | २ | ६ |
| १२ | चित्रबोध भाग १ ला पृष्ठें ९२ चित्रें १८६ | १ | ० |
| १३ | चित्रबोध भाग दुसरा | १ | ० |
| १४ | बालज्ञानसुधा (नवीन धुळाक्षर.) | १ | ६ |
| १५ | गद्यपद्यार्थबोध भाग १ ला व २ रा (एकत्र) अथवा मराठी १ ल्या व २ ऱ्या पु० कठिण श० अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण. . .. | २ | ० |

| नं० | पुस्तकांची नांवें | आ. | पै. |
|---|---|---|---|
| १६ | गद्यपद्यार्थ बोध भाग ३ रा अथवा मराठी ३ ऱ्या पुस्तकांतील कठिण शब्दांचे अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण . .. | ३ | ० |
| १७ | गद्यपद्यार्थबोध भाग ४ था अथवा मराठी ४ थ्या पुस्तकांतील कठिण शब्दांचे अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण . ... | ४ | ० |
| १८ | गद्यपद्यार्थबोध भाग ५ वा अथवा मराठी ५ व्या पुस्तकांतील कठिण शब्दांचे अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण .. | ८ | ० |
| १९ | हॉ० इं० पहिल्या पुस्तकांतील फक्त शब्दार्थसंग्रह ... | १ | ० |
| २० | हॉ० इं० प० पुस्तकांतील शब्दार्थ व भाषांतर टीपांसह | २ | ६ |
| २१ | हॉ० इं० दु० पुस्तकांतील शब्दार्थ फ्रेजिससह ... | २ | ६ |
| २२ | हॉ०इं०सेकंड बुक सेकंड पार्टांतील शब्दार्थ फ्रेजिससह. | ४ | ० |
| २३ | हॉ० इं० ति०पु० शब्दार्थ फ्रेजिससह | १० | ० |
| 24 | A Glossary of Sandford and Merten ... .. | 8 | 0 |
| २५ | रायलप्रायमर पुस्तकाचें सार्थस्पष्टीकरण ... .. | २ | ० |
| २६ | रॉयलरीडर नंबर१चे शब्दार्थ फ्रेजिससह. | २ | ३ |
| २७ | रॉयलरीडर नंबर२चे शब्दार्थ फ्रेजिससह | ३ | ६ |
| २८ | रॉयलरीडर नंबर३चे शब्दार्थ फ्रेजिससह. | ४ | ६ |
| २९ | रॉयलरीडर नंबर४चे शब्दार्थ फ्रेजिससह ... . . ... | ६ | ० |
| ३० | सिक्वल टु रॉयलरीडर नं० १ चे शब्दार्थ | २ | ६ |
| ३१ | सिक्वल टु रॉयलरीडर नं० २ चे शब्दार्थ | ३ | ६ |
| ३२ | सिक्वल टु रॉयलरीडर नं० ३ चे श० फ्रेजिससह ... .. | ४ | ६ |
| ३३ | सिक्वल टु रॉयलरीडर नं० ४ चे श० फ्रेजिससह ... | ५ | ० |
| ३४ | मुंबईइलाख्यांतील सरकारी मोडी१ल्या पुस्तकांतील श० व कवितान्वयार्थ ... | १ | ० |
| ३५ | ,, सरकारी मोडी २ ऱ्या पुस्तकांतील शब्दार्थ ... ... | १ | ० |
| ३६ | ,,सरकारी मोडी ३ ऱ्या पुस्तकांतील शब्दार्थ .. ... | १ | |

| नं०. | पुस्तकांचीं नांवें | आ. | पै. |
|---|---|---|---|
| ३० | स्वमाध्याय ( प्राकृत अर्थासह शुद्ध केलेला ) . .......... .. | १ | ० |
| ३१ | अंगवशिष्टाई प्रकार १ ला .......... . | १ | ० |
| ३२ | अंगवशिष्टाई प्रकार २ रा .. . ... | १ | ० |
| ३३ | रामाजीपंताचें चरित्र | १ | ० |
| ३४ | सोळा सोमवारकथा ओंव्या .... . ... | १ | ० |
| ३५ | मारुतिजन्म ओंव्या | १ | ० |
| ३६ | गर्भावळी (गर्भकांड ओंव्या ) .... ...... | १ | ० |
| ३७ | समासचक्र .... . | १ | ० |
| ३८ | समासचंद्रिका ...... | १ | ० |
| ३९ | शब्दरूपावलि संस्कृत | १ | ० |
| ४० | बावन्नश्लोकी गुरुचरित्र ओंव्या......... | ० | ९ |
| ४१ | शिवकवच ......... | ० | ९ |
| ४२ | शिवमहिम्नस्तोत्र ... | ० | ९ |
| ४३ | राममंत्राचे श्लोक ... | ० | ९ |
| ४४ | ज्ञानदेवकृत हरिपाठ | ० | ९ |
| ४५ | एकनाथकृत हरिपाठ | ० | ९ |
| ४६ | चोविस नामांचे अभंग | ० | ९ |
| ४७ | नित्यपाठाचे अभंग. | ० | ९ |
| ४८ | शिवपाठाचे अभंग. | ० | ९ |
| ४९ | तुकारामकृत हरिपाठ ............. .. | ० | ९ |
| ५० | गुरुपाठाचे अभंग ... | ० | ९ |
| ५१ | कबीराची पदें ...... | ० | ९ |
| ५२ | पोतदारकृत नवीन संगीत आरत्या ... | ० | ६ |
| ५३ | जीवितस्तोत्र......... | ० | ६ |
| ५४ | रामरक्षा ........... | ० | ६ |
| ५५ | ध्रुवाख्यान .. ...... | ० | ६ |
| ५६ | द्रौपदीवस्त्रहरणाचे अभंग. .. ....... .. | ० | ३ |
| ५७ | एकाक्षरी श्लोक ..... | ० | ३ |
| ५८ | तुकारामकृत स्वर्गारोहणाचे अभंग ... | ० | ३ |
| ५९ | संस्कृत तुळसीमाहात्म्य .............. | ० | ३ |
| ६० | शिवापराधक्षमापनस्तोत्र... . ........ | ० | ६ |
| ६१ | ज्योतिर्लिंगस्तोत्र ... | ० | [illegible] |
| ६२ | गुरुदत्तपंचक . ... | ० | ३ |
| ६३ | गणपतीचे श्लोक .. | ० | ३ |
| ६४ | शिवस्तुति . . ... . | ० | ३ |
| ६५ | लक्ष्मीस्तोत्र संस्कृत... | ० | ३ |
| ६६ | मारुतिस्तोत्र व भीमाष्टक . . ...... | ० | ६ |
| ६७ | गणपतिस्तोत्र ओंव्या | ० | ६ |
| ६८ | मिराबाई चरित्राचे अभंग . ... . ... | ० | ६ |
| ६९ | स्थालीपाकाचे अभग | ० | ६ |
| ७० | दुर्गास्तोत्र ओंव्या ... | ० | ३ |
| ७१ | चर्पटपंजरी ..... ... | ० | ३ |
| ७२ | शिवरक्षा .. .. ...... | ० | ३ |
| ७३ | देव्यपराधक्षमापनस्तोत्र... . ...... ... | ० | ३ |
| ७४ | शिवमानसपूजा...... | ० | ३ |
| ७५ | शिवतांडवस्तोत्र ... | ० | ३ |
| ७६ | नवग्रहस्तोत्र ...... .. | ० | ३ |
| ७७ | ज्वरस्तोत्र............ | ० | ३ |
| ७८ | संकष्टनाशनस्तोत्र ... | ० | ३ |
| | दत्तात्रेयस्तोत्र ...... | ० | ३ |
| ८० | गोविंदाष्टक ......... | ० | [illegible] |
| ८१ | गंगाष्टक ............. | ० | ३ |
| ८२ | नर्मदाष्टक ........... | ० | ३ |
| ८३ | अन्नपूर्णाष्टक......... | ० | ३ |

| नं. | पुस्तकांचीं नांवें | आ. | पै. |
|---|---|---|---|
| ८४ | सूर्यस्तुति | ० | ३ |
| ८५ | रामस्तुति | ० | ३ |
| ८६ | नारायणस्तोत्र | ० | ३ |
| ८७ | शनिस्तोत्र | ० | ३ |
| ८८ | कालभैरवाष्टक | ० | ३ |
| ८९ | मणिकर्णिकाष्टक | ० | ३ |
| ९० | बिंदुमाधवाष्टक | ० | ३ |
| ९१ | गजेंद्रमोक्ष प्राकृत | ० | ३ |
| ९२ | लक्ष्मीस्तोत्र प्राकृत | ० | ३ |

| नं. | पुस्तकांचीं नांवें | आ. | पै. |
|---|---|---|---|
| | स्त्रीपुरुषांनीं एकमेकांचीं नांवें घेण्याची पद्धत आणि मनोरंजक उखाणे व म्हणी. | | |
| ९३ | भाग १ | ० | ३ |
| ९४ | भाग २ | ० | ३ |
| ९५ | भाग ३ | ० | ३ |
| ९६ | भाग ४ | ० | ३ |
| ९७ | हरिहराष्टोत्तरशतनामावलिस्तोत्र | ० | ३ |

## प्राकृत ग्रंथ व पुस्तकें विक्रीस तयार.

| | कि. रु. | आ |
|---|---|---|
| सिद्धांतबोध | ६ | ० |
| भक्तलीलामृत | ५ | ० |
| ज्ञानेश्वरी | ४ | ८ |
| संतविजय | ४ | ० |
| नवनाथभक्तिसार | ४ | ० |
| नवनाथभक्तिसार | ३ | ० |
| एकनाथी भागवत | ५ | ० |
| पांडवप्रताप | ४ | ० |
| पांडवप्रताप | ३ | ० |
| पांडवप्रताप | ९ | ० |
| भक्तविजय | ३ | ८ |
| भक्तविजय | २ | ८ |
| रामविजय | ३ | ० |
| रामविजय फळ्या व वेष्टनासह | २ | ० |
| रामविजय साधा | १ | ८ |
| रामाश्वमेध | ३ | ० |
| हरिविजय कागद ग्लेज | २ | ८ |
| हरिविजय कागद जाड व शब्दकोश | २ | ० |
| हरिविजय दुसरा | १ | ८ |
| हरिविजय बुक | १ | ८ |

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| संतलीलामृत | २ | ० |
| संतलीलामृत (बुक) | १ | ८ |
| नाथलीलामृत | २ | ० |
| दासबोध | २ | ० |
| दासबोध दुसरा | १ | १२ |
| दासबोध ( पु० बांधलेलें ) | १ | १२ |
| कथासारामृत | ३ | ० |
| जैमिनीअश्वमेध | ३ | ८ |
| जैमिनीअश्वमेध (बुक) | २ | ८ |
| श्रीगुरुचरित्र मोठें | ३ | ० |
| श्रीगुरुचरित्र लहान | १ | १० |
| श्रीगुरुचरित्र गुटका | २ | ० |
| काशीखंड | ४ | ८ |
| काशीखंड | ३ | ८ |
| शिवलीलामृत रेशमी बांधलेले चित्रांसह | ० | ८ |
| शिवलीलामृत रेशमी गुटका | ० | ७ |
| गणेशलीलामृत सुटी पोथी | ० | ८ |
| ,, रेशमी बांधलेली | ० | १२ |
| पंढरीमाहात्म्य पोथी अध्याय ३१ | ० | १२ |

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| नासिकेतोपाख्यान ..... | १ | ० |
| अर्जुनगीता प्राकृत ओवीबद्ध .... ..... | ० | ४ |
| तुकारामचरित्र .. ...... | १ | ८ |
| भागवतसारामृत . . . | ५ | ० |
| मूळस्तंभ लहान ... .. | ० | ४ |
| मूळस्तंभ मोठा . .... | २ | ० |
| विवेकसिंधु . . . .. | १ | ४ |
| अमरसार (संस्कृत इंग्रेजी आणि इंग्रेजी संस्कृत कोश)... ... ... | १ | ४ |
| सरस्वतीमंडल (ब्राह्मणलोकांचा इतिहास) | १ | ८ |
| भ्रमनिरास 'जशास तसें' या पुस्तकाचें खंडण | ० | ८ |
| श्रीरामचरित्र गद्य .... | १ | ४ |
| श्रीकृष्णचरित्र गद्य.. . | १ | ० |
| पांडवचरित्र गद्य ... | २ | ८ |
| विक्रमचरित्र गद्य . . | ० | १० |
| भारतेतिहाससार ...... | १ | ० |
| सार्थगीता (भगवद्गीता मराठी टीकेसह शर्मी) | ० | १२ |
| गीता सुबोधचंद्रिका . | ० | १० |
| धर्मसिंधु (संस्कृत मराठी भाषांतरासह) ... | ६ | ० |
| तुकारामाचा गाथा ... | २ | ८ |
| किर्तनतरंगिणी भाग१ला | ० | १४ |
| ,, ,, भाग २ रा. .. | १ | २ |
| ,, ,, भाग ३ रा. .. | ० | १४ |
| उपयुक्तकथासंग्रह भाग १ ला ... ...... .. | २ | ० |
| उपयुक्तकथासंग्रह भाग २ रा .. ...... . | २ | ० |

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| केसरींतील निवडक निबंध भाग १ ... ..... | १ | ० |
| ,, ,, भाग २ ...... | १ | ० |
| शिक्षणसार........... .. | ० | १ |
| हरिविजयकथारस ...... | १ | ० |
| पांडवप्रताप कथारस . | १ | ४ |
| रामविजय कथारस .. | १ | ४ |
| संतलीलामृत ,, .. | १ | ४ |
| भक्तिविजय. ,, ... | १ | ४ |
| जैमिनिअश्वमेधकथारस. | १ | |
| शिवलीलामृतकथारस ... | ० | १० |
| राजपुत्र शूरसेन . ... | १ | ० |
| हंसपालिका कादंबरी .. | १ | ८ |
| नारायणराव आणि गोदावरी ... ... . | १ | ४ |
| वेणू (कादंबरी) . ...... | १ | ० |
| चंद्रकला (कादंबरी) ... | १ | ४ |
| बृहत्कथासागर भाग १ ला (कादंबरी) . . | २ | ४ |
| गुलबकावली मराठी ... | १ | ४ |
| मंजुघोषा ... ....... .. | १ | ४ |
| वसंतकोकिला ... ... .. | १ | ८ |
| मित्रचंद्र ........ ...... | १ | ४ |
| मदनमंजरी ... . ....... .. | २ | ० |
| विचित्रपुरी... . ....... | २ | ० |
| विदुरनीति ... . ........ | ० | ४ |
| सिंहासनबत्तिशी ... . . . | ० | ३ |
| वेताळपंचविशी ... . ... | ० | ६ |
| स्त्रीचरित्र रामजी डाक्टर पर्की भाग १।२।३।४ दर भागास ........ | २ | ० |
| महाराष्ट्रभाषेंतील मनोरंजक गोष्टी भाग ५ प्रत्येकी ............... | १ | ८ |

वासुदेव मोरेश्वर पोतदार. कांदेवाडी. मुंबई.